# वैदिक हिंदुधर्म.




# VEDIC HINDUISM.

TRANSLATED BY THE REV. BABA PADMANJI.

" जसा देव तसा भक्त."

" मी ( परमेश्वर ) केवळ तुजसारिखा आहें असें तुला वाटलें. "

ख्रिस्ती शास्त्र.

" जें सत्य नव्हे तें स्वदेशप्रीतियुक्त होऊं शकत नाहीं."

राजा सर टि. माधवराव कें. सि. एस. आय.

THE CHRISTIAN LITERATURE SOCIETY.
8vo. 1st Edition. 1,000 Copies.

*Sold at the Depôt of the Bombay Tract and Book Society.*

मुंबईमध्यें :

एज्युकेशन सोसाएटीच्या छापखान्यांत छापिलें.

१८९२.

# सूचना.

हें पुस्तक मूळ इंग्रजी ग्रंथाचें भाषांतर आहे. ह्यांत भाषांतरकर्त्यानें कित्येक ठिकाणीं नवीन मजकूर घातला आहे तो कुंडलीनें [ ]दर्शविला आहे. मूळांतील कित्येक वैदिक सूक्तांचें नवीन भाषांतर केलें नाहीं, तर तें "वेदार्थ यत्न" व "मोक्ष मूलरकृत धर्मविषयक व्याख्यानें" (मराठी भाषांतर) यांतून घेतलें आहे. तसेंच ज्या वैदिक वचनांचें मूळ इंग्रजी ग्रंथांत दिलें नाहीं, अशीं कित्येक वचनें संस्कृत ग्रंथांतून घेतलीं आहेत, तींही कुंडलींत घातलीं आहेत.

सर्व खऱ्या सत्यशोधकांस हें पुस्तक ईश्वरकृपेनें लाभदायक होवो.

भाषांतरकर्त्ता.

# अनुक्रमणिका.

# वैदिक हिंदुधर्म.

## उपोद्घात.

**वेद हे हिंदु धर्माचे परमश्रेष्ठ प्रमाणग्रंथ आहेत.**—हिंदु लोकांच्या धर्मग्रंथांचे **श्रुति** आणि **स्मृति** असे दोन मोठे भाग आहेत. **श्रुति** ह्मणजे ऐकणें; त्याचा अर्थ प्रत्यक्ष ईश्वरी प्रगटीकरण, असा आहे. **स्मृति** ह्मणजे स्मरण किंवा आठवण धरणें. या वर्गात मनुष्यकृत धर्मग्रंथांचा समावेश होतो, ह्मणजे ते मनुष्यांनीं लिहिलेले आहेत असें हिंदुलोक समजतात.

हिंदुलोक वेदांची योग्यता किती मानितात याविषयीं प्रोफेसर मोक्ष मुल्लर येणेंप्रमाणें लिहितात :—

"हिंदु लोकांच्या शास्त्रमतानुसारी परमार्थज्ञान्यांचें असें मत आहे कीं, वेदाची एक ओळ देखील मनुष्यानें लिहिलेली नाहीं. संपूर्ण वेद कोणत्या तरी रीतीनें ईश्वरकृत आहे. इतकेंच नाहीं, तर ज्यांस ईश्वरी प्रगटीकरण प्राप्त झालें, अथवा त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें ज्यांनीं तें पाहिलें ते सामान्य मनुष्य नव्हते, तर ते साधारण मनुष्यांपेक्षां उन्नति पावलेले होते ह्मणून ते ईश्वरी प्रगटविण्याचें सत्य अचूक रीतीनें ग्रहण करण्यास समर्थ होते. ज्याला संस्कृतांत **पौरुषेयत्व** ह्मणतात असा जो (वेदांतील) मनुष्यांश तो त्याच्या कोन्याकोपऱ्यांतून व दडून राहण्याच्या जाग्यांतून झाडून काढतात; आणि वेद अनादिकालापासून ईश्वराच्या मनांत होता असें मानून वेदामध्यें ज्या ऐतिहासिक गोष्टी आहेत त्यांचा ते इतक्या आवेशानें व चतुराईनें उलगडा करून टाकितात कीं, तो आवेश व ती चतुराई एखाद्या अधिक चांगल्या कार्याकडे खर्चिली असती तर विशेष उपयोग झाला असता."

"ब्राह्मणांच्या परमार्थज्ञानाप्रमाणें मनुधर्मशास्त्र हें ईश्वरी प्रगटविणें ह्मणजे श्रुति नव्हे, स्मृति आहे. जर हें धर्मशास्त्र अथवा दुसरा कोणताही प्रमाणग्रंथ वेदाच्या एका वाक्याविरुद्ध असला तर तो धर्मग्रंथ प्रमाण मानायाचा नाहीं."

वेद ईश्वरप्रणीत आहेत याविषयीं हिंदु लोकांची इतकी खातरी आहे कीं, त्याचें प्रमाण पाहण्याचें त्यांस अगत्य वाटत नाहीं. ही गोष्ट स्वतःसिद्ध ह्मणजे प्रमाणाच्या व वादाच्या पलीकडली आहे असें ते समजसात.

**वेदांविषयींचें हिंदुलोकांचें अज्ञान.**—हिंदु लोक वेदाला अत्यंत प्रमाण, पूज्य व पवित्र मानितात, तरी वेदांत काय आहे हें बहुतेकांत अगदीं माहीत नाहीं. युरोपांत वेद छापून काढण्यापूर्वीं हिंदुस्थानांत त्याच्या फारच थोड्या प्रती होत्या. कोणी असें ह्मटलें आहे कीं, जर वैदिक युगांतील आर्य लोक पृथ्वीवर पुनः येऊन वसतील, आणि आपल्या सांप्रतकाळच्या वंशजांपुढें आपल्या पूर्वाश्रमाप्रमाणें वागतील तर हे कोणी अत्यंत अशुद्ध व अधर्मी लोक आहेत असे ते मानिले जातील. कारण ते गोवध करीत व गोमांस भक्षण करीत.

वेदाच्या मागून जे ग्रंथ झाले त्यांचा पंडित लोकांनीं अभ्यास केला, परंतु वेदाचा अभ्यास त्यांनीं सोडला. ब्रह्मसमाजाचे स्थापक राजे राममोहनराय हे जेव्हां लंदन शहरीं होते तेव्हां त्यांनीं फ्रेदरिक रोसेन नामक एक तरुण जर्मन विद्वानास ब्रिटिश म्युजियम एथें ऋग्वेदसंहितेच्या हस्तलिखित प्रतीची नकल करितांना पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें, आणि ते त्या तरुणास ह्मणाले कीं, वेदाच्या सूक्तांची प्रत करण्यांत व्यर्थ वेळ कशास खर्चितां, उपनिषदांचें अध्ययन करा.

**वेद छापून प्रसिद्ध करणें.**—बहुत काळपर्यंत युरोपियन विद्वानांस वेदाचें ज्ञान करून घेणें कठीण होतें. हिंदुस्थानांत राहणाऱ्या इंग्लिश लोकांस संस्कृत ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती ब्राह्मण वगैरेंकडून सहज मिळत, परंतु वेदाची प्रत त्यांस कोणी देत नसत. आणि जर एखादे वेळीं अशी प्रत म्लेंच्छाच्या हातीं लागली तर पंडितलोक तिचें भाषांतर करायास मान्य नसत. परंतु कोलब्रूक नांवाचा एक विद्वान

होता तो मात्र ह्या अडचणींतून पार पडला असें दिसतें, कारण त्यानें सन १८०५ सालीं वेदविषयक निबंध छापून प्रसिद्ध केले ते अद्याप बहुमोलाचे मानिले जातात. रोसेन साहेबानें ऋग्वेदाच्या स्तोत्रांचे मासले १८३० मध्यें प्रसिद्ध केले. परंतु तो लवकरच मरण पावला. त्या वेळीं त्यानें ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाचें लाटीन भाषांतर समाप्त केलें होतें, तें त्याच्या मागून १८३८ सांत छापून बाहेर पडलें.

सन १८४५ सांत मोक्ष मुल्लर हे पारीस शहरांत ऋग्वेदसंहितेची सायनाच्या भाष्यासुद्धां प्रत करीत होते. पुढें एक वर्षानें त्यांला ईस्ट-इंडिया कंपनीनें आपल्या खर्चानें ती संहिता व भाष्य छापण्याची मंजुरी दिली. त्याचा पहिला भाग १८४९ सांत छापून निघाला. हें सगळें काम समाप्त होण्यास सुमारें २० वर्षें लागलीं.

प्रोफेसर विल्सन नामक विद्वानानें ऋग्वेदाचें भाषांतर सायनाच्या भाष्याधारें केलें.

[ रा० रा० शंकर पांडुरंग पंडित यांनीं ऋग्वेदाचें मराठींत व इंग्रजींत **वेदार्थयत्न** नामक भाषांतर करण्याचें काम बरेच दिवस चालविलें, यांत मराठींत भरपूर टिपा दिलेल्या असून अर्वाचीन संस्कृतांत प्रत्येक मंत्राचा अन्वय भाषारूपानें दिला आहे. हा "यत्न" संपूर्ण शेवटास गेला नाहीं ह्मणून दुःख वाटतें. केवळ चार भाग छापून निघाल्यावर हें मोठें उपयोगी काम बंद पडलें. ]

मिस्तर रोमेशदत्त यांनीं अलीकडे बंगाली भाषेंत ऋग्वेदाचें भाषांतर केलें आहे.

दाक्तर जान म्युर ह्यांचा Sanskrit Texts नामक पांच भागांचा एक मोठा विस्तीर्ण ग्रंथ आहे, त्यांत वेदांतील अनेक स्थळें विषयाच्या क्रमाप्रमाणें घेतलीं आहेत. हा अत्यंत मोलवान ग्रंथ आहे. त्यांतून ह्या पुस्तकांत पुष्कळ उतारे घेतले आहेत. दुसरे वेद युरोप व हिंदुस्थान यांत छापले आहेत.

---

## वेदाचें नांव व विभाग.

वेद शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत विद् ह्मणजे जाणणें ह्यापासून आहे. हा शब्द लाटिन विद् ( Vid ) आणि इंग्लिश टु विट् ( to wit ) यांचा संबंधी आहे. साधारण अर्थानें ब्राह्मण लोक हा शब्द आपल्या सर्व प्राचीन धर्मग्रंथांस लावितात, परंतु विशेष खास रीतीनें ऋक्, यजुस्, साम, व अथर्व नामक जो स्तोत्र किंवा मंत्रसमूह आहे त्याला वेद ह्मणतात. त्यांत सर्व ज्ञानापेक्षां श्रेष्ठ असें जें प्राप्त करून घेण्याजोगें ज्ञान त्याची पराविद्या आहे असा हिंदुलोकांचा समज आहे. [ याविषयीं वेदार्थयत्नकर्ते आपल्या ग्रंथाच्या सूचनेंत येणेंप्रमाणें लिहितात:— "आर्य लोकांच्या विधिनिषेधात्मक सकल धर्माचें मूळ, सकल शास्त्रांचें आदिस्थान, सकल इतिहासाचा आधार, सकल स्मृतींचें आदिकारण, सकल पुराणांचें उत्पत्तिस्थान असा जो वेद"......... ] वेदाची साधारण रचना विण्यावर गाण्याच्या कवितेच्या रूपाची आहे. त्यांत जेव्हां हिंदुलोकांचे आदिपूर्वज नुकतेच पृथक् राष्ट्राच्या रूपास येत चालले होते, आणि जो मोठा देश ते पुढें आपल्या सुधारणुकीनें भरून टाकणार होते त्याच्या उंबऱ्यावर जेव्हां त्यांनीं पाय ठेविला होता, त्या वेळीं त्यांनीं आपल्या देवांचीं जीं स्तवनें केलीं, आपल्या वीरांचे जे पवाडे गाइले, आणि ज्या दुसऱ्या गोष्टींकडून त्यांची काव्यशक्ति प्रदीप्त झाली, त्या आहेत.

**छंद.**—ज्या छंदांवर किंवा वृत्तांवर वेदाचीं कवनें रचिलीं आहेत त्यांचें मोठें महत्व मानीत असत. याविषयीं दाक्तर हौग हे येणेंप्रमाणें लिहितातः—

"यज्ञांत होत्री नामक जे उपाध्ये आहेत त्यांस मोठा अधिकार असतो, त्याचें कारण हेंच कीं, ते पवित्र शब्दाचे (वेदाचे) ज्ञानांत निपुण असतात. ह्या शब्दाचें रूपक करून त्याला वाच् ह्मणत. वाच् व सरस्वती हीं एकच समजत असत. ही सरस्वती अर्वाचीन हिंदु देवगणांमध्यें विद्येची देवी मानिली आहे. प्राचीन परमार्थज्ञान्यांच्या मताप्रमाणें

वाणीच्या ठायीं मृतास जीवंत करण्याची व जीवंतास मारण्याची शक्ति आहे. होतारानें पवित्र शब्दांचा उच्चार केला ह्मणजे वाच याच्या स्वाभाविक शक्तीनें यज्ञकर्त्ता आत्मिक जन्म पावतो; त्याला शरीर प्राप्त होतें, तो स्वर्गाप्रत पोंचतो, ज्या वस्तु (ह्म० संतति, गुरेंढोरें इ०) तो मिळविण्यास इच्छितो त्यांच्या मूळांशीं त्याचा संबंध जडतो, आणि तो पूर्ण आयुष्यपरिमाणापर्यंत ह्मणजे शंभर वर्षें जगतो; तसेंच ह्या पवित्र शब्दामध्यें मारक शक्तिही आहे. त्याच्या योगानें यज्ञकर्त्यास आपल्या शत्रूंचा नाश करितां येतो; आणि ( जर होताराच्या मनांत त्याविषयीं दुर्बुद्धि असली तर ) तो स्वतांही मारला जातो, अथवा त्याच्या पापाचे-ही सर्व दुष्परिणामांचा नाश करितां येतो. परंतु इच्छित वस्तु प्राप्त करून देण्याची वाचेची शक्ति व तिचें कार्य तिचा ज्या रीतीनें उच्चार केला जातो त्याच्या स्वाधीन आहे. या कारणास्तव छंदाचें व शब्द व पदें निवडण्याचें महत्व वाढलें. प्रत्येक छंद जें कांहीं ह्या जगांत मिळवायाचें आहे त्याचा अदृश्य स्वामी आहे. त्या वस्तूचा जणू काय तो दर्शक व कल्पना आहे.

"छंदोबद्ध भाषणाचें मोठें माहात्म्य त्याजमध्यें जितकीं अक्षरें असतील त्यांपासून उत्पन्न होतें. कारण प्रत्येक वस्तूला संख्यावाचक परिमाण आहे. गायत्रीमंत्रांत आठांच्या तिप्पट अक्षरें आहेत, तो परम पवित्र मानिलेला असून तो विस्तवाची देवता व देवांचा पुरोहित जो अग्नि त्याचा योग्य छंद होय. त्यांत ब्रह्माची कल्पना आहे, अथवा त्या कल्पनेचा तो दर्शक आहे, ह्मणून जेव्हां यज्ञकर्त्यास ब्रह्मसंबंधाची ह्मणजे ब्रह्मज्ञान किंवा तत्संबंधी सिद्धांताचा पूर्णबोध प्राप्त करून घेण्याची इच्छा होते तेव्हां त्यानें त्या छंदाचा प्रयोग करावा. त्रिष्टुभ-छंदांत अकरांच्या चौपट अक्षरें आहेत. तो बल व राजसत्ता यांचा दर्शक आहे. यास्तव त्या छंदानें देवांचा राजा इंद्र याचें आवाहन करावें. ज्याला बल व राजसत्ता पाहिजे त्यानें, व विशेषेंकरून क्षत्रि-यानें ह्या छंदाचा प्रयोग करावा. ज्या यज्ञकर्त्यास दीर्घायुष्याची इच्छा असेल त्यानें २८ अक्षरांचा उष्णीहछंद वापरावा, कारण २८ ही संख्या बलाची संज्ञा आहे. जगतीछंद, ज्यांत ४८ अक्षरें आहेत तो

गुरांचा दर्शक आहे. ज्याला गोधनाची इच्छा आहे त्यानें तो ह्मणावा. पंक्तिनामक छंदांत तोच अर्थ आहे. (त्यांत ४० अक्षरें आहेत.) यज्ञकर्त्यास कीर्त्ति व नांव हीं पाहिजे असलीं तर त्यानें बृहतीछंद ह्मणावा, त्यांत ३६ अक्षरें आहेत, कारण हा छंद ह्या वस्तूंचा दर्शक आहे. ३२ अक्षरी अनुष्टुभछंद स्वर्गाचा दर्शक आहे, ज्याला स्वर्गेच्छा आहे तो त्याचा प्रयोग करितो. विराज हा ३० अक्षरी असून त्यांत अन्न व तृप्ति आहे, यास्तव ज्यास पुष्टि तुष्टि (समृद्धि व तृप्ति) पाहिजे त्यानें तो ह्मणावा."

याविषयीं उदाहरणार्थ एतरेय ब्राह्मणांतील वचनें खालीं घेतलीं आहेत.

"ज्याला दीर्घायुष्याची इच्छा आहे त्यानें उष्णीह छंदांत दोन मंत्र म्हणावे; कारण उष्णीह जीवन आहे. जो हें जाणून दोन उष्णीह म्हणतो तो आपलें आयुष्य पूर्णावधि परिमित ह्मणजे १०० वर्षें करितो.

"ज्याला स्वर्गाची इच्छा आहे त्यानें दोन अनुष्टुभ म्हणावे. दोन अनुष्टुभांत ६४ अक्षरें आहेत. पृथ्वी, वायु, आकाश ह्या तिन्ही लोकांतील प्रत्येकांत २१ स्थळें आहेत, तीं शिडीच्या पायऱ्यांप्रमाणें एकावर एक आहेत. तो एकवीस एकवीस पायऱ्यांनीं, ह्या तिन्ही लोकांवर चढतो; त्यानें ६४ वें पाऊल टाकलें म्हणजे तो स्वर्गलोकांत उभा राहतो. ज्याला हें ज्ञान प्राप्त झालें आहे, त्यानें दोन अनुष्टुभ म्हटले म्हणजे त्याला स्वर्गांत थारा मिळतो.

"ज्याला बळ पाहिजे त्यानें दोन त्रिष्टुभ् ह्मणावे. त्रिष्टुभ् शक्ति, तेज व इंद्रियांची तीक्ष्णता आहे. हें जाणून जो दोन त्रिष्टुभ् ह्मणतो तो शक्तिवान, तीक्ष्णेंद्रियसंपन्न व तेजवान होतो.

"ज्याला गुरें पाहिजेत त्यानें दोन जगती ह्मणाव्या. गुरें जगतीसारखीं आहेत. हें जाणून जो कोणी दोन जगती ह्मणतो तो गोधनसंपन्न होतो.

मोक्षमुल्लर असें ह्मणतात कीं छंद हे प्रारंभीं नाचणें व गाणेंबजावणें यांच्यासंबंधाचे होते. छंदांस जीं साधारण नांवें आहेत त्यांवरून ह्या ह्मणण्याला बळकटी येते. छंद याचा अर्थ पावटा किंवा पाऊल टाकणें असा आहे. वृत्त हा वृत् ह्मणजे फिरणें यापासून झाला आहे. त्याचा अर्थ मुळीं नाचण्यांतील फिरण्याचे शेवटलीं तीन किंवा चार असा होता. चरण फिरविण्यांत नाचण्याच्या व छंदाच्या गुण-र्यादा होत असे.

वेदांत जो त्रिष्टुभ् नांवाचा साधारण छंद आहे त्याचा अर्थ तीन तीन पावलें किंवा पायऱ्या असा आहे. कारण त्याचा फेरा व त्याचें वृत्त किंवा **चरण** तीन होते, एक ऱ्हस्व व दोन दीर्घ.

**भाषा.**—वेदाची भाषा त्याच्या मागून झालेल्या संस्कृतापेक्षां जुनी असून पूर्वींच्या भाषेचा एक देशभेद आहे. तिची व्याकरणसंबंधी रचना व शब्दार्थ हीं नवीन संस्कृतापासून भिन्न आहेत. तिचे व्याकरणसंबंधी विशेष धर्म तिच्या सर्व प्रकरणांत दिसून येतात. आर्य लोकांनीं देशभाषेप्रमाणें संस्कृत बोलणें सोडून दिल्यावर वैय्याकरणी यांनीं तिला ज्या नियमानीं मर्यादित करून जबरीनें सांच्यांत बसविलें त्या नियमांप्रमाणें पूर्वीं ( वैदिककालीं ) तिची स्थिति नव्हती. तसेंच ह्या दोन भाषांच्या शब्दसंग्रहांत मोठें भिन्नत्व दिसून येतें, तेंही लक्षांत वागविण्याजोगें आहे. वेदाच्या भाषेंतील केवळ पृथक् पृथक् शब्दच नव्हे तर संयुक्त किंवा साधित शब्द व प्रकृति यांचे देखील सगळाले वर्ग, जे वेदामध्यें रूढींत असलेले दिसतात, ते ह्या नवीन संस्कृतांत नाहींसे झाले; किंवा क्वचित् दृष्टीस पडतात.

**प्रतिभाग.**—वेदांतील स्तोत्रांस **मंत्र** किंवा **सूक्त** ह्मणतात. सर्व मंत्रसमूहास **संहिता** ( किंवा संग्रह ) ह्मणतात. त्यांची व्यवस्था किंवा जुळणी दोन प्रकारें केली आहे. एका व्यवस्थेनें त्यांचीं आठ **खंडें** (तुकडे, अंश ) किंवा **अष्टकें** (आठवा हिस्सा) केलीं आहेत. प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय आहेत. दुसऱ्या व्यवस्थेप्रमाणें सर्व सूक्तांचीं दाहा **मंडळें** आहेत, त्या मंडळांचे शंभर **अनुवाक** ( अध्याय, पर्वें किंवा खंडें ) आहेत. याशिवाय सूक्तांचे अणखी **वर्ग** नामक भाग आहेत. हे वर्ग दोन्ही व्यवस्थेस लागू आहेत, व प्रत्येक वर्गांत सुमारें पांच पांच श्लोक किंवा कडवीं आहेत.

**ऋग्वेद.**—ह्याचा अर्थ स्तुतीच्या स्तोत्रांचा (गीतांचा) वेद. ऋच् हा शब्द स्तुति गाणें अशा अर्थाच्या संस्कृत धातूपासून झाला आहे, तो वेद ह्या शब्दाशीं संयुक्त असतांना ऋग् असें रूपांतर पावतो. स्वतंत्र असतांना ऋक् असा लिहितात.

ऋग्वेदाचीं दाहा मंडळें किंवा भाग केले आहेत. या वेदाची फार

प्राचीनकाळीं ह्मणजे ख्रीस्ताचे पूर्वी ६०० वर्षें प्रत्येक ऋचा (मंत्र), प्रत्येक शब्द, व प्रत्येक अक्षर यांची गणना मोठ्या काळजीनें करून ठेविली होती. मंत्रांचे संख्येंत १०,४०२ पासून १०,६२२ पर्यंत फरक आहे पद किंवा शब्द १,५३,८२६ आहेत; आणि अक्षरें ४,३२,००० आहेत.

ऋग्वेदाचीं दाहा मंडळें (पुस्तकें) निरनिराळे संग्रहग्रंथ असून प्रत्येक संग्रह भरतखंडांतील एकएका प्राचीन कुटुंबाचा माल होता. पाहिल्या सात मंडळांतील विषय व व्यवस्था सारखी दिसते. त्या सर्वांच्या आरंभीं अग्निस्तुतिविषयक स्तोत्रें आहेत, त्यांच्या मागून दाहावें मंडळ खेरीज करून इंद्राच्या स्तुतीचीं स्तोत्रें आहेत. ह्या दोन देवांच्या स्तोत्रांमागून विश्वेदेव (सर्व देव) यांचीं स्तोत्रें आहेत. यावरून असें दिसतें कीं, हीं मंडळें निरनिराळ्या कुटुंबानें स्वतंत्र रीतीनें संग्रहित केलेले ग्रंथ नव्हेत, तर निरनिराळ्या स्थळीं पण एकाच मुख्य अधिकारी पुरुषाच्या नजरेखालीं एकाच काळीं ही व्यवस्था केलेली आहे.

आठव्या मंडळांत ९२ सूक्तें असून त्यांचे कर्त्ते निरनिराळे आहेत. एकाच कर्त्याचीं सूक्तें सर्वदां एकाच ठिकाणीं सांपडत नाहींत, आणि देवतांचा संबंध धरून हीं सूक्तें जुळल्याची अंतरव्यवस्था मुळींच दिसण्यांत येत नाहीं. नवव्या मंडळांत ११४ सूक्तें आहेत. तीं सर्व सोमदेवाचीं आहेत. सोम हा त्याच नांवाच्या वल्लीपासून काढलेला मादक रस होता. दाहावें मंडळ पुष्कळ काळाच्या मागून संहितेंत घातलें आहे असें दिसतें. त्याचें पूर्वार्ध कोणत्याही पद्धतीला अनुसरून जुळलें आहे असें दिसत नाहीं, व उत्तरार्धांतील आरंभक स्तोत्रें लांब असून समाप्तीचीं स्तोत्रें शेवटीं लहान लहान होत गेलीं आहेत. बहुतेक स्तोत्रें पूर्वीच्या मंडळांतील स्तोत्रांहून भिन्न नाहींत, आणि दुसरीं अशीं आहेत कीं तीं वेदोत्तरकालिन (वेदाच्या काळामागलीं) असून त्यांचा आशयही निराळाच आहे.

ऋग्वेदांत आर्य लोकांनीं आपल्या आदिस्थानापासून बरोबर आणिलेल्या अत्यंत मोलवान मानलेल्या अशा काव्यरूप धनाचा संग्रह आहे व तो संग्रह करण्याचा हेतु त्यांत भेळमिसळ होऊन त्याची बिघडणूक होऊं नये असा होता.

इतिहासदृष्ट्या अभ्यास करणारांस ऋग्वेद हाच श्रेष्ठ वेद आहे. दुसऱ्या वेदांत ह्या वेदांतील पुष्कळ उतारे आहेत, व त्यांशिवाय यज्ञांचे क्रियाकल्प ( ह्मणजे ते करण्याची पद्धत ) मंत्र वगैरे इ० आहेत. परंतु ऋग्वेदांत प्राचीन, धर्मविषयक व लोकप्रिय अशा कवनांपैकीं जें कांहीं काळाच्या अथवा दुसऱ्या अनर्थांच्या तडाक्यांतून बचावून आलें तितक्याचा संग्रह त्या कवनाचें मूल्य जाणून केला आहे. यज्ञयागादि क्रिया करणारांसाठीं हा संग्रह करून ठेविला नव्हता; त्यांत यज्ञ करण्याची पद्धत, विधि किंवा निर्बंध असें कांहींच नाहीं.

ऋग्वेदाचे मंत्र ह्मणणाऱ्या उपाध्यास होत्री ह्मणत.

**यजुर्वेद.**—हें नाम यज् ह्मणजे यज्ञ करणें यापासून झालें आहे. यांत यज्ञभूमि सिद्ध करणारे, यज्ञपशूचा वध करणारे, आणि पेयार्पणें ओतणारे जे ऋत्विज (उपाध्ये) व त्यांचे हस्तक (मदतनीस) यांनीं हीं कर्में करण्याच्या पद्धति, व तोंडच्या तोंडांत बोलायाचे मंत्र आहेत. ह्याच्या दोन भागांच्या एकांतील प्रथम वाक्यें यज्ञासाठीं दूध काढायाच्या गायींच्या वासरांस त्यांपासून हाकून लावण्याकरितां अमूक एक झाडाची फांदी तोडतांना उपाध्या ह्मणत असे.

यजुर्वेदाच्या श्वेतयजुर्वेद व कृष्णयजुर्वेद अशा दोन संहिता आहेत; त्यांस वाजसनेयी व तैत्तिरीय संहिता असेंही नांव आहे. त्यांची उत्पत्ति विष्णुपुराणांत येणेंप्रमाणें सांगितली आहेः—"वेदव्यासाचा वैशम्पायन नामक शिष्य होता तो कृष्णयजुर्वेदाचा मूळचा अध्यापक (शिकविणारा) होता. त्याचा शिष्य याज्ञवल्क्य होता. त्यानें एकदां आपल्या गुरूला रुष्ट केल्यावरून गुरूनें आपल्यापासून प्राप्त करून घेतलेली विद्या परत दे असें सांगितलें. तेव्हां त्यानें यजुर्वेद ओकून टाकिला. तेथें वैशंपायनाचे दुसरे शिष्य होते त्यांनीं तितरांचें (तित्तिरी) रूप धरून ते मळीण झालेले वेदमंत्र पटपटां टिपून गिळून टाकले. यावरून त्याला तैत्तिरीय कृष्णयजुर्वेद असें नांव पडलें. परंतु या गोष्टीचें दुसरें सयुक्तिक स्पष्टीकरण असें आहे कीं, वैशंपायनानें यास्कास हा वेद शिकविला, त्यानें पुढें तो तैत्तिरी यास शिकविला, आणि तैत्तिरी हाही पुढें ह्या वेदाचा अध्यापक झाला. याज्ञवल्कीविषयीं असें सांगतात

कीं, त्यानें तीव्र तप करून सूर्यास प्रसन्न केलें, व यजुर्वेदाचे मंत्र त्याच्या गुरूपाशीं नव्हते ते मागितले. तेव्हां सूर्यानें घोड्याचें (वाजी) रूप धारण करून त्याला ते मंत्र शिकविले. यावरून त्या मंत्रसमुच्चयास वाजसनेयी संहिता ह्मणतात. अणखी तिला श्वेतयजुर्वेद ह्मणण्याचें कारण हें कीं तो सूर्यानें शिकविला.

वाजसनेयी हें नांव पडण्याचें दुसरें एक कारण असें सांगतात कीं, ह्या संहितेची व्यवस्था निर्दोष किंवा नितळ आहे ह्मणून तिला त्या शाखेच्या अनुयायांनीं हें नांव दिलें, आणि जुन्या शालेच्या संहितेची व्यवस्था तशी नसल्यामुळें तिला कृष्ण (काळा) असें नांव दिलें.

यजुर्वेदाचा पुष्कळ मोठा भाग ऋग्वेदांतून घेतलेला आहे. त्याच्या दोन्ही संहिता एकत्र केल्या असतां अर्धा ऋग्वेद होईल.

ह्या वेदांत यज्ञकर्माच्या पद्धति असल्यामुळें त्याचा अभ्यास फार वाढला, आणि त्याच्या शाखाही पुष्कळ झाल्या.

यजुर्वेदाचे दोन्ही भाग युरोपांत किंवा हिंदुस्थानांत छापलेले आहेत.

**सामवेद.**—हा समग्र पद्यात्मक आहे. ह्यांत १,५४९ मंत्र आहेत. त्यांतून केवळ ७८ मात्र ऋग्वेदांत सांपडत नाहींत. हे मंत्र ज्यांत मादक सोमरस मुख्य द्रव्य असे अशा यज्ञांत गाण्याकरितां निवडून व्यवस्थेनें लाविलेले आहेत. बहुतेक मंत्रांत सोमाची स्तुति आहे, कांहीं मंत्र अग्नीच्या व कांहीं इंद्राच्या स्तुतीचे आहेत. सामवेदाचें गायन करणाऱ्या उपाध्यास उद्‌गात्री ह्मणतात.

सामवेद छापला आहे, व त्याचें इंग्रजी भाषांतर डाक्तर स्तिविन्‌सन ह्यांनीं केलेलें आहे.

**अथर्ववेद.**—हा वेद दुसऱ्या वेदांपेक्षां अलीकडला आहे. त्याचा एक षष्ठांश गद्यात्मक आहे आणि सुमारें तितकाच मंत्रभाग ऋग्वेदांतील आहे. स्तोत्रांची संख्या सुमारें ७६० व मंत्रांची संख्या सुमारें ६,००० आहे.

अमेरिकेंतील प्रोफेसर व्हिटनी ह्यांनीं ह्या वेदाचें प्रकाशन केलें आहे; ते ह्याच्या गुणलक्षणांचें वर्णन येणेंप्रमाणें करितातः—

"दुसऱ्या वेदाच्या प्राचीन स्तोत्रांचे कर्ते खरोखर देवांची भीड

मर्यादा धरून त्यांची स्तुति व आवाहन करितात; परंतु त्यांच्या ठायीं आपल्या पूज्य दैवतांविषयीं प्रेम व विश्वासही होता. त्या वेदांतील ऋषी राक्षस ह्मटलेल्या असुरांस थरथरां भीत असत, व देव त्यांचें निवारण व नाश करीत असें दिसतें. अथर्वांतील देवांस त्यांचे भक्त हांजी हांजी करणाराप्रमाणें भितात; त्यांच्या कोपनिवारणार्थ त्यांची प्रार्थना करितात व त्यांची कृपा मिळविण्यास त्यांचें आर्जव करितात, असें दिसतें. त्यांत भूतांचा मोठा समुदाय दृष्टीस पडतो, व त्यांनीं आपणांस उपद्रव करूं नये ह्मणून ऋषी त्यांची प्रत्यक्ष मानमान्यता करितात. जुन्या वेदांत **मंत्र** ( किंवा प्रार्थना ) हा भक्तीचें साधन होता, तो ह्या वेदांत शकुनपिशाचादिकांच्या निष्ठेचें उपकरण होऊन बसला आहे. प्राचीन वेदांत ज्या मंत्रांच्या (प्रार्थनांच्या) योगानें देव प्रसन्न होऊन संतोषानें आपल्या आराधकांस प्रसाद देत असत ते मंत्र ह्या वेदांत असंतुष्ट देवांच्या हातांतून प्रसाद पिळून घेतात. अथवा केवळ मंत्राच्या ( चेटकाच्या ) शक्तीनेंच ते ( मंत्र ह्मणणारे ) इच्छित पदार्थ पावतात. अथर्ववेदाचें मुख्य रूप त्यांतील चेटकें होत. हे चेटकांचे मंत्र ज्यास कांहीं लाभ प्राप्त करून घेण्याचा होता तो स्वतां ह्मणत असे, किंवा बहुधा त्याच्याकरितां पंचाक्षरी म्हणे. हीं चेटकें नानाप्रकारचे विषय मिळविण्याकरितां योजीत, बहुतकरून दीर्घायुष, अथवा एखाद्या दुस्तर रोगापासून सुटका करून घेणें हे होते. रोग्यास बरें करण्यासाठीं त्याच्या गळ्यांत बांधायास मंत्रानें भारलेली कंठी देत. अथवा अनेक प्रसंगीं एखादे चमत्कारिक गुणसंपन्न झाडाचा रोपा देत ; दुसरे मंत्र धन किंवा बल मिळविण्याचे, शत्रूचा नाश करण्याचे, स्त्रियांस वश करण्याचे, अथवा खेळ जिंकण्याचे होते. क्षुल्लक पीडा दूर करण्याचेही मंत्र आहेत, टकल्या डोक्यावर केश वाढण्याचे देखील मंत्र ह्या वेदांत आहेत. काल्पनिक विज्ञानविषयक कांहीं सूक्तें आहेत, परंतु त्यांची संख्या जितकी असावी असें वाटतें तितकी नाहीं. ”

“ अथर्ववेद हा साधारण लोकांस मूर्तिपूजा व भक्तीचे वेडे विचार यांप्रत जाण्याची मधली पायरी होती ; त्याच्या द्वारें ब्राह्मणग्रंथांतील शुद्ध अद्वैताकडे जाण्यास मार्ग झाला नाहीं. ”

**ब्राह्मणें.**—वेदाच्या ह्या भागांत वेदमंत्रांचा ब्राह्मणलोकांनीं क
उपयोग करावा हें सांगितलें आहे ; यास्तव तीं वेदाच्या मागून रचलें
आहेत हें उघडच आहे. तरी मंत्रांप्रमाणें ब्राह्मणांसही श्रुति म
तात. यांत वैदिकविधींचा तपशील, त्यांची उत्पत्ति व अर्थ हीं
स्तारानें सांगितलीं आहेत. तसेंच त्यांत मंत्र व छंद यांचा उप
कसा करावा याविषयीं निर्देश आहे; आणि अर्थप्रकाशनाकर
चमत्कारिक दैवी व मानवी कथा सांगितल्या आहेत. जरी त्य
बाणा यज्ञकर्म शिकविण्याचा आहे तरी त्यांत यज्ञविधींपेक्षां मतें
सिद्धांत यांसंबंधी विषयांचें विशेष प्रकाशन व विवेचन केलें अ
प्रत्येक संहितेचीं ब्राह्मणें आहेत, तीं बहुतकरून आपापल्या वेदा
गुणलक्षणांला अनुसरून आहेत. जसें ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत त्य
मंत्र ह्मणणारा जो होत्री त्याचीं कर्में सांगितलीं आहेत. यजुर्वेदा
ब्राह्मणांत अध्वर्यूनें यज्ञ कसे करावे हें सांगितलें आहे, अ
सामवेदाच्या ब्राह्मणांत उद्गात्रीनें मंत्र कसे गावे हें सांगि
आहे. ऋग्वेदाचें ऐतरेय ब्राह्मण फार जुनें ह्मणजे इ० स०
७०० वर्षांमागें रचलेलें आहे असें अनुमान केलें आहे. त्य
दुसरें एक कौषीतकी नामक ब्राह्मण आहे. कृष्णयजुर्वेदाचें तै
रीय व श्वेतयजुर्वेदाचें शतपथ अशीं ब्राह्मणें आहेत. सामवेदा
अठरा ब्राह्मणें आहेत, त्यांपैकीं प्रौढ, षड्विंश व तांड्य हीं प्रा
आहेत. अथर्ववेदाचें गोपथ नामक एकच ब्राह्मण आहे. ह्या
ह्मणाविषयीं प्रोफेसर यजलिंग असें ह्मणतात कीं, हिंदुस्थानांतील
कांच्या सामाजिक व मानसिक स्थितीच्या विकासाच्या एक मो
महत्वाच्या काळाची माहिती करून घेण्यास जर कांहीं अणखी सा
असलीं तरीं त्यांत हीं ब्राह्मणें एक मोठें साधन आहे. याशिवाय
वेळेस संस्कृत भाषा लोक बोलत असत त्या वेळेस रचलेले गद्या
ग्रंथ हेच होत.

## आरण्यकें व उपनिषदें.

आरण्यक ह्मणजे अरण्यसंबंधी. हे ग्रंथ ब्राह्मणग्रंथांस लागून अ
व ते संसारत्याग करून अरण्यांत जाऊन राहणाऱ्या ब्राह्मणांक

रचिलेले आहेत. त्यांत विधींचा गूढार्थ सांगितला आहे, व ईश्वराच्या स्वरूपाविषयीं संवाद आहेत. ह्या पुस्तकांपैकीं जीं सांप्रत चार उपलब्ध आहेत त्यांचीं नांवें येणेंप्रमाणेः—१ बृहदारण्य, २ तैत्तिरीय, ३ ऐतरेय, ४ कौषीतकी. आरण्यकांचा उपनिषद् नामक ग्रंथांशीं निकट संबंध आहे. आरण्यकालाही कधीं कधीं उपनिषद् ह्मणतात.

उपनिषदांविषयीं मोक्षमुल्लर येणेंप्रमाणें लिहितातः—

"आरण्यकें हीं ब्राह्मणांचा विस्तार आहे, याविषयीं कांहीं संशय नाहीं. आरण्यकांत तत्त्वज्ञान असल्यामुळें त्यांचें विशेष महत्व वाढलें आहे. उपनिषद् नामक जे तत्त्वविषयक अध्याय आहेत तेच काय ते वेदाचे भाग सांप्रतकाळीं लोक फार वाचतात. हिंदुलोकांचीं जीं षट्दर्शनें किंवा सहा शास्त्रें आहेत त्यांतील तत्त्वविचारांस हीं उपनिषदें परम प्रामाण्य मानिलीं आहेत. हीं सर्व शास्त्रें आपापलीं मतें कितीही परस्पर विरुद्ध असलीं तरी त्यांस उपनिषदांचा आधार दाखवितात. हीच गोष्ट हिंदुस्थानांतील पूर्वीं होऊन गेलेल्या व सांप्रत असलेल्या पंथांची आहे. ते आपापलीं मतें सशास्त्र आहेत असें स्थापण्याकरितां प्रमाणार्थ उपनिषदांचीं वचनें घेतात. आणि वास्तविक पाहिलें असतां उपनिषदांतच इतका स्वतंत्र व अघळपघळ तत्त्वविचार केला आहे, कीं जें पाहिजे तें धर्ममत त्यांतून काढायास कठीण पडत नाहीं."

## सूत्रें.

सूत्रकाल हा वेद व अर्वाचीन संस्कृत यांच्या मधली जोडकडी आहे. सूत्र ह्मणजे सूत, धागा किंवा दोरी. ह्या धरतीवर जे नानाप्रकारचे ग्रंथ लिहिले आहेत ते केवळ स्वल्प वचनांचे दोरे असून फार संक्षेप रीतीनें वळलेले आहेत. अशा प्रकारच्या रचनेचा मुख्य हेतु संक्षेप होय. याविषयीं पंडितलोकांमध्यें महाभाष्यांतून घेतलेली अशी ह्मण आहे कीं, 'ग्रंथकर्त्यास पुत्र झाला असतां जितका आनंद होतो तितका आनंद अर्ध ऱ्हस्व स्वर उणा केल्यानें होतो.' याप्रमाणें व्याकरण, छंद, स्मृति, तत्त्वज्ञान, अथवा कोणत्याही सिद्धांताचें विवेचन केवळ साररूपानें केलें जातें. असे ग्रंथ टीकेशिवाय समजणें अगदीं अशक्य आहे, व ती सर्वदां त्यांच्यासहित असतेच.

**ब्राह्मणें.**—वेदाच्या ह्या भागांत वेदमंत्रांचा ब्राह्मणलोकांनीं कसा उपयोग करावा हें सांगितलें आहे; यास्तव तीं वेदाच्या मागून रचलेलीं आहेत हें उघडच आहे. तरी मंत्रांप्रमाणें ब्राह्मणांसही श्रुति मानितात. यांत वैदिकविधींचा तपशील, त्यांची उत्पत्ति व अर्थ हीं विस्तारानें सांगितलीं आहेत. तसेंच त्यांत मंत्र व छंद यांचा उपयोग कसा करावा याविषयीं निर्देश आहे; आणि अर्थप्रकाशनाकरितां चमत्कारिक दैवी व मानवी कथा सांगितल्या आहेत. जरी त्यांचा बाणा यज्ञकर्म शिकविण्याचा आहे तरी त्यांत यज्ञविधींपेक्षां मतें, व सिद्धांत यांसंबंधी विषयांचें विशेष प्रकाशन व विवेचन केलें आहे. प्रत्येक संहितेचीं ब्राह्मणें आहेत, तीं बहुतकरून आपापल्या वेदाच्या गुणलक्षणांला अनुसरून आहेत. जसें ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत त्याचे मंत्र ह्मणणारा जो होत्री त्याचीं कर्में सांगितलीं आहेत. यजुर्वेदाच्या ब्राह्मणांत अध्वर्यूनें यज्ञ कसे करावे हें सांगितलें आहे, आणि सामवेदाच्या ब्राह्मणांत उद्‌गात्रीनें मंत्र कसे गावे हें सांगितलें आहे. ऋग्वेदाचें ऐतरेय ब्राह्मण फार जुनें ह्मणजे इ० स० पूर्वीं ७०० वर्षांमागें रचलेलें आहे असें अनुमान केलें आहे. त्याचें दुसरें एक कौषीतकी नामक ब्राह्मण आहे. कृष्णयजुर्वेदाचें तैत्तिरीय व श्वेतयजुर्वेदाचें शतपथ अशीं ब्राह्मणें आहेत. सामवेदाचीं अठरा ब्राह्मणें आहेत, त्यांपैकीं प्रौढ, षड्‌विंश व तांड्य हीं प्रसिद्ध आहेत. अथर्ववेदाचें गोपथ नामक एकच ब्राह्मण आहे. ह्या ब्राह्मणाविषयीं प्रोफेसर यजलिंग असें ह्मणतात कीं, हिंदुस्थानांतील लोकांच्या सामाजिक व मानसिक स्थितीच्या विकासाच्या एक मोठ्या महत्वाच्या काळाची माहिती करून घेण्यास जर कांहीं अणखी साधनें असलीं तरी त्यांत हीं ब्राह्मणें एक मोठें साधन आहे. याशिवाय ज्या वेळेस संस्कृत भाषा लोक बोलत असत त्या वेळेस रचलेले गद्यात्मक ग्रंथ हेच होत.

## आरण्यकें व उपनिषदें.

आरण्यक ह्मणजे अरण्यसंबंधी. हे ग्रंथ ब्राह्मणग्रंथांस लागून आहेत, व ते संसारत्याग करून अरण्यांत जाऊन राहणाऱ्या ब्राह्मणांकरितां

रचिलेले आहेत. त्यांत विधींचा गूढार्थ सांगितला आहे, व ईश्वराच्या स्वरूपाविषयीं संवाद आहेत. ह्या पुस्तकांपैकीं जीं सांप्रत चार उपलब्ध आहेत त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—१ बृहदारण्य, २ तैत्तिरीय, ३ ऐतरेय, ४ कौषीतकी. आरण्यकांचा उपनिषद् नामक ग्रंथांशीं निकट संबंध आहे. आरण्यकालाही कधीं कधीं उपनिषद् ह्मणतात.

उपनिषदांविषयीं मोक्षमुल्लर येणेंप्रमाणें लिहितातः—

"आरण्यकें हीं ब्राह्मणांचा विस्तार आहे, याविषयीं कांहीं संशय नाहीं. आरण्यकांत तत्त्वज्ञान असल्यामुळें त्यांचें विशेष महत्व वाढलें आहे. उपनिषद् नामक जे तत्त्वविषयक अध्याय आहेत तेच काय ते वेदाचे भाग सांप्रतकाळीं लोक फार वाचतात. हिंदुलोकांचीं जीं षट्दर्शनें किंवा सहा शास्त्रें आहेत त्यांतील तत्त्वविचारांस हीं उपनिषदें परम प्रामाण्य मानिलीं आहेत. हीं सर्व शास्त्रें आपापलीं मतें कितीही परस्पर विरुद्ध असलीं तरी त्यांस उपनिषदांचा आधार दाखवितात. हीच गोष्ट हिंदुस्थानांतील पूर्वीं होऊन गेलेल्या व सांप्रत असलेल्या पंथांची आहे. ते आपापलीं मतें सशास्त्र आहेत असें स्थापण्याकरितां प्रमाणार्थ उपनिषदांचीं वचनें घेतात. आणि वास्तविक पाहिलें असतां उपनिषदांतच इतका स्वतंत्र व अघळपघळ तत्त्वविचार केला आहे, कीं जें पाहिजे तें धर्ममत त्यांतून काढायास कठीण पडत नाहीं."

## सूत्रें.

सूत्रकाल हा वेद व अर्वाचीन संस्कृत यांच्या मधली जोडकडी आहे. सूत्र ह्मणजे सूत, धागा किंवा दोरी. ह्या धरतीवर जे नानाप्रकारचे ग्रंथ लिहिले आहेत ते केवळ स्वल्प वचनांचे दोरे असून फार संक्षेप रीतीनें वळलेले आहेत. अशा प्रकारच्या रचनेचा मुख्य हेतु संक्षेप होय. याविषयीं पंडितलोकांमध्यें महाभाष्यांतून घेतलेली अशी ह्मण आहे कीं, 'ग्रंथकर्त्यास पुत्र झाला असतां जितका आनंद होतो तितका आनंद अर्ध ऱ्हस्व स्वर उणा केल्यानें होतो.' याप्रमाणें व्याकरण, छंद, स्मृति, तत्त्वज्ञान, अथवा कोणत्याही सिद्धांताचें विवेचन केवळ साररूपानें केलें जातें. असे ग्रंथ टीकेशिवाय समजणें अगदीं अशक्य आहे, व ती सर्वदां त्यांच्यासहित असतेच.

सूत्रें ह्मटलीं ह्मणजे बहुधा वेदाच्या संबंधाचीं समजतात. जसें कल्पसूत्रें हीं यज्ञक्रियेविषयीं आहेत, गृह्यसूत्रें गृहक्रियेसंबंधी, आणि सामयाचारिक सूत्रें सभ्याचाराच्या रीतीसंबंधी.

सूत्रें हीं जरी श्रुतीच्या आधारावर रचलीं आहेत तरी तीं मनुष्यकृत आहेत असें समजतात, आणि जर त्यांत कांहीं श्रुतिविरुद्ध असलें तर तें प्रमाण मानीत नाहींत.

**वेद.**—ह्या ग्रंथांतील मुख्य **विचारणीय विषय.**

वर वेदग्रंथांच्या निरनिराळ्या भागांचा जरी विचार केला आहे तरी आतां जे खरोखर वेद ह्मटलेले ग्रंथ आहेत त्यांचा आपण विशेषेंकरून विचार करूं.

## वेदांच्या उत्पत्तीविषयीं हिंदुलोकांचीं मतें.

वेदांविषयीं साधारण हिंदुमत असें आहे कीं, ते अनादि आहेत. ते काळाच्या आरंभाच्या पूर्वीं ईश्वराच्या मनांत होते. प्रत्येक कल्पाच्या आरंभीं ब्रह्म ब्रह्मदेवाला तें प्रगट करितें, आणि ते त्याच्या मुखावाटे बाहेर पडतात. नंतर ज्या ऋषींचीं नावें त्यांस जोडिलेलीं आहेत त्या ऋषींस तो ते शिकवितो.

### १. वेदांविषयीं हिंदुधर्मग्रंथांतील मतें.

( १ ) वेद पुरुषाच्या लाक्षणिक यज्ञापासून झाले.

**तस्माद् यज्ञात् सर्वहुतः ऋचः सामानि जज्ञिरे । छन्दांसि जज्ञिरे तस्माद् यजुस् तस्माद् अजायत ॥** ( ऋग्वे० १०.९० )

“विश्वयज्ञापासून ऋक् आणि सामऋचा निघाल्या; छंद त्यापासून निघाले; त्यापासून यजुस् निघाला.”

( २ ) वेद हे स्कंभाचे केश व मुख असतां ते त्याच्यापासून कापून किंवा भादरून काढले.

**यस्माद् ऋची अपातक्षन् यजुर् यस्माद् अपाकषन् । सामानि यस्य लोमानि अथर्वाङ्गिरसी मुखम् । स्कम्भं तं ब्रूहि कतमः स्विद् एव सः ।**

"स्कंभ ज्यापासून त्यांनीं ऋक् मंत्र कापून काढले, ज्यापासून यजुस् मंत्र भादरून घेतले, ज्याचे केश साममंत्र आहेत, आणि ज्याचें मुख अथर्व व अंगिरस आहेत असा जो स्कंभ तो कोण हें सांग."

( ३ ) वेद इंद्रापासून झाले आणि इंद्र वेदांपासून झाला.

स वै ऋग्भ्यो अजायत तस्माद् ऋचो अजायन्त ।
(अथर्व. १३.४, ३८)

"इंद्र ऋक्मंत्रांपासून झाला; ऋक् इंद्रापासून झाला."

( ४ ) वेद कालापासून झाले:—

कालाद् ऋचः समभवन् यजुः कालाद् अजायत ।
(अथर्व. १९. ५४, ३)

( ५ ) यज्ञाच्या उच्छिष्टापासन ऋक्, साम, पुराणें, यजुष्, आणि स्वर्गांतील सर्व देव उत्पन्न झाले:—

ऋचः सामानि छंदांसि पुराणं यजुषा सह । उच्छिष्टाज् जज्ञिरे सर्वे दिवि देवाः दिवि सृजाः ( अथर्व. ११.७,२४ )

( ६ ) वेद अग्नि, वायु व सूर्य यांजपासून झाले:—

प्रजापतिर् लोकान् अभ्यतपत् । तेषां तप्यमानानां रसान् प्राबृहद् अग्निम् पृथिव्याः वायुम् अन्तरिक्षाद् आदित्यं दिवः । स एतास् तिस्रो देवताः । अभ्यत्तपत् । तासां तप्यमानानां रसान् प्राबृहद् अग्नेर् ऋचो वायोर् यजूंषि साम आदित्यात् । स एतां त्रयीं विद्याम् अभ्यतपत् । तस्यास् तप्यमानायाः रसान् प्राबृहद् भूर् इति ऋग्भ्यो भुवर् इति यजुर्भ्यः स्वर् इति सामभ्यः । ( छांदोग्य उपनिषद्. )

"प्रजापतीनें लोकांत उष्णता घातली आणि त्यांस तप्त करून त्यांचे रस काढले, ह्मणजे पृथ्वीपासून अग्नि, वायूपासून वारा, व अंतरिक्षापासून सूर्य. त्यानें ह्या तीन देवांमध्यें उष्णता घालून त्यांचा रस काढिला, ह्मणजे अग्नीपासून ऋच्, वायूपासून यजुष्, आणि सूर्यापासून

साम हे वेद काढिले. नंतर त्यानें ह्या त्रयीविद्येंत उष्णता घालून तिचे रस काढिले ;—ऋक्‌मंत्रांपासून भूः, यजुषापासून भुवः, सामापासून स्वर् असे काढिले.

मनुधर्मशास्त्रांतही असेंच सांगितलें आहे.

(७) वेद परमात्म्याचे श्वास आहेत.

स यथा आर्द्रैधनाग्नेर् अभ्याहितात् प्रत्यग् धूमाः विनिश्चरन्ति एवं वै अरे ऽस्य महतो भूतस्य निःश्वसितम् एतद् यद् ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वाङ्गिरसः इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राणि अनुव्याख्यानानि व्याख्यानानि अस्यैव सर्वाणि निःश्वसितानि। (शतपथ ब्राह्मण १४. ६,४,१०)

" ज्याप्रमाणें ओल्या लांकडाच्या विस्तवापासून नानाप्रकारचा धूर निघतो त्याप्रमाणें ह्या महत् भूताचे (ईश्वराचे) श्वासापासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराणें, विद्या, उपनिषदें, श्लोक, सूत्रें, नानाप्रकारच्या अनुव्याख्या (टीका) हीं सर्व श्वास आहेत."

(८) वेद देवांनीं मनोरूप समुद्रांतून खणून काढिले:—

समुद्रे त्वा सदने सादयामि इति । मनो वै समुद्रः । मनसो वै समुद्राद् वाचा ऽभ्र्या देवास् त्रयीं विद्यां निरखनन् । (श० ब्रा० ७. ५,२,५२)

" मन हा समुद्र. ह्या मनोरूप समुद्रांतून देवांनीं वाणीरूप खोऱ्यानें वेदयुक्त त्रयीविद्या खणून काढिली."

(९) वेद प्रजापतीच्या दाढीचे केश आहेतः—

प्रजापतेर् वै एतानि श्मश्रूणि यद् वेदः । (तैत्तिरीय ब्रा० ३. ३९, १)

(१०) वेदांची माता वाच् (वाणी) आहे:—

वाग् अक्षरं प्रथमजा ऋतस्य वेदानां माता अमृतस्य नाभिः ।

" वाच अविनाशी आहे. ती विधीपैकीं प्रथम जन्मलेली, वेदांची माता, आणि अमृताची नाभि ( मध्य ) आहे. "

( ११ ) वेद ब्रह्मदेवाच्या मुखांपासून निघाले:—

कदाचिद् ध्यायतः स्रष्टुर् वेदाः आसंश् चतुर्मुखात् ।

कथं स्रक्ष्याम्य अहं लोकान् समवेतान् यथा पुरा । ---ऋग्यजुस् सामाथर्वाख्यान् वेदान्पूर्वादिभिर् मुखैः । शस्त्रम् इज्यां स्तुतिस्तोमं प्रायश्चित्तं व्यधात् क्रमात् ॥ ( भागव. पु. ३. १२, ३४, ३७ )

" एकदां चतुर्मुखांचा सृष्टिकर्त्ता पूर्वीप्रमाणें समुच्चित लोक कसे उत्पन्न करावे असें ध्यान करीत असतां त्यानें आपल्या पूर्वेकडील व इतर मुखांपासून स्तुति, यज्ञ, स्तोत्रें व प्रायश्चित्तें यांसहित ऋच्, यजुस्, साम व अथर्व वेद उत्पन्न केले. "

विष्णुपुराणांतही असेंच सांगितलें आहे.

( १२ ) वेद गायत्रीपासून उत्पन्न झाले:—

ततो ऽसृजद् वै त्रिपदां गायत्रीं वेदमातरम् । अकरोच् चैव चतुरो वेदान् गायत्रिसम्भवान् ॥ ( हरिवंश, श्लो. ११६१६ )

" सृष्टिरचना केल्यावर ब्रह्मदेवानें तीन पदांची गायत्री केली ती वेदांची माता होय, तिच्यापासून चार वेद झाले. "

( १३ ) सरस्वती वेदांची आई होती:—

वेदानां मातरं पश्य मत्स्थां देवीं सरस्वतीम् ( महाभा० शांतिपर्व श्लो० १२, ९२० )

" मजमध्यें राहणारी वेदांची माता सरस्वती इजप्रत पाहा. "

( १४ ) विष्णु वेदमय आहे:—

स ऋङ्मयः स चात्मा स यजुर्मयः । ऋग् यजुः साम सारात्मा स एवात्मा शरीराण ( वि० पु० ३. ३, १९ )

"तो ऋक्, साम व यजुसमय आहे. इ०"

(१९) विष्णूनें आपल्या मनांतून सरस्वती नदी व वेद काढिले. ( महाभा० भी० प० ३०,१९ ).

## २. वेदांच्या उत्पत्तीविषयीं ऋषींचीं मतें.

**अनुक्रमणिका** नामक एक वैदिक ग्रंथ आहे, त्यांत वैदिक सूक्तांच्या कर्त्यांचीं नांवें सांगितलीं आहेत. हा ग्रंथ वेदाप्रमाणेंच प्राचीन आहे, निदान वैदिक काळापासून परंपरेनें चालत आला आहे, व तो प्रमाण-ग्रंथ आहे, याविषयीं कोणाला संशय नाहीं. ह्या ग्रंथांत वैदिक सूक्तें रचणाऱ्या ऋषींचीं नांवें सांगितलीं आहेत इतकेंच नाहीं तर त्यांच्या वडिलांचींही नांवें सांगितलीं आहेत.

वेद रचून व लिहून बहुत काळ गेल्यावर ते अनादि आहेत असें जेव्हां लोक मानूं लागले तेव्हां ह्या वैदिक ऋषींविषयीं असें मत निघालें कीं, ज्यांस ब्रह्म्यानें वेद सांगितले त्यांचे ते "द्रष्टे" ( पाहणारे ) मात्र होते. हें मत केवळ निराधार आहे.

**तर ज्या अर्थानें सुतार आपण एखादी गाडी किंवा पेटी केली असें ह्मणतो त्याच अर्थानें ऋषि आपण वेदाचें सूक्त रचिलें असें स्पष्ट ह्मणतात.**

कित्येक सूक्तें अशीं आहेत कीं तीं रचतांना आपणांस ईश्वरी प्रेरणा किंवा सहाय होतें असें ऋषि मुळींच ह्मणत नाहींत:—

....कण्वासो वाम् ब्रह्म कृण्वन्ति अध्वरे तेषां सु शृणुतं हवम् । ( ऋ० वे० १. ४७, २ )

"कण्वकुलोत्पन्न जन ह्या यज्ञांत तुमची प्रार्थना करितात, त्यांची हाक तुह्मी लक्ष देऊन ऐका."

एवा ते हरियोजन्द सुवृक्ति इन्द्र ब्रह्माणि गोतमासः अक्रन् । ( ऋ० वे० १. ६४, १६ )

"हे इंद्रा, घोडे जोडणाऱ्या, हे सुंदर मंत्र गोतमांनीं तुजप्रीत्यर्थ केले आहेत."

.... अध प्रियं शूषम् इन्द्राय मन्म ब्रह्मकृतो बृहदुक्थाद् अवाचि। (२. ३९, ८)

"हें प्रिय व मानप्रद स्तोत्र, स्तोत्रांचा कर्ता बृहदुक्थ यानें इन्द्राप्रीत्यर्थ ह्मटलें."

सनायते गोतमः इन्द्र नव्यम् अतक्षद् ब्रह्म हरियोजनाय इ०। (१. ६२, १३)

"हे इंद्रा, हा गोतम [ नोधा ] पुरातन काळच्या [ ऋषीप्रमाणें ] वर्तत आहे; [ आणि ] सुवर्णाश्वांची जोडी रथास जोडणाऱ्या तुजप्रीत्यर्थ [ हें ] नवीन स्तोत्र त्यानें रचिलें आहे."

एतं ते स्तोमं तुविजातविप्रो रथं धीरः स्वपा अतक्षम्। (५. २, ११.)

"हे पराक्रमी (देवा,) जसा कुशल कारागीर रथ करितो त्याप्रमाणें मीं हें स्तोत्र तुजप्रीत्यर्थ रचिलें आहे."

अस्मा इदु स्तोमं संहिनोमि रथं न तष्टेव तात्सिनाय इ० (१. ६१, ४.)

"रथाची वांच्छा करणाऱ्या मनुष्याकरितां सुतार रथ (करितो) तसा, मी या (इंद्रा) प्रीत्यर्थच स्तोत्र (रचितों.)

एतानि वामश्विना वर्धानि ब्रह्म स्तोमं गृत्समदासो अक्रन्। तानि नरा जुजुषाणोपयातं बृहद्वदेम विदथे सुवीराः। २. ३९, ८.

"हे अश्वीहो; हीं तुह्मास बळ आणणारीं सूक्तें गृत्समदांनीं केलीं आहेत."

[ ह्यावर वेदार्थयत्नकर्त्यांची टीप येणेंप्रमाणें आहेः—"वेदकाळींचे वेदकर्ते आपण केलेलीं वेदसूक्तें ईश्वरप्रणीत आहेत असें ह्मणत नसत. तर आपण केलीं असें स्पष्ट बोलत असत, त्याचें हें एक उदाहरण होय."]

अशा प्रकारचीं वचनें वेदांत पुष्कळ अढळतात. दाक्तर म्यूरनामक

एका विद्वानानें उदाहरणार्थ ९७ मंत्र आपल्या ग्रंथांत उतरून घेतले आहेत, त्यांपैकींच हे आहेत.

कित्येक वैदिकसूक्तांचे कर्ते ह्मणजे ऋषि इतर देशांतील कवींप्रमाणें आपल्या कवनाकरितां देवाचें सहाय मागतात. एक ऋषि असें ह्मणतो (ऋग्वे० ६.४७, १०.):—

इन्द्र मृळ मह्यं जीवातुम् इच्छ चोदय धियम् अयसो न धारां यत्किंचि अहं त्वायुर् इदं वदामि तज् जुषस्व कृद्धि मा देववंतम् ॥

"हे देवा इन्द्रा, दया कर, माझें नित्याचें अन्न मला दे, माझी बुद्धि लोखंडाच्या हत्याराप्रमाणें तीक्ष्ण कर. जें कांहीं मी आतां तुझी वांच्छा धरून बोलणार तें तूं मान्य कर ; मला ईश्वरी आश्रय दे."

सप्रत्नथा कविवृधः इन्द्रो वा कस्य वक्षणिः । (८.६२, ४.)

"प्राचीन काळीं इंद्र कवींचा पुरस्कर्त्ता आणि गीतांची वृद्धिकर्त्ता होता."

वैदिक सूक्तें अनादि आहेत असें वेदांत कोठें सांगितलें नाहीं इतकेंच नाहीं, तर बहुतेक सूक्तें **नवीन** आहेत असें स्पष्ट ह्मटलें आहे, व कित्येक **जुनीं** आहेत असेंही ह्मटलें आहे. नवीं स्तोत्रें रचिलीं असतां देवांस फार संतोष होईल असें ऋषींस वाटत असे. तसेंच जीर्ण झालेल्या ग्राम्य गीतांपेक्षां श्रमपूर्वक व सुंदर रीतीनें रचलेल्या स्तोत्रांकडून देव प्रसन्न होतील अशीही कल्पना त्यांच्या मनांत होती.

अशा प्रकारचीं ५२ सूक्तें डाक्तर म्यूर यांनीं उदाहरणार्थ घेतलीं आहेत, त्यांतून कांहीं एथें घेतों :—

स नः स्तवानः आभर गायत्रेण नवीयसा । रयिं वीरवतीमिषम् । १. १२, ११.

"[हे अग्नि,] अगदीं नवीन रचलेल्या [या] आमच्या स्तोत्राच्या

योगानें स्तविलेला असा तूं वैभव [ आणि ] शूरपुत्रसंपन्न संपत्तींतें घेऊन ये."*

तान् पूर्वया निविदा हूमहे वयं भगं मित्रमदितिं दक्षमस्रिधम् । इ० । १. ८९, ३.

"त्यांजला पुरातन सूक्ताप्रमाणें (दु० भा ०—"शास्त्राप्रमाणें") बोलावितो, ह्मणजे भगाला, मित्राला इ०"

यः पूर्वयाभिर् उत नूतनाभिर् गीर्भिर् वावृधे गृणताम् ऋषीणाम् । ६. ४४, १३.

"इंद्र स्तवन करणाऱ्या ऋषींच्या प्राचीन व नवीन स्तोत्रांच्या योगें वाढला."

आ सखायः सुबदुर्घाम् धेनुम् अजध्वम् उपनव्यसा वचः । ६. ४८, ११.

"सख्यांनो, दुभत्या धेनूला नवीन स्तोत्रानें इकडे हाकून आणा."

नु नव्यसे नवीयसे सूक्ताय साधय पथः प्रत्नवद् रोचय सचः । ९. ९, ८.

"(हे सोमा,) आमच्या अगदीं नूतन व अलीकडल्या सूक्तासाठीं मार्ग सिद्ध कर; आणि पूर्वीप्रमाणें प्रकाश पडूं दे."

व्याकरणशास्त्रकर्त्ता पाणिनि हा स्पष्ट असें ह्मणतो कीं, ब्राह्मणें (अमुक मंत्रानें अमुक कर्म करावें इ० प्रकार ज्यांत सांगितला आहे असा एक वेदभाग) जुनीं व नवीं अशीं आहेत; परंतु त्याच्या मागून झालेले ग्रंथकारांचें मत असें आहे कीं, ब्राह्मणें नवीं नाहींत व जुनींही नाहींत, तीं अनादि व ईश्वरनिर्मित आहेत. पाणिनि तर आपल्या मताला भाषेचें प्रमाण दाखवितो.

वेदांचें अनादित्व स्थापणारांचें असें एक प्रमाण आहे कीं, शब्द

---

* [ ह्या मंत्रावर वेदार्थयत्नाचे विद्वान कर्त्यांची टीप येणेंप्रमाणें आहेः—"हा मंत्र दोन कारणांमुळें लक्षांत ठेवण्याजोगा आहे. पहिलें—ऋषिजन आपापल्या देवतांची स्तुति करू लागले ह्मणजे जुनें सूक्त म्हटलें तर देवास तादृश प्रिय होणार नाहीं असें समजून अगदीं नवीन रचून सूक्त म्हणत, आणि तेणेंकरून स्तुति करीत अशा प्रकारचें हें स्तोत्र आहे."]

अनादि आहे. ह्या प्रमाणाचें खंडन करायाला तें बोलून दाखविणें इतकेंच बस आहे. कोणत्याही विचारी पुरुषाची अशा उत्तरानें खातरी होईल. जर शब्दाच्या अनादित्वावरून वेदांचें अनादित्व सिद्ध होतें तर जगांतील प्रत्येक ग्रंथ अनादि आहे असें कां ह्मणूं नये?

**३. वेदांचे कर्त्ते कोण होते याविषयीं वेदांतील प्रमाण.—**

जेव्हां कोर्टापुढें एखादें खत येतें, व तें शेंकडों वर्षांमागें लिहिलें आहे अशी त्या खताच्या मालकाची तकरार असते, तेव्हां त्याच्या कालाची परीक्षा करण्याचे अनेक मार्ग असतात. उदाहरणार्थ, क्षणभर असें समजा कीं, त्या खतांत वारन हेस्टिंग्स किंवा हैदरअली यांचीं नांवें अढळलीं, तर त्यांवरून तें इ० स० च्या अठराव्या शतकापेक्षां जुनें नाहीं याविषयीं न्यायाधिशाच्या मनांत कांहीं संशय राहत नाहीं. जर वादी ह्मणेल कीं हीं नांवें दुसऱ्या मनुष्यांचीं आहेत, अथवा तीं भविष्यात्मक आहेत, तर एक लबाडी स्थापण्याकरितां तिला दुसऱ्या लबाडीचा टेंका दिला आहे असें न्यायाधिशाचें ह्मणणें पडेल. याप्रमाणेंच जर वेद अनादि आहेत तर जीं मनुष्यें अनादिकालाच्या अलीकडे होतीं त्यांचीं नांवें त्यांत कां सांपडतात?

दाक्तर म्यूरनामक एक मोठा संस्कृत विद्वान् होऊन गेला, तो याविषयीं काय ह्मणतो तें पाहाः—

"वैदिक सूक्तें केव्हां रचलीं हें समजण्याचे मुद्दे त्या सूक्तांतच मिळतात. त्यांवरून त्यांची उत्पत्ति कोणत्या प्रसंगीं झाली व त्यांची रचना कोणत्या प्रकारें झाली हें सांगतां येतें इतकेंच नाहीं, तर तीं कोणत्या स्थळीं रचलीं हें देखील समजतें. वेदांत सिंधुनदीला महानदी ह्मटलें आहे, गंगानदीचें नांव केवळ दोनदां अढळतें, व सरस्वती ही त्यांच्या वस्तीच्या प्रदेशाची पूर्वसीमा होती."

"ह्या सूक्तांवरून आणखी असें समजतें कीं, आर्य कुळें आपल्या आसपासच्या शत्रूंशीं सर्वदां लढत असत. हे शत्रु बहुतेक त्यांच्या जातीचे किंवा त्यांची भाषा बोलणारे नव्हते. त्यांच्याशीं लढत असतां आर्य लोकांचा पगडा हळुहळू पूर्वेकडे व दक्षिणेकडे पडत चालला. अशा स्थितींत असतां त्यांनीं आपल्या उपास्य दैवतांच्या आत्म-

रक्षणार्थ व जयार्थ प्रार्थना कराव्या हें साहजिक होतें. याखेरीज ते इतर लोकांप्रमाणें जागिक सुखांच्या वस्तु मिळण्याकरितां त्यांची आराधना करीत असत."

खालीं उतरून घेतलेलें स्तोत्र इंद्राचें आहे. त्यांत मूळ प्रजेपैकीं दस्यु ह्मटलेल्या लोकांचा इंद्रानें नाश करावा, आपणास अन्न व वाहत्या पाण्यासुद्धां तळ द्यावा, अशी ऋषीची प्रार्थना आहे. त्यावरून आर्य लोक हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत असतां रचिलेलें तें स्तोत्र आहे असें स्पष्ट दिसतें:—

१. "हे हयश्व इन्द्रा, मदकारी महान् सोमाचा पेला ग्रहण करितो तसा तूं भक्षण कर आणि हर्ष पाव. तुज बळवंताकारणें बळवान्, संपत्तिमान् आणि सहस्र देणग्या उत्तम रीतीनें देणारा सोमरस अर्पण केला आहे.

२. "हे इन्द्रा, मादकारी, बळवान्, उत्कृष्ट, सामर्थ्यवान्, विजयी, शत्रुजित् आणि अमर असा आमचा सोमरस तुजप्रत प्रविष्ट होवो.

३. "हे इन्द्रा, तूं दानशील शूर आहेस. तो तूं या मानवाचा रथ हाक. सामर्थ्यवान असा जो तूं तो अधार्मिक दस्यूला ज्वाळेनें पात्राला जाळिल्याप्रमाणें जाळून टाक.

४. "हे अतीन्द्रियदर्शी इन्द्रा, प्रभु असा जो तूं तो आपल्या पराक्रमानें सूर्याचें चक्र हरण कर. तूं वायूच्या घोड्यांच्या योगानें शुष्णाकडे शस्त्र आणि कुत्साला घेऊन जा.

५. "कारण कीं तुझा हर्ष अत्यंत बळवान होय, आणि तुझा पराजय अत्यंत धनदाई होय, तुझा जो विजयी हर्ष तेणेंकरून आणि धन देणारा जो तुझा पराक्रम तेणेंकरून तूं अतिशय अश्वादि संपत्ति देणारा असा स्तविला जा.

६ "हे इन्द्रा, जसल्या स्तोत्राच्या योगानें तूं प्राचीन भक्तांला तृषाक्रांतास पाण्याप्रमाणें सुख देता झालास तसल्या स्तोत्रानें मी तुला अत्यंत प्रार्थीत आहें; तर आह्माला अन्न, बळ, आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होवो." (वेदार्थयत्न)

### ४. वेदांचे कर्त्ते कोण होते, या प्रश्नाचा निर्णय.

देवांच्या उत्पत्तीविषयीं हिंदुलोकांचीं काय मतें आहेत हें दाखविण्या-

करितां आह्मी वर चौदा निरनिराळ्या हिंदुग्रंथांतून उतारे दिले, आणि त्यांच्याविरुद्ध बहुतेक वैदिक सूक्तांच्या कर्त्यांचीं नांवें वेदांतूनच दाखविलीं. त्यांत त्या सूक्तांचे कर्ते आपण आहोंत असें ऋषि स्पष्ट ह्मणतात. ह्याशिवाय वैदिक सूक्तांवरूनच अणखी असें दिसतें कीं, आर्य लोक हिंदुस्थानांत प्रवेश करीत असतां, व त्या देशाची सीमा ओलांडून फारसे अलीकडे आले नव्हते त्या काळीं, आणि ते ह्या देशांतील अनार्य ह्मणजे मूळचे रहिवासी यांशीं लढाईत गुंतलेले असतां तीं सूक्तें रचलीं गेलीं.

युद्धांत जय मिळाला असतां तो कित्येक स्तोत्रांच्या योगानें मिळाला असें मानीत :—"हे वसिष्ठा, तुमच्या प्रार्थनेच्या योगानें इंद्रानें दाहा राजांच्या युद्धांत सुदासाचें रक्षण केलें नाहीं काय ?" ( ऋग्वे० ७. ३३, ३४ )

अशा प्रकारचीं स्तोत्रें (चेटकाचे ) मंत्रांप्रमाणें मानीत असत, आणि तीं सर्व कुळांचीं रणगीतें झालीं होतीं.

त्या सर्व पुराव्यांवरून असा निर्णय होतो कीं, ज्यांचीं नांवें वैदिक सूक्तांस जोडलीं आहेत त्यांनींच तीं सूक्तें रचिलीं, व तीं अनादि नाहींत.

## वेद रचण्याचा काळ.

क्रेंब्रीज एथील संस्कृत प्रोफेसर असें ह्मणतात कीं, "हिस्टरी (History) ह्या शब्दाचा समानार्थक शब्द हिंदुस्थानांतील भाषांत नाहीं. अत्यंत प्राचीनकाळापासून तर प्रस्तुतच्या काळापर्यंत गतकाळीं घडलेल्या खऱ्या गोष्टींचे सप्रमाण लेख लिहून ठेवण्याची कल्पना हिंदुलोकांच्या मनांत शिरलीच नाहीं."

हिंदु ग्रंथकारांनीं आपला कालवृत्तांत आपल्या खगोल भूगोल विद्येप्रमाणें आपल्या कपाळांतून काढून रचला. शंभर वर्षांच्या काळाला कोटीं वर्षें असें लिहिणें सोपें होतें, व लोकांस नवल वाटण्याजोगें होतें. हिंदुस्थानाच्या इतिहासांत खचितार्थानें समजण्याजोगा असा काळ इ. स. पूर्वी ३०० वर्षांच्या पलीकडला दुसरा नाहीं, व तोही ग्रीक लोकांच्या योगानें समजला! यास्तव वेद केव्हां लिहिले अथवा रचले हें खास सांगवत नाहीं. त्यांची रचना शेंकडों वर्षें चालली होती, याविषयीं तर संशय नाहीं. मोक्ष मुल्लर यांनीं असें अनुमान केलें आहे

कीं, सांप्रतकाळीं जशी वेदांची रचना आहे तशीच त्यांची रचना ख्रि. स. पू. १५०० वर्षें झालेली असावी. त्यांच्या मतें मंत्रकालाची समाप्ति ख्रि. स. पू. ८००—१००० वर्षें झाली. ब्राह्मणकाल ख्रि. पू. ६००–८००, आणि सूत्रकाल ख्रि. पू. ६००–२०० वर्षें असा होता.

## वेद प्रथम मुखद्वारा परंपरेनें आले.

हिंदुस्थानांत आजपर्यंत ज्या शिलालेखांचे शोध लागले आहेत त्यांत परम प्राचीन लेख ह्मटले ह्मणजे अशोक नामक बौद्धधर्मी राजाचे होत. हा राजा ख्रि. पू. २५९ पासून २२२ पर्यंत होता. शिकंदर बादशहाच्या आरमाराचा सेनापति नियार्खस (ख्रि० पू० ३२५) हा सिंधु नदी उतरून आला. तो असें ह्मणतो कीं, हिंदु लोक चांगल्या चोपलेल्या कापसावर पत्रें लिहीत, परंतु त्यांचे कायदे लिहिलेले नव्हते; व्यापारी व इतर लोक लिहिणें लिहीत, परंतु विद्येच्या कामांत त्याचा उपयोग करीत नसत.

पुष्कळ शतकांपर्यंत वेद स्मृतीच्या द्वारानें (आठवणीनें) चालत आले. गुरूनें वेदाचा कांहीं भाग ह्मणावा व तो त्याच्या मागून शिष्यानें ह्मणावा. वेदांत बेडकांविषयीं जें स्तोत्र आहे त्यांत ह्या रीतीचा उल्लेख आहे:—"जसा शिष्य गुरूचे शब्दाचा पुनरुच्चार करितो तसा एक बेडूक दुसऱ्याच्या शब्दाचा पुनरुच्चार करितो." (ऋग्वे. मंडल ७. १०३)

वेदाचे ग्रंथ मुखपाठ करायास वर्षांचीं वर्षें लागत. कोणता तरी एक भाग पाठ करण्याकरितां निवडून घेत असत. कोणी एक ग्रंथ घेत, व कोणी दुसरा, याप्रमाणें वेदमंत्रांचें परंपरेनें पिढ्यानपिढी रक्षण झालें.

मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, ब्राह्मणानें गुरुगृहीं राहून जें कांहीं त्याला शिकायाचें आहे. तें गुरूच्या मुखापासून शिकावें, अशी आज्ञा आहे इतकेंच नाहीं, तर जे लिखित ग्रंथावरून ज्ञान प्राप्त करून घेतात त्यांजविषयीं भयंकर शाप उच्चारिले आहेत. महाभारतांत असें लिहिलें आहे कीं, जे वेदविक्रय करितात, आणि जे वेद लिहितात तेही, व जे वेद विटाळतात ते नरकाप्रत जातात. कुमारिल असें ह्मणतो

कीं, जर सत्यज्ञान ह्मणजे वेदाचें ज्ञान लिहिलेल्या पोथीवरून प्राप्त करून घेतलें, अथवा शूद्रापासून प्राप्त करून घेतलें, तर तें वेदज्ञान कवडीमाल होतें.

वेदमंत्रांच्या उच्चाराविषयीं ब्राह्मण लोकांस असें भय घालतात कीं, जर त्यांत यत्किंचित् चूक झाली तर त्याची अद्भुत शक्ति नष्ट होते.

वेद लिहिण्याची मनाई करण्याचें कारण प्रोफेसर व्हिटनी येणेंप्रमाणें सांगतात:—

"ब्राह्मणांस लेखनविद्या येत असतांही त्यांनीं ती न आल्यासारखी मानून आपले पवित्र ग्रंथ लिहून ठेवण्याची सक्त मनाई कां केली याचें कारण कल्पिणें कठीण नाहीं. ब्राह्मणांचें याजकपण आरंभीं वर्गसंबंधी होतें (जातीसंबंधी नव्हतें), तें पुढें वैदिक मंत्र त्यांच्याचपाशीं विशेषेंकरून असल्या कारणामुळें व त्यांचा धर्माच्या अनेकविध कर्मांत कसा उपयोग करावा हें त्यांसच विशेषेंकरून माहीत असल्यामुळें वंशपरंपरागत अशी पक्की जात होऊन बसलें (ह्मणजे जो अगोदर उपाध्याचा वर्ग होता तो पुढें उपाध्याची जात झाली) हे वेदमंत्र पिढ्यानपिढी परंपरेनें चालत आले, व ते जातीच्या, कुटुंबांच्या, अथवा शाखांच्या ताब्यांत होते; प्रत्येक कुटुंबाजवळ त्यांच्या पूर्वजांनीं गायलेलीं कवनें होतीं, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. हीं कवनें ते मोठ्या धनदौलतीप्रमाणें मानीत. त्यांचें वजन व अधिकार यांचें मूळ त्यांत असे. असें असतां जेव्हां लेखनकला अधिक शिकलेल्या लोकांस समजूं लागली व प्रचारांत येऊं लागली—आणि असे लोक केवळ ब्राह्मणजातीमध्येंच होते असें नाहीं,—तेव्हां ब्राह्मणांस साहजिक भय प्राप्त झालें कीं, जर आपल्या वेदमंत्रांचे ह्या लोकांस उघड रीतीनें उतारे घेऊं दिले व हातोपातीं ते जाऊं लागले, आणि त्यांस अपवित्र नजर लागून त्यांची चर्चा होऊं लागली, तर हे पवित्र मंत्र सामान्य लोकांचा माल होईल, आणि आपल्या हातीं जो त्यांचा मखता किंवा गुत्ता आहे तो बुडेल. परंतु जर धर्मग्रंथ शिकविण्याची जुनी चाल कडक रीतीनें चालविली, आणि वेदांचा उपयोग उघडपणें व सर्वांनीं करण्याची सक्त मनाई केली, तर ब्राह्मणांचें ब्रह्मज्ञान शिक-

ण्याच्या शाळांचा उत्कर्ष होत जाईल, आणि त्यांच्या द्वारें मात्र धर्म-ज्ञान परंपरेनें चालत जाईल, आणि धर्माचे सिद्धांत व विधि जातीच्या अधिकारांत राहतील."

"ब्रिटन लोकांचे प्राचीन काळचे द्रूदनामक उपाध्ये अशाच प्रकारें करीत. त्यांविषयीं ज्युलियस सिजर असें ह्मणतो कीं, त्यांतून कित्येक-जण आपले धर्मविषयक श्लोक मुखपाठ शिकण्यांत वीस वीस वर्षें घालवीत व ते लिहून ठेवणें मोठें पाप आहे असें मानीत."

वेद प्रथम युरोपियन विद्वानांनीं छापिले, त्यांच्या कित्येक आवृत्तीं-विषयीं वर सांगितलेंच आहे.

## वैदिककाळांतील लोकांची सामाजिक स्थिति.

आर्यलोकांचे पूर्वज अत्यंत प्राचीनकाळीं मध्यएशियांतील उंच प्रदेशांत एकत्र राहत होते असें अनुमान केलें आहे. वेदामध्यें दीर्घा-युष्याकरितां ज्या प्रार्थना आहेत त्यांत ऋषी शंभर वर्षें (हिमकाल) मागतात. उत्तरेकडील कुळांप्रमाणें तेही अश्वमेध (घोड्याचा यज्ञ) नामक यज्ञ मोठ्या महत्वाचा मानीत असत. त्यांचा वर्ण त्यांच्या शेजारी जे लोक राहत त्यांच्याशीं ताडून पाहिला असतां तो गोरा होता. जेव्हां आर्यलोकांची संख्या वाढली तेव्हां त्यांस आपल्या मूळ स्थानीं राहून आपला चरितार्थ चालविणें कठीण दिसलें ह्मणून त्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या परस्थळीं जाऊं लागल्या. कित्येक टोळ्या पश्चिमेस सूर्य मावळतो त्या दिशेकडे जाऊन युरोपांत राहिल्या. दुसऱ्या टोळ्यांनीं सूर्योदयाच्या दिशेस ह्मणजे पूर्वेस आपलीं तोंडें फिरविलीं आणि सिंधुनदीच्या खोऱ्यापर्यंत आल्या. त्यांच्याबरोबर त्यांचीं कुटुंबें, त्यांचे चाकर व गुरें असा मोठा समुदाय होता. त्यांनीं हिंदुस्थानांत पेशावराच्या डोंगरांतील घाटांतून प्रवेश केला असावा. त्यांस मार्गांत ज्या नद्या लागल्या त्या ते सोयीवार उताराची जागा पाहून उतरून आले, किंवा जेथें पाणी फार खोल लागलें तेथें होड्यांतून अलीकडे आले.

त्या काळांत हिंदुस्थानांतील बहुतेक प्रदेश अरण्यमय असून त्यांत मधून मधून मूळप्रजेचीं खेडीं व गांवें वसलेलीं होतीं. ही प्रजा कृष्ण-

वर्ण असून अन्यभाषा बोलणारी होती. आर्यलोकांस आपल्या जातीचा अतिशय अभिमान होता. ज्या लोकांची त्यांस गांठ पडे त्यांचा त्यांनीं धिःकार व द्वेष करावा, ते ह्या मूळ रहिवाशांस "काळें कातडें" ह्मणत, आणि त्यांचीं नाकें ह्यांच्या इतकीं मोठीं नव्हतीं ह्मणून ते ह्यांस "बकरनाकें" किंवा "बिन नाकाचे" असें ह्मणत. त्यांस त्यांनीं "दस्यु" असेंही नांव दिलें होतें, त्याचा अर्थ शत्रु असा मानिला आहे. ह्यांपैकीं बहुतांस त्यांनीं गुलाम केल्यावरून चाकरालाही पुढें दास ह्मणूं लागले.

कित्येक दस्यु सांप्रतकाळच्या भिल्ल किंवा दुसरे अर्धवट सुधारलेल्या रानटी लोकांसारिखे होते. वेदाच्या कित्येक स्तोत्रांत दस्यूंच्या संपत्तीचा उल्लेख आहे – ह्मणजे "दस्यूचें बळ जिंक, इंद्राच्या योगानें आह्मास त्यानें संग्रह केलेल्या संपत्तीचा वांटा मिळो," इ० त्यांस किल्ले व शहरें होतीं. "हे इंद्राग्नी, तुह्मी एका तडाक्यानें दस्यूंचे ९० किल्ले पाडून टाकिलेत." "हे तापट इंद्रा, तूं आपल्या वज्रानें पुरूच्या ९० नगरांचा चुराडा केलास."

आर्यलोकांचा ह्या देशांत जसजसा पगडा पडत चालला तसतशी त्यांनीं अरण्यांत, शेतांत व मूळप्रजेच्या खेड्यापाड्यांत वसाहत केली. त्या लोकांनीं आपल्या शक्तीप्रमाणें आपल्या देशावर स्वारी करणारांस टक्कर दिली. त्यांचा काळा रंग, अडाणी चाली, रांगडी भाषा आणि त्यांजवर रात्रीचे छापे होत असतांना रानटी किंकाळ्या हीं पाहून आर्य लोक त्यांस पिशाच किंवा राक्षस ह्मणूं लागले.

आर्य लोक हे आपल्या शत्रूंपेक्षां बलाढ्य होते. त्यांनीं दस्यूंस त्यांच्या स्थळावरून हाकून लाविले, किंवा आपले गुलाम केले. हिंदुस्थानांत पहिला मोठा भेद जातिभेद गोरे व काळे, जिंकणारे व जिंकलेले, स्वतंत्र व दास यांचा होता. आर्यांनीं ज्या कुळांस प्रथम आपले ताबेदार केले अशांपैकीं शूद्रनामक कूळ होतें. हेंच नांव पुढें सर्व जातीला लागू केलें. ह्या स्वारीच्या लढाया शेकडों वर्षें चालल्या तरी एकंदरीनें सर्व मूळ प्रजा कोणत्याही काळीं आर्यलोकांस वश झाली असें नाहीं.

वैदिक काळांतील महानदी ह्मटली असतां सिंधुनदी ही होय. गंगा-

नदीचें नांव वेदांत केवळ दोनदां अढळतें. आर्य लोक हळू हळू पूर्वेकडे सरस्वती नदीपर्यंत पसरत गेले. वैदिक काळांत ही नदी त्यांची सीमा होती.

आर्यलोकांची स्थितिरीति त्यांच्या वेदांतील सूक्तांवरून जी दिसून येते ती येणेंप्रमाणें होती:—

**खेडीं व गांवें.**—आर्य लोक हळू हळू पंजाबांत येऊन राहिले. त्यांस जेथें कोठें आपल्या गुरांढोरांकरितां व शेतकीकरितां कुरणें व पाणथळ जागा लागली तेथें त्यांनीं खेडीं वसविलीं. त्यांचीं खेडीं कित्येक ठिकाणीं वाढून त्यांचीं गांवें बनलीं, व गांवांचीं शहरें बनलीं. त्यांचीं घरें आतांच्याप्रमाणें बहुधा मातीचीं बांधलेलीं असत. कित्येक घरें इतकीं नबळीं होतीं कीं, त्यांजवरून मरूत जात ह्मणजे झुंजाट वारा वाहूं लागे तेव्हां ती लटलटां कांपत. डोंगराजवळच्या प्रदेशांत जेथें दगड पुष्कळ असत तेथें मात्र आर्य लोक कधीं कधीं घर बांधण्याकरितां त्यांचा उपयोग करीत. इंद्रानें एकदां शंभर दगडी नगरांचा नाश केला असें वेदांत सांगितलें आहे. लोखंडाचीं नगरें किंवा किल्ले यांचाही वेदांत उल्लेख आहे.

**राजे व ग्रामपति.**—आर्यांनीं जो देश घेतला होता त्यांत अनेक कुळें राहत असत, व त्याजमध्यें अनेक मांडलिक राज्यें होतीं. वेदांत पुष्कळ राजांचीं नांवें अढळतात, व त्यांच्या स्नेहभावानें किंवा शत्रुभावानें परस्परांशीं झालेल्या भेटींविषयींही सांगितलें आहे. इंद्र आपल्या पत्न्यांसहित राजाप्रमाणें राहत आहे असें एका ठिकाणीं ह्मटलें आहे. मित्र (सूर्य) हजार खांबांच्या व हजार दरवाज्यांच्या वाड्यांत राहत असे, असें जें ह्मटलें आहे तें कवीनें पाहिलेल्या कोणा एका राजमंदिराचें अतिशयोक्तीनें केलेलें वर्णन आहे यांत संशय नाहीं. राजे व सरदार यांजवर कोणी प्रमुख नव्हता ह्मणून कधीं कधीं एक आर्य नाईक दुसऱ्या आर्य नायकाशीं युद्ध करी.

पुरपति (नगरांचे अधिकारी) व ग्रामपति (गांवांचे अधिकारी) अशीं नांवें वेदांत अढळतात.

**कुटुंबांतील नातीं.**—वैदिककाळांत एका पुरुषाला एक बायको

होती, असा नेम दिसतो. कधीं कधीं नवरी आपल्याकरितां नवरा निवडून घेत असे. ह्या चालीला स्वयंवर ह्मणत. अनेक बायका करण्याचीही चाल होती. एका ऋषीनें एका दिवसांत दाहा कन्या वरिल्या अशी कथा आहे. अश्विनी नामक दोन देवांस एक बायको होती. याविषयीं डाक्तर राजेंद्रलाल मित्र असें ह्मणतात कीं, ऋग्वेदांत स्वयंवर, बहुपत्नीत्व (अनेक बायका करण्याची चाल), व बहुभर्तृत्व (अनेक नवरे करण्याची चाल) हीं सर्व सांपडतात. विधवांस लग्न करण्याची मोकळीक असे. स्त्रियांविषयीं साधारण मत इंद्राच्या मुखांत जें वचन घातलें आहे तें होतें असें दिसतें:—

"इंद्र ह्मणाला कीं, स्त्रियांचें मन अनावर आहे, व त्यांचा स्वभाव चंचल आहे."

[**इंद्रश्चिद्घा तदब्रवीत्स्त्रिया अशास्यं मनः । उतो अह क्रतुं रघुं ।** ऋग्वे० ८. ३३, १७].

**वस्त्रालंकार.**— वेदांत मंगल (चांगलीं) वस्त्रें परिधान केलेल्या स्त्रिया (**जायेव पत्य उशती सुवासाः** । ऋ० ४. ३.२) व चांगलीं केलेलीं वस्त्रें (**वस्त्रेव भद्रा सुकृता** । ९. २९. १९) यांचा उल्लेख आहे. या वचनांवरून अलंकाराविषयीं जो अन्यस्थळीं उल्लेख आहे त्यावरून आर्य लोक आपलीं शरीरें वस्त्रालंकारांनीं अलंकृत करण्याकडे त्याकाळीं बरेंच लक्ष पुरवीत असत असें दिसतें. त्यांचीं वस्त्रें कापूस व लोंकर यांचीं केलेलीं असावीं असा तर्क चालतो. वस्त्रांचा डौल आतांच्या हिंदुलोकांच्या वस्त्रांसारिखा असेल असें वाटतें. अथर्ववेदांत पागोट्याचा उल्लेख आहे. त्याला "उष्णीष" ह्मटलें आहे (अ. वे. १९,२,१). सुया व शिवणें यांचाही उल्लेख आला आहे त्यावरून आयतीं तयार केलेलीं वस्त्रें त्या लोकांस ठाऊक होतीं असा तर्क चालतो.

**अन्न.**—यांत मुख्य गायीपासून होणारे पदार्थ होते. लोणी व दहीं हीं प्रत्येक जेवणांत असायाचींच. दुधांत मिसळलेलें व तळलेलें धान्य यांची आर्यलोकांस फार आवड असे. यव व गहूं यांच्या पिठाच्या भाकरी करीत. परंतु **मांस** हें उत्तमान्न मानिलें होतें. शतपथब्राह्मणांत असें ह्मटलें आहे कीं, एतद् उह **वै परम अन्नाद्यम यान मांसं.**"

वैदिक काळाच्या मागून हिंदुलोकांच्या रीतिभातींत जे फेरफार झाले त्यांपैकीं कित्येक प्रकारच्या मांसाहारांत जो पालट झाला तो एक होय. दाक्तर राजेंद्रलाल हे हिंदुस्थानांतील विद्वानांचे मुगुटमणी होऊन गेले, त्यांनीं ह्या गोष्टीचें तथ्य समजण्याकरितांच मात्र शोध केला, तो Indo Aryans नामक त्यांच्या ग्रंथाच्या एका प्रकरणांत संग्रहित केला आहे. त्या प्रकरणाचें नांव Beef in Aunient India (प्राचीन हिंदुस्थानांतील गोमांस) असें आहे, त्याचा आरंभ येणें-प्रमाणें आहेः—

"ह्या प्रकरणाचें नांव पाहतांच माझ्या बहुतेक देशबांधवांस मोठा चिळस येईल यांत संशय नाहीं. परंतु हिमालयाच्या ह्या बाजूच्या आर्यलोकांच्या प्राचीन व सामाजिक इतिहाससंबंधी शोध करण्यांत जें हांशील आहे तेंच ह्या विषयाचा शोध करण्यास कारण आहे. गोमांस ह्मणजे भगवती देवीची जी पृथ्वीवरील प्रतिमा ( अशी जी गाई ) तिचें मांस अन्न मानून भक्षण करणें हें हिंदुलोकांस इतकें अघोर वाटतें कीं, शास्त्राप्रमाणें चालणारे असे सहस्रावधि हिंदु स्वभाषेंत हा शब्द (गोमांस) देखील कधीं उच्चारीत नाहींत; आणि गोवधामुळें ह्या देशांत पुष्कळ दारूण युद्धें होऊन रक्तपात झाले आहेत. तथापि इतिहासदृष्ट्या पाहतां असें दिसून येतें कीं, पूर्वीं असा काळ होता कीं त्यांत गोवध करण्यानें हिंदुलोकांच्या मनास चुरस लागत नसे. ह्या पशूचें मांस ते उत्तम अन्न मानीत, व प्राचीन यहुदी लोकांप्रमाणें योग्यतेच्या मनुष्याचा पाहुणचार करण्यांत याचा उपयोग करीत, इतकेंच नव्हे तर इहलोक सोडून परलोकींच्या यात्रेंत या पदार्थाचा पुरवठा मृताच्या संगतीं असला पाहिजे अशी त्या काळांतील भाविक हिंदूंची समजूत होती, ह्मणून मेलेल्याच्या प्रेतासंगतीं दहन करण्या-साठीं नेमानें गायी मारीत असत.* ज्या इंग्लिश लोकांस या गोष्टी-विषयीं हिंदुलोकांची सांप्रतकाळीं काय समजूत आहे हें माहीत आहे, त्यांस व पुष्कळ एतद्देशीय लोकांस देखील हें वाचून अचंबा वाटेल,

* [ह्या विधीस " अनुस्तरणी " ह्मणत. त्याचा हेतु मृतास पितृलोकीं दूध मिळवें, किंवा त्यालोकाप्रत जातांना मार्गांत गोमांसाचा रस मिळावा असा होता, असे दोन अर्थ सांगतात.]

परंतु हिचे जे मुद्दे आहेत ते इतके सप्रमाण व निःसंशय आहेत कीं त्यांच्या विरुद्ध क्षणमात्रही बोलतां येत नाहीं. ”

डाक्तर राजेंद्रलाल मित्र यांनीं कोलब्रुक नामक संस्कृत विद्वानाच्या ग्रंथांतून कांहीं उतारे घेतले आहेत ते येणेंप्रमाणें :— “प्राचीनकाळीं पाहुण्याच्या मेजवानीसाठीं गाय कापण्याची चाल होती असें दिसतें, यावरून पाहुण्याला गोघ्न अथवा गाई मारणारा असें नांव होतें.” उत्तररामचरित्रांत सन्मान्य व वृद्ध कवि वाल्मिकी ह्यानें जेव्हां वशिष्ठऋषीचें आगतस्वागत करण्याची तयारी केली तेव्हां त्याला मेजवानीकरितां पुष्कळ गोवत्स ( गायीचीं वासरें ) कापिले. वशिष्ठ तर मूळच्या एका धर्मस्मृतीचा कर्त्ता होता, व त्या स्मृतींत आर्यलोकांनीं धर्माचरण कसें करावें हें सांगितलें आहे; याशिवाय तो वेदप्रसिद्ध ऋषि आहे. आणि जेव्हां वशिष्ठाच्या आश्रमास विश्वामित्र, जनक, शतनंद, जमदग्न्य हे गेले, तेव्हां त्यानेंही गोवत्सांचा वध करून त्यांचें आगतस्वागत केलें.

ऋग्वेदाच्या १ ल्या अष्टकाचा ४६ वा अध्याय व २९ सावा वर्ग यांत इंद्राची प्रार्थना येणेंप्रमाणें केली आहेः — “वृत्रावर आपलें वज्र फेंक, आणि त्यापासून पाऊस पडावा ह्मणून जसा खाटीक गायीचे सांधे सोडवितो त्याप्रमाणें त्याचे सांधे सोडीव.”

पुणें एथील सरकारी हायस्कुलाचे माजी प्रिन्सिपाल मि० माहादेव मोरेश्वर कुंटे, बि. ए. ज्यांनीं षट्दर्शनचिंतनिका नामक एक मासिक पुस्तक चालविलें होतें त्यांनीं The Vicissitudes of Aryan Civilization in India नामक एक इंग्रजी ग्रंथ लिहिला व त्याबद्दल त्यांस बक्षीस मिळालें; त्यांत ते असें ह्मणतात कीं, “ आतिथ्य करणें हा संसारांतील एक नेम होता, आणि अतिथीचा मोठा आदरसत्कार करीत. त्याच्याकारितां मुद्दाम गायी कापीत. ” ( पृ० १९६ )

प्राचीन आर्य लोक आपल्या गायी मोठ्या मोलाच्या मानीत, परंतु जसे सांप्रतकाळचे हिंदु लोक त्यांस देव मानून त्यांची पूजा करितात तसें ते करीत नसत.

**गोमेध** ह्मणजे गायीचा यज्ञ याविषयीं पुढें एका प्रकरणांत सांगण्यांत येईल.

वेदांत मादक मद्याचा उल्लेख आला आहे. ऋग्वेदांतील बहुतकरून सगळें मंडळ सोमरसाच्या स्तुत्यर्थ आहे.

आर्य लोक सुरा नामक द्राक्षारस पीत असत. डाक्तर राजेंद्रलाल मित्र असें ह्मणतात कीं, हिंदुस्थानांत जे अगदीं पहिल्यानें वसाहत करण्याकरितां आलेले ब्राह्मण ते मद्य पिणारांची जात होती, ते सोम नामक बीर आणि नानाप्रकारच्या अमली दारू पीत असत. ते आपल्या देवांस सोमरस हा फार प्रिय, गोड आणि मधुर असें मानून अर्पीत असत. आणि द्राक्षारस किंवा अमली दारू लोकांकरितां दुकानांतून विकीत असत. ऋग्वेदसंहितेंतील एका स्तोत्रावरून असें समजतें कीं, कातड्याच्या बुधल्यांत दारू ठेवून गिऱ्हाईकांस पाहिजे तेवढी विकत देत असत. सौत्रमणी आणि वाजपेय यांत सांगितलेला "सुरा" नामक जो पदार्थ तो तांदळाच्या पिठापासून केलेली दारू होती. रामायणांत महर्षी विश्वामित्र हा वसिष्ठऋषीच्या घरीं गेला असतां त्यानें त्याला मैरेय आणि सुरा या मद्यांची मेजवानी केली. यादव हे अत्यंत मद्यपी होते असें महाभारतांत सांगितलें आहे.

बौद्धधर्माकडून हिंदुस्थानांत मद्यप्राशनाला मांसभक्षणाप्रमाणेंच बराच अटकाव झाला, परंतु त्याच्यानें तें अगदींच बंद करवलें नाहीं.

**लोकांचे वर्ग.**—वैदिक काळांत आर्य आणि अनार्य असे दोन मोठे वर्ग होते, अनार्यांस पुढें शूद्र असें नांव पडलें. आर्यलोकांचे मुख्य धंदे लढाई करणें व लागवड करणें असे होते. ज्यांनीं लढाया केल्या त्यांस पुढें हळु हळु वजन आणि पदवी हीं प्राप्त झालीं, आणि त्यांच्या पुढाऱ्यांस राजे असें ह्मणूं लागले. जे लढाई करीत नसत त्यांस विश, वैश्य किंवा गृहस्थ असें ह्मणत.

प्रथम यज्ञाच्या ठायीं कोणालाही अधिष्ठित होण्याचा अधिकार असे. राजेलोकांनीं आपल्या देवांप्रीत्यर्थ रचलेलीं स्तोत्रें वेदांत आहेत. राजर्षी ह्मणून जे होते त्यांच्याकडे राजांचा आणि उपाध्यांचा असे दोन्ही अधिकार असत. गायत्री मंत्राचा कर्त्ता विश्वामित्र हा क्षत्रिय होता. ब्राह्मण हा प्रथम यज्ञकर्मांस केवळ साह्यकारी असे; पुढें तो पुरोहित

ह्मणजे कुळाचा उपाध्या झाला, आणि तेणेंकरून त्याचें वजन लोकांमध्यें फार वाढलें.

कधीं कधीं लढाई आणि शेतकी हीं दोन्ही कामें एका कुळांत होत असत. मि. कुंटे असें ह्मणतात कीं, " कुलाधिपति आणि त्यांचे पुत्र, व कधीं कधीं पौत्रही (नातु) आपल्या जमिनीची लागवड स्वस्थतेनें करीत, परंतु कारण पडलें असतां आपल्या घोड्यांवर बसून हातांत तरवार धरून आपल्या शत्रूवर चढाई करून जात. अद्याप ब्राह्मणाला तरवार परजण्याचें भय वाटत नव्हतें, किंवा क्षत्रियाला शेत नांगरण्याची लाज वाटत नव्हती. "

वेदाचे काळांत जातिभेद व तत्संबंधी क्षुद्र व असमंजस नियम यांचा विकास झाला नव्हता.

**धंदे व उद्योग.**—"वैदिककाळांतील आर्य लोक जरी शेतकी करीत तरी त्यांचा मुख्य धंदा गुरेंढोरें चारून निर्वाह करण्याचा होता. त्यांच्या गुरांचीं खिल्लारें, मेंढरांचे कळप, त्यांचे घोडे व उंटें, व बैलांची कोहळीं व जोतीं यांविषयीं वेदांत जागोजागीं सांगितलें आहे, आणि त्यांच्यासाठीं देवांच्या व मनुष्यांच्या प्रार्थना व उपकारस्तुतिही केल्या आहेत. त्या लोकांमध्यें फार प्राचीनकाळीं कन्येला **दुहिता** किंवा गवळण ह्मणत. ( इंग्रजी Daughter ह्या शब्दाची उत्पत्ति अशीच आहे. ) आणि **गोप** व गोपाळ किंवा गायी राखणारा ह्याचा पुढें रक्षण करणारा असा साधारण अर्थ झाला, कारण गायी राखणारांची लोकांमध्यें मोठी योग्यता होती.

"गुरांचें रक्षण व्हावें किंवा त्यांनीं भटकून जाऊं नये ह्मणून जीं कुंपणें बांधीत त्यांस **गोत्र** ह्मणत. सांप्रतकाळीं ब्राह्मण आपलें गोत्र सांगून आपण पवित्र वंशाचे व ईश्वरापासून उत्पन्न झालेले आहों असें अभिमानानें ह्मणतात, परंतु तेणेंकरून आपलें पूर्वज गवळी होते याविषयीं हाच शब्द ( गोत्र ) साक्ष देतो हें त्यांच्या ध्यानींमनींही नसतें.

"परंतु हे लोक केवळ पशुचारणजीवी नव्हते हें अगदीं उघड दिसतें. त्यांनीं आपल्या गुरांकरितां जसे गोठे बांधले होते तसेंच त्यांनीं आपल्याकरितां गांव ( ग्राम ) व शहरें ( पुर ) वसविलीं होतीं.

त्यांजमध्यें सुधारलेल्या लोकांचे उद्योग, कलाकौशल्यें, ऐषआरामाचीं व्यसनें, व रीतिभाती होत्या. त्यांस सूत कांतितां व वस्त्रें विणतां येत असे. ते सुतार, लोहार, कांसार यांचे धंदे करीत. त्यांजपाशीं रानांतील झाडें तोडण्याच्या कुऱ्हाडी होत्या. अश्वत्थ, पलाश ( पळस ) व जातजातीच्या बाभळी हीं झाडें त्यांस फार प्रिय असत. दर्भ नांवाचें गवत त्यांच्या यज्ञकर्मांत लागत असे. ते आपल्या रथांचीं लांकडें रंध्यानें साफ करीत, आणि त्यांच्या चाकांस लोखंडाच्या धांवा बसवीत. त्यांस तिख्याचीं कवचें, गदा, धनुष्य, बाण, तरवारी, चक्रें इत्यादि करितां येत. युद्धप्रसंगीं ते शंखध्वनि करून (शंख वाजवून) एकत्र मिळत, ते आपल्या वैदिककर्मांकरितां व संसाराच्या उपयोगासाठीं धातूंचीं भांडीं ह्मणजे पळ्या, पंचपात्रें, घागरी, वाट्या इत्यादि करीत. त्यांच्यामध्यें हजाम होते, त्यांकडून ते आपले केश कातरीत. त्यांस जडावाचे व सोन्यारुप्याचे अलंकार करितां येत होते. ते आपल्या रथांस घोडे व गाड्यांस बैल जुंपीत. त्यांच्या स्वारीचे घोड्यांबरोबर धांवणारे मोतद्दार असत. ते हत्ती बाळगीत, परंतु ते शोभेकरितां किंवा लढाईकरितां होते हें आतां समजत नाहीं. त्यांच्या समाजांत षंढ होते. त्यांच्या गांवांत वेश्या निर्लज्जपणें राहत असत. त्यांच्या बाजारांत कलालांचीं दुकानें असत. ते नानाप्रकारच्या होड्या व गलबतें बांधीत, ते व्यापारासाठीं आपली वस्ती सोडून कांहींसे दूर जात. त्यांच्या स्तोत्रांत समुद्राचें नांव अढळतें, त्याकडे ते सिंधुनदीच्या मागून गेले असतील.” ( रे० दाक्तर जान विलसनकृत India Three Thousand Years Ago नामक ग्रंथावरून संक्षेप. )

नौकागमनाविषयीं आतां जसा ब्राह्मणांनीं हिंदुलोकांस निषेध केला आहे, तसा त्यांच्या आर्यपूर्वजांनीं केला नव्हता. लोकांस आपल्या अखत्यारांत ठेवण्याची ही त्यांची नवीन युक्ति आहे. आर्य लोक इतके सुधारलेले असूनही त्यांस लेखनकला अवगत नव्हती, आणि आतां त्यांच्या वंशजांपाशीं जशीं छापलेलीं बुकें व वर्तमानपत्रें आहेत तशीं त्यांजपाशीं नव्हतीं.

**करमणुकीचे खेळ.**—आर्यलोकांमध्यें जुगार खेळण्याची चाल

फार होती. वेदांत तिच्यावरून पुष्कळ दाखले दिले आहेत. एक सूक्तामध्यें कोणी जुवेबाज आपलाच अनुभव सांगतो असें दिसतें. ऋग्वेद १०. ३४ : —

" माझी सासू माझा अति द्वेष करिते, माझी बायको मला जवळ येऊ देत नाहीं. जर्जर झालेल्या गाडीच्या घोड्याचें सुख जसें मला समजत नाहीं तसेंच जुगाऱ्याचें सुख मला दिसत नाहीं. त्याचा बाप आई, भाऊ हीं ह्मणतात कीं, आह्माला त्याविषयीं ठाऊक नाहीं. त्याला बांधून घेऊन जा. त्यांनीं मला पीडूं नये ह्मणून फांसा हातीं धरूं नं असा मी निश्चय केला, तरी तो पाहतांच स्त्री जशी आपल्या जारापा शीं जाते तसा मी जुवेबाजांच्या टोळींत जातों. जुगाऱ्यांच्या टोळीं येऊन मी जिंकेन काय असें विचारितों. फांसे पाहून त्याच्या तोंडाल पाणी सुटतें. फांसे गळाप्रमाणें टोचतात, सुरीसारखे भोसकतात, पीडे करण्यास त्यांस संतोष वाटतो. आणि जें प्रतिदान ( बक्षीस ) त्यांज पासून मिळतें तें क्षणिक असून ते जिंकणाराचा पुन: नाश करिताव ते ( फांसे ) खालीं गडबडत जातात, ते वर उडतात. त्यांस हात न हींत तरी ज्यांस हात आहेत त्यांस ते जिंकितात. हे स्वर्गीचे कोळ स्वतां थंडगार आहेत तरी तें दुसऱ्याचें काळीज भाजतात. जुगाऱ्याल आपल्या बायकोकडे पाहून दुःख होतें, आणि दुसऱ्याच्या सुखी कुटुंब कडे पाहून त्याचें तें दुःख वाढतें. मला द्रव्य नकोसें नाहीं, परंतु योग्य आहे त्याची मी इच्छा करितों. कधींही जुगार खेळूं नको. शेत की कर. आपली जी जिनगी आहे तेवढी बस आहे असें मानून तिच आनंदानें उपभोग घे."

मि० कुंटे असें ह्मणतात कीं, " यज्ञाच्या समयीं क्षत्रिय विशेषेंकरू आपली बायको किंवा बायका व पुत्र यांसंगतीं जुगार खेळत असे. आर्यलोकांमध्यें नाचे व सोंगाडी होते, त्यांच्या नाचतमाशांकडून आपली करमणूक करून घेत. उषा नामक देवीला अलंकारमंडि नृत्य करणाऱ्या स्त्रीची उपमा दिली आहे. प्रेतयात्रेहून परत आल्या लोक नाचायाला व हंसायाला जातात असेंही एका स्थळीं सांगित आहे. वैदिककाळांत आर्यलोकांपाशीं ढोलकीं होतीं. अथर्ववेदांत ए सूक्त ढोलक्यांविषयीं आहे.

**अपराध.**—वेदाच्या कित्येक स्थळांत वाटमारू, लुटारू व गुप्त रीतीनें चोरी करणारे यांच्याविषयीं उल्लेख आहे. पुशान नामक देवाची अशी प्रार्थना केली आहे कीं, " वाटपाडू, चोर व लुटारू यांस आमच्या मार्गावरून हाकून लाव. " दुसऱ्या एका सूक्तांत असें ह्मटलें आहे कीं, " वस्त्रें चोरून नेणाऱ्या चोराच्या मागून जसें ओरडतात तसें माणसें लढाईंत त्याच्या मागून ओरडतात." गुरांच्या चोऱ्या वारंवार होत असत. ज्या अनार्य मूलप्रजेवर आर्यलोक स्वाऱ्या करायास आले होते तेच बहुधा त्यांचीं गुरें चोरून नेऊन त्यांचा सूड उगवीत. परंतु आर्यलोकही अशा प्रकारचा त्रास न व्हावा ह्मणून हुशार राहत असत. गुरांचा कळप नाहींसा झाला ह्मणजे ते मोठी ओरड करीत, आणि पावलांच्या खुणांवरून चोर धरून काढणारीं हुशार मनुष्यें त्यांच्या मागें पाठवीत, कळप हातीं लागला ह्मणजे मोठ्यानें इंद्राची उपकारस्तुति गात तो हाकून घरीं आणीत.

**लढाया.**—ऋग्वेदांत लढायांचे जागोजाग उल्लेख आहेत. याचें कारण बहुधा गायी व घोडे हीं होतीं. इंद्राची येणेंप्रमाणें प्रार्थना केली आहेः—"हे इंद्रा, आह्मी गायी व घोडे यांच्याकरितां लढाईस जात असतां तुझा धांवा करितों." मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, "वेदांत गायींच्यामध्यें किंवा गायींकरितां लढणाऱ्या वीराला 'गोषुयुधं' (वीर) ह्मटलें आहे, व तेंच नांव योद्ध्यासही साधारणतः दिलें आहे. (ऋ. १. ११२. २२.) लढाईचें एक अति साधारण नांव "गविष्टि" असें आहे, त्याचा शब्दार्थ 'गायींकरितां झुंज' असा होतो."

आर्यलोकांच्या युद्ध करण्याच्या रीतीचें मि. कुंटे यांनीं येणेंप्रमाणें वर्णन केलें आहेः—

"आर्यांच्या निरनिराळ्या टोळ्या आपापल्या नायकांच्या हुकुमाखालीं आपल्या बावट्यांसुद्धां आपल्या वडिलांचे पराक्रम गात व इंद्र किंवा बृहस्पति यानें दिलेल्या सहायाची स्तुति करीत चालून जात. त्यांचे सेनानायक गोचर्माच्छादित रथांत बसून जात; त्यांतून कित्येकांपाशीं धनुष्यबाण असत, व कित्येक भाले वाळगीत. सैन्याचे पायदळ व स्वार असे दोन भाग होते. बहुधा टोळीचा नायक एखाद्या गांवावर

हल्ला करून सर्व गांवकऱ्यांची कत्तल करून तो हस्तगत करून घे
कधीं कधीं असें न करितां मोठी लूट मिळाली ह्मणजे त्यांची तृप्ति
होत असे. याप्रमाणें बहुत आर्यनायक एकमेकांचें सहाय न घेतां
दस्यु व दास यांच्याशीं युद्ध करीत, व तेही आपल्यावर स्वारी करणाऱ्यां
शीं टक्कर देण्यास समर्थ असत."

**मृतांची व्यवस्था.**— पारशी लोक व हिंदुस्थानांतील आर्य लोक यांचे पूर्वज जोंपर्यंत एकत्र राहत असत तोंपर्यंत ते आपल्या मेलेल्यांची प्रेतें गिधाडानें खावीं ह्मणून उघडीं ठेवीत असें वाटतें. आर्य लोक हिंदुस्थानांत आल्यावर ते आपल्या मृतांस पुरूं लागले. डाक्तर राजेंद्रलाल मित्र असें ह्मणतात कीं, "ही चाल ते हिंदुस्थानांत आल्यावर खि. पू. ... व्या शतकापर्यंत चालत आली असावी. नंतर प्रेत दहन क... त्यानंतर रक्षा पुरण्याची चाल निघाली.* ती खि. पू. १६ किंवा १... शतकापासून खि. श. आरंभापर्यंत चालून बंद पडली, किंवा तिच्या ज... गीं नदींत राख टाकण्याची चाल निघाली."

---

## वैदिक देव.

**वर्गीकरण.** — वेदाची निरुक्त नामक जी टीका आहे तिचा कर्त्ता यास्क असें ह्मणतो कीं, " तीन देव आहेत ह्मणजे अग्नि, त्याचें स्थान पृथ्वी; वायु किंवा इंद्र, त्याचें स्थान अंतरिक्ष; आणि सूर्य, त्याचें स्थान आकाश." हे देव जसे एकाच याजकास निरनिराळ्या यज्ञांच्या ठायीं निरनिराळीं नांवें मिळतात तसे एक असतील, अथवा

---

* [ प्राचीन आर्य आपल्या मृतांचीं प्रेतें पुरीत असत याविषयीं वेदांत कांहीं सूचना स... पडतात. प्रेत खांचेंत ठेवीत. खांचेला मातीचें घर ( मृन्मयगृहं ) ह्मणत. त्या क्रियेच... वेळीं भूमीची अशी प्रार्थना करीत:—

उच्छ्वंचस्व पृथिवि मानिबाधथाः सूपायनास्मै भवसूपवंचना। माता पुत्रं य... सिचाभ्येनं भूम ऊर्णुहि ॥ ऋग्वे. १०.१८.११.)

अर्थ—" हे भूमी, आपले बाहू वर करून ह्या मृतास घे. त्याजवर फार भार घालूं नक... प्रीतीनें त्याचें स्वागत कर. आई आपल्या प्रिय बालकास वस्त्रानें गुंडाळती तसें ह्याला ममत... गुंडाळ." प्रेताच्या खांचेवर एक स्तंभ किंवा खांब स्थापीत त्याला " स्थूणा" ह्मणत. त्या... रक्षण पितरांनीं करावें अशी प्रार्थना करीत. "-हिंदुधर्माचें स्वरूप, भाग २. ]

कदाचित् भिन्नभिन्नही असतील, कारण त्यांच्या प्रार्थना व नांवें हीं भिन्नभिन्न आहेत." ह्यापैकीं पाहिली कल्पना तर ऋषींची नव्हती, आणि जे लोक यात्रेच्या व उत्साहाच्या समयीं त्यांचीं गाणीं ऐकत त्यांसही असें वाटलें नाहीं.

यास्क हा आपल्या ग्रंथाच्या उत्तरभागांत ह्या देवांचे पृथ्वींतील, अंतरिक्षांतील, व द्युलोकांतील असे तीन वर्ग करितो.

**संख्या.**—वेदांत "तीनपट अकरा" देव सांगितले आहेत. "आकाशांत जे अकरा देव आहेत, पृथ्वीवर जे अकरा देव आहेत आणि (अंतरिक्षांतील) जलांत अकरा देव आहेत, ते देव हो, ह्या आमच्या यज्ञानें संतुष्ट व्हा." "हे अग्नि, तुझ्या परिपाठाप्रमाणें तीन व तीस देवांस त्यांच्या पत्न्यांसहित इकडे आणून त्यांस संतुष्ट कर."

ऋग्वेदांत (३. ९, ९) अग्नीची येणेंप्रमाणें स्तुति केली आहे;— "तीनशें, तीन हजार, आणि एकुणचाळीस देवांनीं अग्नीची उपासना केली."

**उत्पत्ति व अमरत्व.**—वेदांत देव अमर आहेत असें ह्मटलें आहे, परंतु ते स्वयंभु आहेत असें सांगितलें नाहीं. पुष्कळ ठिकाणीं त्यांची कुळी सांगितली आहे.

देवांच्या उत्पत्तीचें वर्णन निरनिराळ्या प्रकारें केलें आहे. पृथ्वी आणि आकाश हीं देवांचीं मातापितरें होत असें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. उषा (पहाट) हिला देवांची माता ह्मटलें आहे; ब्रह्मणस्पति ह्याला त्यांचा बाप ह्मटलें आहे. सोमापासून आकाश, पृथ्वी, अग्नि, सूर्य, इंद्र आणि विष्णु हे झाले असें सांगितलें आहे. ज्या देवांस एका ठिकाणीं दुसऱ्या देवांचे बाप ह्मटलें आहे तेच दुसऱ्या ठिकाणीं त्यांचे पुत्र मानिले आहेत. इंद्राविषयीं अत्यंत चमत्कारिक गोष्ट सांगितली आहे ती अशी कीं, इंद्रानें आपल्या आईबापांस उत्पन्न केलें. यावर मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, "ज्या देवाच्यानें एकदां असें करवलें त्याला मागाहून सर्व कांहीं करितां आलें असेल यांत संशय नाहीं."

सावित्री व अग्नि यांनीं देवांस अमर केलें असेंही कित्येक स्थळीं सांगितलें आहे. दुसऱ्या ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, अमरत्व प्राप्त होण्याकरितां देव सोमरस प्राशन करिते झाले. परंतु साधारण मत असें आहे कीं, तपाच्या योगानें ते देवत्व पावले. प्रारंभीं सर्व देवांचें सामर्थ्य सारखें होतें. परंतु त्यांपैकीं इंद्र, अग्नि व सूर्य ह्या तिघांच्या मनांत इतरांपेक्षां श्रेष्ठ व्हावें असें आलें; आणि हा इच्छितार्थ प्राप्त होईपर्यंत ते यज्ञ करिते झाले.

देवांचें अमरत्व सापेक्ष आहे ह्मणजे तें स्वतंत्र नाहीं, ते इतर प्राण्यांप्रमाणें नाशास पात्र आहेत. सहस्रावधि इंद्र व इतर देव, काळें करून प्रत्येक युगामध्यें होऊन गेले.* मनुष्यांप्रमाणें देवांसही मुक्तीची ह्मणजे जन्ममरणापासून सुटण्याची इच्छा आहे व ते मुक्त होण्याजोगे ही आहेत. आतां कित्येक मुख्य देवांचें वर्णन करितों.

---

## द्यौस् आणि पृथिवी.

द्यौस् हा आर्यलोकांचा अत्यंत प्राचीन देव होता, अशी कल्पना होते. याविषयीं मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, "ह्या एकोणिसाव्या शतकांत प्राचीन मानवी इतिहासासंबंधीं मोठ्या महत्वाचा कोणता शोध लागला असें जर मला कोणी विचारिलें तर ह्या पुढील लहान्‍शा ओळींत माझें उत्तर आहे:—

संस्कृत **द्यौस् पितर** = ग्रीक, **झियुस् पेतर**, लाटिन **जुपितर** = प्राचीन नार्स **टिर.**

"ह्या समीकरणांत कोणता अर्थ गर्भित आहे याचा विचार करा. त्यांत असा अर्थ आहे कीं, केवळ आमचेच पूर्वज नाहीं, परंतु होमर व सिसिरो ( ग्रीक व रोमन ) यांचेही पूर्वज हिंदुस्थानांतील लोक जी भाषा बोलत असत तीच भाषा बोलत; हा शोध आरंभीं जरी विश्वसनीय वाटला, तरी आतां त्याविषयीं कोणाला अचंबा वाटत नाहीं; तरी त्या

---

[* ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत ह्मणजे प्रातःकालापासून अस्तमानपर्यंतच्या कालांत चौदा इंद्र होऊन जातात."—भारतवर्षीय कोश. ]

26307

चा अर्थ हाच आहे कीं, त्या सर्वांचा एकच धर्म होता, आणि कांहीं काळपर्यंत ते एकाच नांवाच्या ईश्वराची भक्ति करीत असत. ह्या नांवाचा अर्थ 'आकाश-पिता' असा होतो."

सि. किंग्सले ह्मणतो कीं, "ते साधे, भोळ्या अंतःकरणाचे आपले पूर्वज या पृथ्वीवर सर्वत्र दृष्टि फ़ेंकून आपल्या ठिकाणीं ह्मणत कीं, 'तो सर्वपिता, तो सर्वात्मा, जर कोठें असला तर कोठें बरें असेल ? या पृथ्वींत तर नाहींच. कारण या पृथ्वीचा तर नाश होणार. सूर्य, चंद्र, नक्षत्रें यांतही तो नाहीं, कारण त्यांचाही नाश होणार, तो निरंतन भगवान् कोठें आहे बरें ?' असें ह्मणून ते दृष्टि वर करीत, आणि सूर्य, चंद्र, नक्षत्रें व जें कांहीं विकार पावतें किंवा पुढें पावणार त्याच्यापलीकडे जें स्वच्छ, नीलवर्ण आकाश तें त्यांनीं पाहिलें व त्याचा तो अपार विस्तीर्ण घुमटही त्यांनीं पाहिला, तेव्हां त्यांस वाटलें— 'हा घुमट, हें आकाशमंडल कधींही बदललें नाहीं. तें निरंतर जशाचें तसेंच राहतें. मेघ, वारे व या जगांतल्या उलाढाली इत्यादि प्रकार खालीं चाललाच आहे; तरी तें आकाश नित्याप्रमाणें शांत व सुप्रकाशित असतें. तो निश्चल, निर्विकार 'विश्वपिता' आकाशांतच असला पाहिजे! आकाशासारखाच प्रकाशमान्, पवित्र आणि अनंत; व आकाशाप्रमाणेंच शांत, स्तब्ध, व अत्यंत दूर असला पाहिजे.'"

यावर मोक्ष मूलर असें विचारितात कीं, "त्या विश्वपित्यास कोणत्या नांवानें बरें ते हाक मारीत ?"

"आर्य लोक पांच हजार किंवा त्याहून अधिक वर्षांपूर्वीं ह्मणजे संस्कृत, ग्रीक किंवा लाटीन हे भाषाभेद जेव्हां मुळींच नव्हते, तेव्हां त्याला 'दियु-पेतर' = आकाश पिता, असें ह्मणत.

"जे आर्य चार हजार किंवा त्याहूनही अधिक वर्षांच्यापूर्वीं, पंजाबांतील नद्यांच्या दक्षिणेस येऊन वसले, ते त्यास 'द्यौः + पिता' किंवा आकाशपिता असें ह्मणत.

"तीन हजार वर्षांपूर्वीं किंवा त्याच्याही पूर्वीं हेलस्पांटच्या किनाऱ्यावर वसलेले आर्य त्यास 'झ्यूस + पेतर = आकाशपिता, असें ह्मणत.

"दोन हजार वर्षांपूर्वी इटालींतील आर्यांनीं उंच, प्रकाशमान, उज्ज्वल आकाशाकडे पाहून त्यास 'ज्यु + पितर' = आकाशपिता असें ह्मटलें.

"एक हजार वर्षांपूर्वी याच आकाशपित्याची व विश्वपित्याची प्रार्थना जर्मनींतील निबिड घोर अरण्यांत आपल्या स्वतांच्या पूर्वजांनीं ह्मणजे ट्युटानिक आर्यांनीं केली, त्या वेळीं त्यांनीं उच्चारलेलें त्याचें प्राचीन नांव '**तियु**' किंवा 'झियो' हेंच होतें." (मोक्ष मूलरकृत धर्मविषयक व्याख्यानें, म. भाषांतर पृ. १२०,१२१).

"द्यौस् (आकाश) हा आर्यलोकांचा परम श्रेष्ठ (परमेश्वर) देव होता. याविषयीं वेदांतील कित्येक सूक्तांत स्पष्ट मुद्दे पत्ते मिळतात.

तथापि त्या काळाच्या मागून लवकरच भूमीला पृथिवी या नांवाची देवता मानून तिला द्यौस् ह्या देवाशीं जोडलें. ["हे वेदांतील जोडदेव होते. त्यांचें नांव द्यावापृथिवी (पृथ्वी व आकाश) असें पडलें." ऐतरेय ब्राह्मणांत त्यांच्या लग्नाविषयीं सांगितलें आहे :—"देवांनीं त्या दोघांस (आकाश व पृथ्वी) एकत्र आणिलें; आणि जेव्हां तीं एकत्र आलीं तेव्हां देवांनीं त्यांचें लग्न लाविलें."

प्राचीन ग्रीक लोकांची हीच कल्पना होती. पृथ्वीला "देवांची माता व तारामंडळाची स्त्री" ह्मटलें आहे. त्यांच्या लग्नाचेंही वर्णन त्यांच्या ग्रंथांत केलेलें आहे.

हिंदुलोकांस आपले देव आपल्यासारिखेच आहेत असें वाटल्यावरून त्यांनीं आकाश व पृथ्वी यांस देवांचीं मातापितरें ह्मटलें.

द्यौस् व पृथिवी यांच्या उत्पत्तीविषयीं वैदिक सूक्तांत अनेक कल्पना आहेत. एक विचारांत पडलेला ऋषि असें विचारितो कीं, "ह्यांपैकीं पहिला कोण आणि शेवटला कोण? तीं कशीं उत्पन्न झालीं? ऋषिहो, हें कोणास ठाऊक?"

---

### वरुण.

द्यौस् याप्रमाणें वरुण हा सर्व वस्तूंस वेष्टणारें जें अति उंच आकाश त्याचा दुसरा एक प्रतिनिधि आहे. ह्याच्या नांवाची उत्पत्ति 'वर' ह्मणजे आच्छादणें ह्या धातूपासून आहे. हा शब्द व ग्रीक भाषेंचा

"औरानस" (आकाश) हे दोन्ही एकच आहेत. ऋग्वेदांत असें ह्मटलें आहे कीं, "वरुणानें विस्तीर्ण अंतरिक्षें चिरून दुभागलीं. त्यानें तेजस्वी व प्रकाशवान् आकाश वर उचलिलें." अथर्ववेदांत वरुणाला अपार ज्ञान आहे असें सांगितलें आहे:—

"ह्या लोकांचा ( भुवनांचा ) महाप्रभु वरुण, जवळ असल्याप्रमाणें पाहतो. जर कोणी मनुष्य चालतो किंवा उभा राहतो अथवा लपून राहतो; जर तो निद्रायास जातो अथवा उठतो; जर दोन मनुष्यें एकत्र बसून एकमेकांच्या कानांत बोलतात; राजा वरुण तें जाणतो; तेथें तिसरा तो आहे. ही पृथ्वीही राजा वरुणाची आहे; आणि हें विशाळ आकाश परस्परांपासून दूर असलेल्या त्याच्या सीमासुद्धां त्याचेंच आहे. जो आकाशाच्या पलीकडे पळून जाईल तो देखील राजा वरुणापासून सुटणार नाहीं. त्याचे दूत ( हेर ) स्वर्गांतून निघून पृथ्वीकडे येतात, सहस्र नेत्रांनीं ते ह्या पृथ्वीकडे पाहतात. स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यामध्यें जें काय आहे, आणि त्याच्या पलीकडे काय आहे तें सर्व वरुण राजा पाहतो. त्यानें मनुष्यांच्या डोळ्यांचीं निमिषें मोजलीं आहेत. खेळणारा जसे फांसे खालीं टाकतो त्याप्रमाणें तो सर्व ठरवितो."

ज्यावर उत्तम प्रकारचें नीतीचें वर्तन आरोपिलें आहे असा वैदिक देव केवळ वरुणच होय. या कारणामुळें पापाची क्षमा व अंतःकरणाची शुद्धता प्राप्त होण्याकरितां ज्या थोडक्या प्रार्थना वेदांत आहेत त्या वरुणाच्या आहेत. त्यांचीं उदाहरणें पुढें दिलीं जातील.

कित्येक वेदमंत्रांत वरुणाला **आदित्य** किंवा अदितीचा पुत्र ह्मटलें आहे. अदिति हा शब्द **अ** ( नाहीं ) व **दिति** ( बांधलेला ) या दोन अवयवांपासून झाला आहे. त्याचा अर्थ अपार असा होतो.

प्राचीन ऋषींनीं अदितीला "अपार", "पलीकडच्या अंगचा" ह्मणजे आकाश व पृथ्वी यांच्या पलीकडे जें कांहीं आहे तें असें मानून त्याचें आव्हान केलें आहे, परंतु अदितीपेक्षां आदित्यांविषयीं वारंवार उल्लेख आढळतो; ह्या आदित्यांचा शब्दार्थ अदितीचे पुत्र ह्मणजे एका अर्थानें अनंत देव ( बहुवचनीं ) असा होतो. वरुण हा त्यांपैकीं एक आहे. दुसरे मित्र, अर्यमन, दक्ष इ० आहेत.

मित्र हा देव बहुधा वरुणदेवाशीं जोडलेला आहे. मित्र हा दिवसाचा दर्शक असा सूर्याचें एक रूप आहे; वरुण हा रात्रीचा दर्शक

आहे, ते दोघे मिळून पृथ्वी व आकाश यांस आधार देतात व चालवितात, पृथ्वीचें रक्षण करितात, धर्मास प्रोत्साहन देतात आणि आपल्या पाशानें अपराध्यास धरितात.

पुराणांत वरुणाचें हें सर्व वैभव हिरावून घेतलें आहे; व तो केवळ समुद्राचा देव असा वर्णिला आहे. महाभारतांत त्यानें उतथ्य याची स्त्री भद्रा हिचें हरण केलें असें सांगितलें आहे.

## इंद्र.

हिंदुलोकांचे देव राजे जसे थोडा काळ राज्य करून आपली गादी दुसऱ्यास देतात त्याप्रमाणें आहेत. मोक्ष मूलर ह्मणतो कीं, आपणांस वैदिक धर्मरूप चित्राच्या मागल्या प्रदेशीं आकाश आणि पृथ्वी ह्या दोन महाराक्षसांची छाया दृष्टीस पडते, ते कांहीं काळ आपली सद्दी चालवून आपल्यापेक्षां तरुण व विशेष मोहक अशा देवांच्या प्रकाशापुढें अदृश्य होतात.

आर्य लोक आपल्या मूळच्या देशांत होते त्या काळीं नीलवर्ण आकाश किंवा नक्षत्रमंडल ह्यांचे दर्शक असे द्यौस् व वरुण हे परम श्रेष्ठ देव होते. जेव्हां ते हिंदुस्थानांत आले तेव्हां तेथें त्यांस असें दिसून आलें कीं एथल्या प्रदेशावर महिन्याचे महिने पावसाची एकही सर न पडतां सूर्याच्या रखरखीत उन्हांत तो तळमळत राहतो, असा कीं जमिनीची नांगरणी करणें अथवा बीं पेरणें हें त्या काळांत अशक्य होतें. अशा अवस्थेंत त्यांनीं ज्या देवाच्या हातांत मेघगर्जना व वीज आहे, ज्याच्या आज्ञेनें पृथ्वीला फलदायक करणारी अशी वृष्टि होते, अशाची वारंवार प्रार्थना करावी व त्याचीं स्तुतिपर गायनें गावीं यांत नवल नाहीं. इंद्र हा वेदांतील अत्यंत लोकप्रिय देव आहे. डाक्तर मलन्स असें ह्मणतात कीं, " उष्णकाळाच्या रणरणीत महिन्यांत प्राचीन आर्य लोक इंद्राकडे वळतात. हवेंत थंडावा आणणाऱ्या अशा पर्जन्यवृष्टीची सर्व वाट पाहतात. तिला त्या देवाचा व त्याचा शत्रु जो वृत्र ( अनावृष्टि ) तो दाबून ठेवितो. आणि शेवटीं जेव्हां

पश्चिमेकडील क्षितिजावर वाफा दाट जमत जातात आणि इच्छित बादळ मोठ्या थाटानें कोसळतें, जेव्हां डोळे अंधळे करणारी धूळ उंच खांबाप्रमाणें मोठ्या डौलानें गरगरां वर चढते, आणि जेव्हां मेघ चिरून आंत प्रवेश करणाऱ्या नीलवर्ण विजेचा झकझकाट त्यांच्या दृष्टीस पडतो, आणि भयंकर मेघगर्जनांचा कडकडाट त्यांस ऐकूं येतो, तेव्हां इंद्र व त्याचे मरुत आकाशांत आपणांकरितां युद्ध करीत आहेत असें त्यांस वाटतें. आणि जेव्हां हाकून आणलेला पर्जन्य घनदाट मेघांतून जलवर्षाव करितो आणि तें जल पृथ्वी प्राशन करिते तेव्हां सकल सृष्टीचें पुनरुज्जीवन होतें. शेतें कोवळ्या ताज्या हिरवळीनें आच्छादित होतात, आणि पक्षी आनंदाचें गाणें गाऊं लागतात; असें झालें ह्मणजे हा सर्व इंद्राचा पराक्रम आहे अशी ते कल्पना करीत, आणि त्याचे उपकार मानून त्यानें आणखी कल्याणकारक वस्तु आपणांस द्याव्या अशी प्रार्थना करीत.

वेदांत कित्येक ठिकाणीं मेघांस गायींच्या कळपांची उपमा दिली आहे व ते कळप राक्षसांनीं चोरून नेऊन गुहेंत लपविले असें सांगितलें आहे. मग इंद्र त्यांचा शोध लावितो व आपल्या वज्रानें गुहा फोडून गायी मोकळ्या करितो; नंतर त्यांच्या सडांपासून पर्जन्यवृष्टि होऊं लागते.

इंद्राच्या कुळीचे वेदांत निरनिराळे वृत्तांत सांगितले आहेत. अथर्ववेदाच्या एका सूक्तांत (३.१०,१२) एकाष्टका ही त्याची आई होती असें सांगितलें आहे. ऋग्वेदांत (१०.९०,१३) तो पुरुषाच्या मुखापासून अग्नीच्या बरोबर निघाला असें ह्मटलें आहे. तिसऱ्या एका सूक्तांत (ऋग्वे० ९.९६,५) तो सोमापासून उत्पन्न झाला असें ह्मटलें आहे. महाभारतांत इंद्र हा कश्यपाच्या पुत्रांपैकीं होता असें सांगितलें आहे.

इंद्राला द्यौस् देवापेक्षां श्रेष्ठत्व दिलें आहेः—"इंद्रापुढें त्या दैविक द्यौस् (आकाशानें) नमस्कार केला, इंद्रापुढें त्या महान् पृथ्वी (भूमी)नें नमस्कार केला, इंद्राचें ऐश्वर्य उदयास येतांच द्यौस् कंपायमान झाला, हे इंद्रा, तुझ्या क्रोधाच्या भयानें पृथ्वी कंपित झाली." इंद्र पिवळ्या

घोड्यांची जोडी लावलेला रथ हांकितो. वज्र हें त्याचें आयुध आहे, मेघधनुष्य हें त्याचें धनुष्य आहे. मरूत (वादळाचे वारे) हे त्याचे सोबती आहेत. हिंदूंच्या इतर देवांप्रमाणें त्याला बायको आहे, तिचें नांव इंद्राणी.

इंद्राला लढाईची मोठी आवड आहे व सोमरस फार प्रिय आहे असें वेदांत सांगितलें आहे.

इंद्र बालक असतांच त्याच्याठायीं युद्ध करण्याचे गुण दिसूं लागले असें ह्मटलें आहे. "इंद्र जन्मतांच, वृत्रासुराचा वध करणारा आपलें धनुष्य हातांत धरून, ज्यांची भयंकर योद्धे अशी कीर्ति गाजते ते कोण आहेत? असें आपल्या आईस पुसूं लागला." सोमरसाविषयीं त्याची आवड त्याच समयीं दिसण्यांत आली. "ज्या दिवशीं तूं जन्मलास त्याच दिवशीं तूं डोंगरांत वाढणाऱ्या सोमवल्लीचा रस प्राशन करिता झालास."

वैदिक स्तोत्रांत इंद्राला त्याचे उपासक तान्हेल्या काळविटाप्रमाणें (८. ४, १०) किंवा निर्जल अरण्यांत भ्रमण करणाऱ्या बैलाप्रमाणें (९. ३६, १) सोमरस प्राशन करण्यास बोलावितात. सोमरस प्राशन केल्यावर इंद्राला जो आवेश येत असे त्याचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

"जो सोमरस मी झोकला तो मला वाऱ्याच्या झपाट्याप्रमाणें पुढें लोटतो. पांचजन मला केवळ कुसळाप्रमाणेंही भासत नाहींत. माझें मोठेपण ह्या आकाशापेक्षां व पृथ्वीपेक्षां मोठें आहे." (ऋ. १०. ११९)

[सोमरस पितांना इंद्र बैलांचें व रेड्यांचें मास खात असे असेंही वर्णन वेदांत आहे. ऋग्वे० १०. २८, ३ पाहा.]

अशा प्रकारें सोमप्राशनानें मस्त झाल्यावर इंद्र लढाईस जातो. ऋग्वे० १. ५३. यांत इंद्राचे कित्येक पराक्रम वर्णिले आहेत:—

६ "हे सज्जनांच्या पालका (इंद्रा), तूं जेव्हां जेव्हां स्तोत्यासाठीं आणि यज्ञकर्त्या उपासकासाठीं, दशसहस्त्रावधि अनिवार शत्रु मारून टाकिले आहेस, तेव्हां त्या त्या शत्रुहननाच्या प्रसंगीं त्या त्या उपासकांनीं अर्पिलेल्या मादक पेयांनीं, आणि बळकटी आणणाऱ्या हवींनीं आणि सोमरसांनीं तुला हर्ष होत होता."

७ "हे इंद्रा, तूं जेव्हां नमुची नांवाच्या कपटी असुरास तुझा सखा नमी याच्या सहाय्यानें मारून टाकून दिलेंस, त्या प्रसंगीं धैर्यवान् असा जो तूं

युद्धामागें युद्धाला धांवलास, आणि आपल्या प्रतापानें त्या नगरामागून हें नगर अशा रीतीनें त्याचीं नगरें विध्वंसिता झालास."

**मरुत.**–किंवा तुफानाचे वारे हे इंद्राचे सखे व सोबती होते. "त्यांच्या रथांस ठिपक्याच्या हरिणी जोडलेल्या असत, आपल्या अंगांत ते तेजस्वी कवच घालतात, त्यांच्या हातांत भाले असतात; ते कोठून येतात व कोठें जातात हें कोणाला समजत नाहीं; ते झपाट्यानें येत असतां त्यांची वाणी ऐकायाला येती. त्यांच्या समोर पृथ्वी कांपती आणि पर्वत हलतात."

आर्य लोक जोंपर्यंत अनार्य लोकांशीं तुंबल युद्ध करण्यांत गुंतले होते तोंपर्यंत इंद्र त्यांचा श्रेष्ठ देव होता, परंतु जेव्हां त्यांनीं त्यांस जिंकिलें तेव्हां इंद्रानें आपलें पद दुसऱ्या देवांस दिलें. पुराणांत इंद्र स्वर्गीं राज्य करितो असें सांगितलें आहे, परंतु त्याला आपलें राज्य कोण घेईल असें भय आहे. त्यानें व्यभिचार केल्याच्या पुष्कळ कथा सांगितल्या आहेत. त्यानें आपला गुरू गौतम याची पत्नी अहल्या हिला फुतलावून भ्रष्ट केलें असें महाभारतांत सांगितलें आहे. ह्या गुरूच्या शापानें इंद्राच्या अंगीं सहस्र भगें पडलीं, व त्याला सयोनी असें नांव मिळालें, परंतु पुढें त्याच ऋषीच्या उःशापानें त्या भगांचे मोराचे डोळे होऊन त्याला सहस्रनेत्र असें नांव मिळालें.

---

## अग्नि.

विस्तवाचा जो देव तो अग्नि. विस्तवाला लाटिनभाषेत 'इग्नीस' ह्मणतात. अग्नि हा वेदांतील एक अत्यंत अग्रवर्ती देव होय. एका इंद्राचीं खेरीजकरून अग्नीचीं जितकीं स्तोत्रें वेदांत आहेत तितकीं दुसऱ्या कोणत्याही देवाचीं नाहींत.

मनुष्यांच्या अस्तित्वाला अग्नीची गरज आहे. अग्नीकडून अन्न शिजवितां येतें. त्याकडून रात्रीं काम चालवितां येतें. त्याकडून हिममय देशांत मनुष्यें हिवानें थिजून मरण न पावतां जगतात. प्राचीनकाळीं आगीच्या काड्या नव्हत्या तेव्हां अग्नीनें देवासारिखें भय बाळगीत असत. काष्ठाच्या घर्षणानें अग्नि उत्पन्न करणें, अथवा विजेच्या रूपानें

अग्नीनें खालीं येणें, हें लेकराच्या जन्माप्रमाणेंच आश्चर्यकारक मानीत असत. वेदाच्या मंत्रांत अग्नीला सर्व देवांपेक्षां उत्तम व कृपालु मानून स्तविलें आहे; स्वर्गांतून खालीं पृथ्वीवर आलेला असा तो एकच देव मनुष्याचा सखा, देवाचा दूत, देव व मनुष्यें यांच्यामध्यें मध्यस्थ, मर्त्यजनांमध्यें अमर, असा तो वर्णिला आहे. तो आर्यांच्या वस्तीचें रक्षण करितो, आणि काळ्या कातडीच्या शत्रूस भय दाखवून हाकून लावितो, असेंही त्याविषयीं वेदांत ह्मटलें आहे.

परंतु पुढें अग्नीविषयीं कवीची कल्पना बदलली. प्रकाश व उष्णता हे जे अग्नीचे गुण त्यांवर अग्निदेवतेचा आरोप झाला, यामुळें चुलींतील व वेदीवरील अग्नीला देव मानूं लागले इतकेंच नव्हे, तर पहाट, सूर्य आणि सूर्याच्या पलीकडचा प्रांत यांतही अग्निदेव आहे असें कल्पूं लागले. तसेंच त्याची शक्ति भूमीचीं फळें परिपक्व करण्यांत (किंवा ज्यास तें शिजाविणें ह्मणत त्यांत) आहे, व मनुष्य शरीराची उष्णता व जीव ह्यांचा तो पोषक आहे असें मानूं लागले. अशा विचारानें सृष्टींतील इतर शक्तींप्रमाणें अग्नि हा ईश्वराच्या श्रेष्ठपदास चढला. त्यानें आकाश व पृथ्वी हीं पसरलीं असें ह्मणूं लागले (ऋग्वे० ३. ६, ५). हें ह्मणणें साहजिक होतें, कारण त्याच्या प्रकाशावांचून आकाश व पृथ्वी हीं अदृश्य व अव्यक्त अशीं झालीं असतीं. दुसरा कवि ह्मणतो कीं, अग्नीनें आपल्या प्रकाशानें स्वर्ग वर उचलून धारिलें (ऋ. ३. ५, १०), आणि दोन्ही लोक वेगळे वेगळे ठेविले (६. ८, ३). शेवटीं अग्नि हा स्वर्ग व पृथ्वी यांचा पिता (ऋ० १. ९६, ६) आणि पृथ्वीवर जें कांहीं उडतें, चालतें, व उभें राहतें अथवा हलतें त्या सर्वांचा निर्माणकर्त्ता असा झाला (१०. ८८, ८).—मोक्ष मूलर.

*अग्नीची उत्पत्ति निरनिराळ्या प्रकारें सांगितली आहे. त्याला द्यावापृथिवी यांचा पुत्र ह्मटलें आहे. तो ब्रह्माचा ज्येष्ठ पुत्र; ह्या नात्यानें त्याचें अभिमानि असें नांव आहे. तो कश्यप व अदिति यांच्या पुत्रांपैकीं असल्यामुळें त्याला (एक) आदित्य देव ह्मटलें आहे. वेदाच्या मागून झालेल्या ग्रंथांत अग्नि हा पितरांचा राजा अंगिरस याचा पुत्र होता असें सांगितलें आहे. कधीं कधीं इंद्र, विष्णु, वरुण, रुद्र, सरस्वती इ०

देव अग्निरूप आहेत असें ह्मटलें आहे (ऋ० २. १. ३-११). अग्नीमध्यें सर्व देवांचा समावेश होतो ( ५. ३, १ ).

अग्नीची भक्ति प्रातःकाळीं विस्तव पेटवून करीत. कुटुंबांतील सर्व मनुष्यें त्याला आपला मित्र व सखा मानून प्रेमभावानें व भयानें त्याच्या भोंवतीं जमत. तो दृश्य असून सर्व देवांस मनुष्यांचीं हवनें घेऊन जाणारा असा देव होता. त्याच्या थोर मनाची स्तुति करीत, तो देव होता तरी तो आपला थोरपणा एकीकडे ठेवून मनुष्यांच्या घरांत येऊन बसत असे. सूर्यास्त झाला ह्मणजे पहाट होईपर्यंत मनुष्यांचें रक्षण करण्यासाठीं केवळ अग्निदेव मात्र एकटा पृथ्वीवर राहत असे. त्याचीं किरणें चहूंकडे फांकून अंधारांतील राक्षसांचा नाश करीत. अग्नीस अर्पण करण्याचें योग्य द्रव्य घृत किंवा तूप असे. तें अग्नीच्या ज्वाळांत शिंपडलें ह्मणजे त्या वर वर चढतात, व त्यांचा भडका होतो. असें झालें ह्मणजे अग्निदेवानें हविरन्न भक्षण केलें व आपण तृप्त व संतुष्ट झालों असें दर्शविलें असें त्याच्या उपासकांस वाटे.

त्याच्या नांवांमध्यें 'त्याला तुपाची फार आवड आहे' अशा अर्थाचीं पुष्कळ नांवें आहेत, जसें सर्पिरासुति (तुपानें पूजिलेला), घृतान्न ( तूप ज्याचें अन्न आहे ), घृतकोश, घृतपृष्ठ, इ०. ज्या गरीब उपासकांस अग्नील रोजरोज तूप खायास देण्याचें सामर्थ्य नसे ते थोडींशीं लांकडें जाळून त्याची उपासना करीत.

[अग्नीचे उपासक त्यावर प्रीति करीत व त्याचें भय धरीत, तरी ते त्याला कधीं कधीं भोळे भावानें खोंचूनही बोलत. एक ऋषि त्याला असें ह्मणतो कीं, "हे अग्नि, जर मी तूं असतों, आणि तूं मी असतास, तर मी तुझ्या आशा पूर्ण केल्या असत्या." (ऋग्वे० ८. ४४, २३.) "हे अग्नि, जर तूं मानव असतास, आणि मी, जो तूं मित्रसंपन्न आहेस, तसा देव असतों तर मी तुला अरिष्टाच्या किंवा दरिद्रावस्थेच्या स्वाधीन केलें नसतें. माझे उपासक दरिद्री, दुःखी किंवा विपत्तींत पडलेले असे राहिले नसते." (८. १९, २५, २६.) ह्या दोन वचनांचें मूळ येणें-प्रमाणें आहेः—यदग्ने स्यामहं त्वं त्वं वा घा स्या अहं । स्युष्टे सत्या इहाशिषः ॥ यदग्ने मर्त्यस्त्वं स्यामहं मित्रमहो अमर्त्यः । सहसः सूनवा-

हुत । न त्वा रासीयाऽभिशस्तये वसो न पापत्वाय संत्य । न मे स्तोतामतीवा न दुर्हितः स्यादग्ने न पापया ॥ ]

[ एक अग्न्युपासक असें ह्मणतो कीं हा असा कसा विलक्षण देव, तो जन्मल्याबरोबर आपल्या आईबापांस खात सुटतो. त्याची वाढही चमत्कारिक आहे. जिच्यानें त्याला थान पाजवत नाहीं अशा आईपासून तो जन्मतो ( ऋग्वे. १०. ७९, ४; ११५, १ ). ]

ऋग्वेदाचें पहिलें सूक्त अग्नीविषयीं आहे.

## सूर्य देवता.

वेदामध्यें सूर्याला सूर्य आणि सवितृ ( सविता ) अशा नांवांनीं स्तविलें आहे. कधीं त्याला द्यौस् याचा पुत्र आणि कधीं अदितीचा पुत्र ह्मटलें आहे ( ऋग्वे० १०. ८८, ११; ८. ९०, ११ ). एका स्थळीं उषा ( पहाट ) हिला त्याची बायको ह्मटलें आहे ( ७. ७५, ५ ), व दुसऱ्या स्थळीं तीं त्याची आई मानिली आहे ( ७. ७८, ३ ). सूर्याला पुष्कळ बायका होत्या. सूर्याविषयीं अलीकडील ग्रंथांत ज्या कथा आहेत त्यांपैकीं एक अशी आहे कीं, त्याचे दोन जुवळे पुत्र अश्विनी, जे उषेच्या पूर्वीं सोन्याच्या रथांत बसून येतात, ते त्याला जी वनदेवता घोडीच्या रूपानें लपून राहिली होती ह्मणून अश्विनी असें नाम पावली तिच्या ठायीं झाले. सूर्याची दुसरी बायको संज्ञा हिला त्याचा प्रकाश सहन होईना ह्मणून तिचा बाप विश्वकर्मा यानें त्याचा कांहीं भाग कापून टाकिला. त्याचे जळते तुकडे होऊन ते पृथ्वीवर पडले, त्यांचे विश्वकर्म्यानें विष्णूचें चक्र, शिवाचें त्रिशूल व दुसऱ्या देवांचीं शस्त्रें केलीं! सूर्य सात घोड्यांच्या रथांत बसतो आणि जेव्हां तो आपले घोडे रथापासून सोडतो तेव्हां रात्र सर्व प्राणिमात्रांवर आपलें वस्त्र पसरते; असें वर्णन आहे.

**मित्र** हें सूर्याचें दुसरें नांव होतें. त्याची वेदांमध्यें वरुणाच्याबरोबर वारंवार प्रार्थना केली आहे. विष्णु हा मूळचा एक सौर्य देव होता, हें तो तीन पाउलें टाकतो अशा वर्णनावरून दर्शविलें आहे. प्रातःकाल हें त्याचें पहिलें पाऊल, मध्यान्हकाल हें दुसरें पाऊल, व सायंकाल हें तिसरें पाऊल. परंतु अर्वाचीन ग्रंथांत हें त्याचें स्थूल रूप बदललें आहे. पूषा किंवा पुषन् हें धनगरास दिसणाऱ्या सूर्याचें नांव होतें.

बकरे हे पूषन् याचे घोडे होते. त्याच्या हातांत पराणी किंवा बैल हाकण्याची काठी असे.

सूर्याला एका श्रेष्ठ देवाची पदवी हळु हळु कशी प्राप्त झाली हें मोक्ष मूलर यांनीं येणेंप्रमाणें सांगितलें आहेः—

"प्रथमारंभीं आपण असा विचार करूं कीं जो हा सूर्यप्रकाश नित्य प्रातःकाळीं निद्रावश झालेल्या मनुष्यांस उठवितो, आणि केवळ मनुष्यांसच काय तर सर्व बाह्यसृष्टीस चेतना देतो व तिचें जणूं पुनरुज्जीवन करितो असें भासतें, त्यास थोड्याच काळांत प्रतिदिनीं 'प्राणदाता' अशी संज्ञा प्राप्त झाली.

"दुसरें असें कीं, पुढें पुढें याच्याही पलीकडे लोकांची कल्पना वाढत गेली. जो रोज उजेड देणारा, व जो रोज चेतना देणारा तो एकंदर प्रकाशाचा व चैतन्याचा दाता होऊन राहिला. जो आज प्रकाश व चैतन्य घेऊन येत आहे तोच अगदीं प्रथमारंभीं ह्मणजे सृष्टीची उत्पत्ति झाल्यावर अगदीं पहिल्या दिवशीं प्रकाश व चैतन्य घेऊन आला. प्रत्येक दिवसाच्या आरंभीं जसा प्रकाश असतो त्याचप्रमाणें सृष्टीच्या आरंभींही प्रकाश होता. सारांश, जो सूर्य प्रथम केवळ प्रकाश घेऊन येणारा व चैतन्य देणारा होता तोच कांहीं वेळानें या जगताचा स्रष्टा व थोड्याच काळानें जगाचा नियंताही झाला."

"तिसरें.—सूर्य रात्रीचा भयंकर काळोख हाकून लावितो, व पृथ्वीस फलवती करितो, यामुळें 'सर्व सचेतन वस्तूंचा रक्षणकर्त्ता' असें नांव सूर्यास मिळालें.

"चौथें.—सूर्यास प्रत्येक वस्तु दिसते व समजते, ह्मणून त्याला एकट्यालाच जें जें समजलें आहे त्याजबद्दल क्षमा करण्यासाठीं व तें विसरून जाण्यासाठीं त्याची प्रार्थना केलेली अढळते."

सूर्याची भक्ति आजपर्यंत चालत आहे. त्याच्या उदयकालीं भक्तिनिष्ठ ब्राह्मण त्याप्रीत्यर्थ गायत्रीमंत्र जपतात. ह्या लहानशा मंत्रांत जादूप्रमाणें सामर्थ्य आहे असें त्यांस वाटतें. तो येणेंप्रमाणें आहेः— "तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्"॥ ह्याचा अर्थ निरनिराळा करितात. अगदीं अलीकडला अर्थ येणेंप्रमाणें आहे :—

"उत्पादक जो त्याचें देदीप्यमान तेज आम्हांस मिळो, जो देव यश देईल त्याचें." ह्यांत केवळ धर्मकर्म सिद्धीस जावें ह्मणून सूर्याची प्रार्थना आहे. स्कंदपुराणांत गायत्रीचें सामर्थ्य येणेंप्रमाणें वर्णिलें आहेः—

" वेदांमध्यें गायत्रीपेक्षां दुसरें कांहीं श्रेष्ठ नाहीं. जसें काशीसारखें दुसरें क्षेत्र नाहीं, तसें गायत्रीपेक्षां दुसरा मंत्र ( प्रार्थना ) श्रेष्ठ नाहीं. गायत्री ही वेदांची व ब्राह्मणांची माता आहे. तिचा जप केल्यानें मनुष्य मुक्ति पावतो. गायत्रीच्यानें होणार नाहीं असें काय आहे? कारण गायत्री ही विष्णु, ब्रह्मा, शिव आणि तीन वेद आहे."

## सोम.

सांप्रत काळचे हिंदुलोकांचे आचार त्यांच्या प्राचीन वैदिक पूर्वजांच्या आचारांपासून दोन गोष्टींत फार निराळे आहेत. एका आचाराविषयीं आम्ही वर सांगितलेंच आहे. प्राचीन आर्य लोक मोठ्या आवडीनें गोमांस भक्षण करीत असत, तें आतां त्यांच्या वंशजांस अत्यंत ओंगळ वाटत आहे. दुसरा आचार मादक पदार्थांच्या सेवनाविषयीं बदलला आहे. ऋग्वेदांतील बहुतकरून एक सगळ्या ग्रंथां ( मंडलां ) तील ११४ सूक्तांत सोमाची स्तुति आहे. याशिवाय दुसऱ्याही पुष्कळ भागांत त्याची पुष्कळ स्तुति केली आहे. प्राचीन आर्य लोक आनंदानें मद्यप्राशन करीत, परंतु आतांचे त्यांचे वंशज शाहणपणानें मादक पदार्थांस स्पर्श करीत नाहींत.

आर्य लोकांस सोम प्राशन करणें आवडत असे इतकेंच नाहीं, तर त्यांचे देवही तें पेय सेवन करण्याविषयीं अत्यंत आतुर असत असें त्यांचें वर्णन केलें आहे. सोमाची भक्ति कशी चालू झाली याविषयीं प्रोफेसर व्हिटनी येणेंप्रमाणें लिहितातः—

ज्या साध्याभोळ्या आर्यलोकांचा धर्म सृष्टीच्या आश्चर्यकारक शक्ति व सृष्टींतील चमत्कार यांची भक्ति करण्यांत होता त्यांनीं जेव्हां पाहिलें कीं, सोमरसामध्यें मन आल्हादित करण्याची आणि क्षणभर माद आणण्याची शक्ति आहे, आणि त्याच्या अमलाखालीं मनुष्याला आपल्या शक्तीपलीकडच्या कामें करण्याची चेव व सामर्थ्य येतें, तेव्हां त्यांनीं अशा वल्लीमध्यें कांहीं ईश्वरी अंश आहे असा तर्क केला. ती

एक देवताच आहे, आणि जे कोणी तिच्या रसाचें सेवन करितात त्यांस तो ईश्वरी सामर्थ्य देतो असा त्यांचा समज झाला. ज्या रोपापासून हा रस काढीत तो सर्व वनस्पतींचा राजा झाला. रस काढण्याच्या प्रकारास यज्ञ मानूं लागले, तो काढण्याचीं उपकरणें ह्मणजे पाटा, वरवंटा इ०, व तो पिण्याचीं पात्रें ह्मणजे चमचे, वाट्या वगैरे वस्तु ह्या देवता झाल्या.

सोम ही एक वल्ली (वेल) आहे, तिला पांढरीं, बारीक व सुवासिक फुलें येतात. तिच्यापासून दुधासारिखा पांढरा रस निघतो. तो उमळला ह्मणजे मादक होतो. सोमाचीं जीं स्तोत्रें आहेत तीं त्याचा रस काढते वेळीं व तो स्वच्छ करिते वेळीं गाण्याचीं गीतें होतीं.

सोमवल्ली कशी मिळाली याविषयीं अनेक कथा आहेत. वेदाच्या कित्येक स्थळांत सोम डोंगरांतून आणून इंद्रास दिला असें सांगितलें आहे, दुसऱ्यांत सोमराज गंधर्वांमध्यें राहत होता असें सांगितलें आहे. तिसरी कथा अशी आहे कीं, सोम स्वर्गांत राहत असतां गायत्रीनें पक्ष्याचें रूप घेऊन तो पृथ्वीवर आणिला.

सोम देवांकडे आणिल्यावर प्रथम त्याचा घोट कोणी घ्यावा याविषयीं कलह उत्पन्न झाला. पुढें असें ठरलें कीं, धांवण्याची पैज लावावी, आणि जो ती जिंकेल त्यानें सोमाचा पहिला घोट घ्यावा. ह्या धांवण्यांत वायु पणाच्या जागीं पहिल्यानें पोंचला, त्याच्यामागून इंद्र.

सोमवल्लीच्या रसांत अमरत्व आहे व देवांस तो अत्यंत प्रिय आहे. सोमाची देवता नग्नास वस्त्र देते, व रोग्यास निरोगी करिते. त्याच्या योगानें अंधळे दृष्टि पावतात, आणि लंगडे चालूं लागतात. त्याच्या ठायीं अनेक दैवी गुणांचा आरोप केला आहे. त्यास देव मानून त्याची परमादरानें स्तुति केली आहे. त्याच्या ठायीं सर्व शक्ति आहेत. तो सर्व प्रकारचे वर देण्यास समर्थ आहे असें मानून त्याजपाशीं ते मागितलेही आहेत. स्वर्गसुखाकरितां त्याची येणेंप्रमाणें प्रार्थना केली आहेः—"हे शुद्ध केलेल्या देवा, जेथें सनातन प्रकाश व तेज आहे अशा शाश्वत व अविनाशी लोकाच्या ठायीं मला स्थित कर (ठेव)."

[यत्र ज्योतिरजस्त्रं यस्मिँल्लोके स्वर्हितं । तस्मिन्मां धेहि पवमानामृते लोके •इ० ऋग्वे० ९. ११३, ७.]

आधुनिक काळांत चंद्राला सोम हें नांव दिलें. ज्या काळीं विष्णु-पुराण लिहिलें त्या काळीं मादक पदार्थ सेवन करण्याविषयीं अगदीं कडकडीत निषेध होता, यामुळें सोमाला पूर्वींच्या सोमवल्लीची देवता या संबंधानें कोणी जाणत नव्हते व स्तवीतही नव्हते. पौराणिक कथांमध्यें सोम हा ब्रह्मदेवाचा पुत्र अत्री याचा पुत्र आहे.

प्राचीन ग्रीक लोकांमध्यें बाखस नांवाचा मद्यदेव होता.

## कः—कोण?

मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, "जे शब्द ईश्वरी व्यक्तीस लावण्याची पूर्वीं योजना नव्हती त्यांतून नवे देव खरोखर उत्पन्न केले. खरा किंवा सर्वांहून शक्तिमान देव कोण असे प्रश्न ऋग्वेदांतील कित्येक मंत्रांत आहेत. प्रत्येक यज्ञविषयक स्तोत्रांत कवीनें उद्देशलेली अशी एक देवता असलीच पाहिजे असा एक नेम लावून दिला होता; आणि या नेमाला अनुसरून जेथें देवता नव्हती तेथें ती शोधून काढण्याकरितां एखादी दानाची वस्तु, मृदंग, नगारा किंवा ताशा, दगड, झाडें इ० पदार्थांस देवाची बनावट पदवी देत. ह्याच पद्धतीला अनुसरून पूर्वकालचीं स्तोत्रें काव्यरसानें भरलेलीं आहेत, व कवींची ओढ अज्ञात देवाकडे लागली आहे. हें विसरून ब्राह्मणांचे कर्त्यांनीं त्यांत जें प्रश्नार्थक सर्वनाम होतें त्यालाही देव करून सोडिलें, आणि कः किंवा कोण हा एक देव आहे असें समजूं लागले." कित्येक ग्रंथांत कः हा प्रजापति आहे असें ह्मटलें आहे, पुराणांत एक मान्य केलेला देव, परम श्रेष्ठ देव, असा वर्णिला असून त्याची वंशावळीही सांगितली आहे; कदाचित् त्याला बायकोही असेल. महाभारतांत दक्ष हाच कः आहे असें सांगितलें आहे, आणि भागवतांत कश्यपाला हें नांव दिलें आहे.

## देवी.

वेदांत कित्येक देवींचीं नांवें अढळतात; परंतु पृथिवी, अदिती व उषा यांच्या खेरीज त्या विशेष महत्वाच्या मानिल्या होत्या असें दिसून

येत नाहीं. सरस्वतीची देवी व नदी ह्या द्विविध संबंधानें स्तुति केली आहे. अग्नि, वरुण, अश्विनी यांच्या बायकांचीं नांवें सांगितलीं आहेत, परंतु त्यांच्या कामांविषयीं कांहीं उल्लेख नाहीं. देवींचें हें लघुत्व अर्वाचीन देवमंडळांतील शिवाची बायको पार्वती हिच्या गुरुत्वाशीं ताडून पाहिलें असतां मोठें आश्चर्य वाटतें.

## पितर.

पितरांविषयींचें पुढील वर्णन मोक्ष मूलर यांच्या "India, What can it Teach us?" या नांवाच्या पुस्तकावरून घेतलें आहे:—

"इतर ठिकाणाप्रमाणें हिंदुस्थानांत मनुष्याच्या अंतःकरणांत अणखी एक विश्वास फार लवकर स्वाभाविक रीतीनें उत्पन्न झाला, तो असा कीं, आपलीं आईबापें हें जग सोडून गेल्यावर पलीकडच्या अंगाचा जो प्रदेश त्या प्रदेशीं जातात, मग तो प्रदेश जेथून सर्व दिव्य देव आल्यासारिखे दिसतात, अशी जी पूर्व दिशा तेथें, अथवा ज्याला वेदामध्यें यमलोक किंवा सूर्यास्त होण्याची जागा ह्मटलें आहे अशी जी पश्चिम दिशा, जेथें ते गेल्यासारखे भासतात, तेथें असो. जे प्राणी एकदां जीवंत होते ते कधीं नाहींसे होणार नाहींत. ही कल्पना अद्याप त्यांच्या मनांत शिरली नव्हती; आणि आपले वाडवडील जरी आतां आपल्या दृष्टीस पडणार नाहींत, तरी ते कोठें तरी आहेत ह्या विश्वासापासून दुसऱ्या एका पलीकडच्या प्रदेशाची कल्पना व दुसऱ्या एका धर्माचें बीज हीं उत्पन्न झालीं.

"तसेंच पितरांचें सामर्थ्य ते मरण पावल्यावर अदृश्य अथवा नष्ट होतें अशी त्यांची समजूत नव्हती. ते आपल्या कुळाचे नेम (कायदे) व आचार यांच्या रूपानें जणूं काय त्यांच्यामध्यें वागत वर्त्तत आहेत असें त्यांस वाटे. जेव्हां ते जीवंत व शक्तिमान होते तेव्हां त्यांची इच्छा हाच त्यांचा कायदा असे; आणि त्यांच्या मरणानंतर नेम किंवा आचार यांसंबंधी एखाद्या गोष्टीविषयीं वाद उत्पन्न झाला तर त्याचा निकाल करण्यासाठीं पितरांचें स्मरण किंवा अधिकार यांसच न्यायाधीश मानून त्यांच्याकडे तो न्यावा व त्यांच्या ठरावास मान्य व्हावें—त्यांची इच्छा हाच कायदा मानावा हें स्वाभाविक होतें."

"मनु ह्मणतो कीं, आपले पितृपितामहादिक ज्या शास्त्रार्थाप्रमाणें चालले तोच आपण आचरण करावा, पितृपितामहादिकांनीं आचरित अशा मार्गानें जाणारा अधर्मी होत नाहीं. " ( ४. १७८ )

"वेदांत देवांबरोबर पितरांची प्रार्थना केली आहे, परंतु देव आणि पितर यांस चुकून देवांच्या जागीं मानिलें नाहीं. देव कधीं पितर झाले नाहींत. त्या उभयतांची उत्पत्ति निरनिराळी आहे.

" ऋग्वे. ६. ५२. ४, यांत असें लिहिलें आहे कीं, 'उदय पावणारी उषा माझें रक्षण करो, वाहणाऱ्या नद्या माझें रक्षण करोत, अचल पर्वत माझें रक्षण करोत'. देवांच्या ह्या धांव्यांत ' पितर माझें रक्षण करोत ' यावरून स्पष्ट दिसतें कीं, उषा, नद्या, व पर्वत हीं सर्व जरी एकाच देवाहुतींत ( देवांच्या धांव्यांत ) घातलीं आहेत, तरी पितर हे त्यांपासून निराळे धरिले आहेत.

" तथापि पितरांचे दोन वर्ग होते ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. पहिल्या वर्गांत दूरचे, अर्धवट स्मरणांत राहिलेले, आणि देवतादिकांच्या कथांत मिळून गेलेले असे जे कित्येक कुळांचे पूर्वज त्यांचा समावेश होतो, अथवा वैदिक कवींच्या मतें सकल मनुष्यजातीचे पूर्वज, यांचा समावेश होतो; आणि दुसऱ्या वर्गांत नूतन मरण पावलेले असे स्वकीय पूर्वज ज्यांची आठवण कवींस असून ते त्यांस पूज्य होते.

" जुने पूर्वज देवांसारिखे झालेले होते. ते मृतांचा राजा जो यम त्याच्या लोकाप्रत पावून कित्येक देवांच्या समागमांत राहतात असे वर्णिले आहेत.*

" ऋग्वेदांत पितरांस यज्ञास बोलाविण्याचीं स्तोत्रें आहेत, त्यांपैकीं एक येणेंप्रमाणें आहे:—

१ सोमप्रिय पितर, खालचे, अगदीं वरचे व मधले उठोत. सौम्य व धार्मिक पितर, जे (पुनः) जीवंत झाले आहेत ते आमच्या आव्हानांत आमचें रक्षण करोत.

*[ वैदिक ग्रंथांत व त्यांच्या अलीकडील स्मृति, पुराणें इ० ग्रंथांतही पितरांचा वर्ग मनुष्याच्या पूर्वी प्रजापतीनें उत्पन्न केला असें सांगितलें आहे. तैत्तिरीय ब्राह्मण २. ३, ८. २; मनु. १. ३७. विष्णु पु. १. २. पाहा. मृत झालेल्या पूर्वजांविषयींची कल्पना त्या कल्पनेच्या मागून निघाली. हिं. ध. स्व. भाग २, पृ. १०२ पाहा. ]

४ पितरहो, जे गवतावर बसतां ते आपलें सहाय घेऊन या ! तुमच्याकरितां आह्मी अर्पणें सिद्ध केलीं आहेत.

३ सोमप्रिय पितरांस गवतावर मांडलेलीं त्यांचीं प्रिय मिष्टान्नें भक्षण करण्याकरितां आमंत्रिलें आहे. ते जवळ येवोत, ते श्रवण करोत, ते आशीर्वाद देवोत, ते आमचें रक्षण करोत."

ब्राह्मणांच्या धर्मकर्मांत जे पंचमहायज्ञ सांगितले आहेत त्यांमध्यें पितृयज्ञ आहे, तो प्रत्येक विवाहित ब्राह्मणानें नित्य केला पाहिजे.

ब्राह्मणें व सूत्रें यांजमध्यें पितरांच्या पूजेचा बारीक तपशील सांगितला आहे. तसेच भारतादि काव्यग्रंथ, मन्वादि धर्मशास्त्रें, आणि पुराणें यांजमध्यें पितरांची पूजा ओतप्रोत भरली आहे. हिंदुस्थानांतील सामाजिक इमारत, व वारसासंबंधी कायदे, व लग्नसंबंधी नियम यांचा पाया पितरांच्या अस्तित्वाच्या विश्वासावर रचलेला आहे.

प्रोफेसर भट्टाचार्य (Tagore Law Lectures) असें ह्मणतात कीं, कोणत्या ना कोणत्या प्रकारची पितरांची भक्ति करणें हाच ज्याला हिंदु धर्म ह्मणतात त्याचा आदि, मध्य, व अंत आहे.

## यज्ञाचीं उपकरणें इ०.

वैदिक सूक्तांमध्यें अनेक वस्तूंवर ईश्वरी गुणांचा आरोप केला आहे. यूप किंवा यज्ञपशु बांधण्याचा खांब याचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

"१ हे वृक्षराजा, तुला देवकामीं ऋत्विज लोक यज्ञांत दैव्य मधूनें माखतात. तूं उभा अथवा या (भूमि) मातेच्या मांडीवर निजलेला अस, तूं आह्माला धनसंपदा दे."

"२ पेटविलेला अग्नीच्या पूर्वेला उभा राहिलेला आणि अविनाशी तसेंच वीरसंतानयुक्त अन्न देणारा आणि शत्रूला आम्हापासून दूर हांकून लावणारा असा जो तूं, तो महा भाग्य देण्यासाठीं उभा ठाक."

"३ हे वृक्षराजा, तूं पृथिवीच्या उंच प्रदेशीं उभा ठाक. कुशलतेनें उभारलेला असा जो तूं, तो यज्ञ अर्पण करणाऱ्या यजमानाला वैभव दे."

"६ ज्या तुह्माला देवकामी पुरुष रोविते झाले, अथवा हे वृक्षराजा, ज्या तुह्माला कुऱ्हाड कापिती झाली, ते दैदीप्यमान आणि उभे राहिलेले तुह्मी यूप आह्माला संतानयुक्त संपत्ति द्या."

एक सगळें स्तोत्र बाणास आर्पिलें आहे. "मंत्रांनीं पाजवलेल्या बाणा, सोडल्याबराबर उडून जा; जा, शत्रूमध्यें उतर; एकाही शत्रूला सोडूं नको." अथर्ववेदांत पळी (जुहू)ची मोठी स्तुति केली आहे.

"जी उंच जातीची पळी तिची आम्ही निंदा करीत नाहीं, आम्ही ह्या काष्ठमय उपकरणाचा मोठेपणा प्रतिपादन करितों. पळीनें आकाश स्थापिलें आहे." (अथर्व० १८. ४,९)

उखळाची प्रार्थना येणेंप्रमाणें केली आहे:—

"हे वनराजा, जसा तुझ्यासमोर वारा वाहतो, त्याप्रमाणें तूं इंद्रास पिण्याकरितां सोमरस सिद्ध कर."

आणि यज्ञांत लागणारें कुश नामक गवत स्वर्ग आणि पृथ्वी यांस आधार आहे, आणि वसु किंवा गायी इच्या ठायीं चमत्कारिक गुण आहेत असें ह्मटलें आहे.

एक स्तोत्र बेडकांविषयीं आहे, त्याचा शेवट येणेंप्रमाणें आहे:—

"गायीच्या स्वराचे, ठिपकेदार, हिरव्या रंगाचे बेडूक आम्हाला संपत्ति देवोत; आम्हाला शतावधि गायी देवोत; सहस्र अंकुरांच्या ऋतूंत बेडूक आम्हास दीर्घायु करोत." (गोमायुरदादजमायुरदात्पृश्निरदाद्धरितो नो वसूनि। गवां मंडूका ददतः शतानि सहस्रसा वे प्रतिरंत आयुः॥ऋ.वे.७.१०३,१०)

## उपासक व देव यांचा परस्पर संबंध.

प्राचीन आर्य लोक वरूण देवाला त्याचें तेज व सत्त्व यांमुळें भीत असत; परंतु त्याचें पद इंद्रानें घेतलें. त्याला ते महा पराक्रमी, आणि आपल्या बरोबर सोमपान करणारा असा मानूं लागले.

आर्य लोक आपल्या देवांस कसें मानीत असत याविषयीं रेव० के. एस. मॅकडोनल हे येणेंप्रमाणें लिहितातः— "त्यांचा संबंध फार सलगीचा असे. त्यांस आपल्या देवांची प्रीति किंवा भय होतें असें नाहीं. ते पवित्र किंवा शुद्ध अथवा आत्मिक आहेत असें त्यांस वाटत नसे. ते आपल्या सारिखेच, परंतु आपल्यापेक्षां अधिक पराक्रमी असून आपल्याचसारिखे दुर्बल वासनांस व तृष्णांस वश आहेत,

अशी त्यांची समजूत होती. सोमरस, तूप, घोडे इत्यादि वस्तु ज्या आपणांस आवडतात त्या आपल्या देवांस विशेष आवडतात असें त्यांस वाटे. सोमरस प्राशन केल्यापासून जें बळ व चेव त्यांस येई अथवा येतें असें त्यांस वाटे तें त्यांच्या देवांसही तो प्याल्यानें अतिशय येई अशी त्यांची कल्पना होती. उपासक आपला देव वरूण यास मधु व दुसरे मिष्ट पदार्थ अर्पण करी, आणि मग त्याची अशी प्रार्थना करी कीं, "आतां गुणास ये, आणि आपण पुनः बोलूं," "आपण पुनः एकमेकांशीं बोलूं, कारण मी आपला मध आणिला आहे." "तुला जें आवडतें तें तूं उपाध्याप्रमाणें खातोस." दुसऱ्या एका सूक्तांत वशिष्ठ इंद्रास ह्मणतो कीं, "कुरणांतील दुभत्या गायीप्रमाणें तुझें दूध काढायाची इच्छा धरून वशिष्ठानें आपल्या प्रार्थना तुजकडे सोडिल्या आहेत." (धेनुं नत्वा सूयवसे दुधुक्षन्नुप ब्रह्माणि ससृजे वशिष्ठः । ऋग्वे० ७.१८.४.)

## वैदिक धर्मांत बहुदेवमत आहे.

एकेश्वर मत ह्मणजे एकच देव आहे असें मानणें; बहुदेवमत ह्मणजे अनेक देव आहेत असा विश्वास धरणें. मोक्ष मूलर ह्मणतात कीं, वेदांत एकेश्वर मत नाहीं. ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाच्या २७ व्या सूक्ताचा शेवट येणेंप्रमाणें आहे:—"मोठ्या देवांस नमस्कार असो. लहान देवांस नमस्कार असो. तरूण देवांस नमस्कार असो. ह्मातान्या देवांस नमस्कार असो. ज्यापेक्षां आह्मांस शक्ति आहे त्यापेक्षां आह्मी देवांस भजूं या, आणि हे देवांनो, कोणत्याही एकाद्या जुन्या देवाच्या स्तुतींचा अतिक्रम मजकडून होऊं देऊं नका." [नमो महद्भ्यो नमो अर्भकेभ्यो नमो युवभ्यो नम आशिनेभ्यः । यजाम देवान्यदि शक्नवाम मा ज्यायसः शंसमा वृक्षि देवाः ]

देव अकरात्रिक (३३) आहेत असें वारंवार वेदांत ह्मटलें आहे हें आह्मी मागें सांगितलेंच आहे. प्रोफेसर व्हिटनी असें ह्मणतात कीं, वेदाचीं बहुतेक सूक्तें वैदिक देवमंडळांतील देवतांची स्तुति करण्यांत तल्लीन झालीं आहेत; आणि एकाच देवाचीं हीं अनेक रूपें आहेत अशी जी (ब्राह्मणांची) कल्पना ती त्यांच्या गांवीं मनीं देखील नाहीं."

बहुदेवमत अनेक प्रकारचें आहे. प्राचीन ग्रीक व रोमन लोकांमध्यें देवांचा क्रम कमीजास्ती व्यवस्थेनें लाविला होता, त्यांची शक्ति व पदवी निरनिराळी होती, आणि ते सर्व झियस किंवा ज्युपितर याच्या अधिकाराखालीं होते. परंतु वेदांत एका शाखेच्या उपासकांनीं जो देव सर्वांहून श्रेष्ठ असा मानिला तो दुसऱ्या शाखेच्या उपासकांच्या देवाच्या शेजारीं बरोबरीच्या नात्यानें उभा राहतो. त्यांत कोणी सर्वदा पहिला किंवा कोणी सर्वदा शेवटला असा नाहीं. जे देव खरोखर कनिष्ठ प्रतीचे व समर्याद सामर्थ्याचे होते ते देखील एकाद्या भक्तिनिष्ठ कवीच्या नजरेंत इतर देवांहून श्रेष्ठपद पावले आहेत. वेदांत प्रत्येक देव मुख्य व स्वतंत्र असा वर्णिलेला सांपडणें अगदीं कठीण नाहीं. अशा देवांचीं स्तोत्रें असंख्य आहेत. वास्तविक पाहतां केवळ एकच मुख्य होऊं शकतो, परंतु अत्यंत परस्पर विरुद्ध अशा गोष्टी मान्य करायाला हिंदु लोकांस कांहीं अडचण दिसत नाहीं. ते अनेक देव मानीत असतांही त्यांतून एकास आपलें विशेष आराध्य दैवत असें निवडून घेऊन त्याला सर्वांहून श्रेष्ठ मानायाला त्यांस दिक्कत वाटत नाहीं.

ऋग्वेदाचीं सूक्तें रचणारे अनेक ऋषि असून त्यांस तीं रचण्यास शेंकडों वर्षें लागलीं. या कारणास्तव वेदांतील ईश्वरज्ञान अनेक स्थळीं परस्परविरुद्ध झालें आहे. कित्येक सूक्तांत बहुदेवमत अगदीं ढळढळीत दिसून येतें, कांहीं स्तोत्रांत तें धुंद दिसतें, आणि कित्येक स्तोत्रें अशीं आहेत कीं, जर तेवढींच मात्र वेदांत असतीं तर त्यांत एकेश्वरी मत आहे असें ह्मणण्यास हरकत नसती.

मोक्ष मूलर यांचें असें मत आहे कीं, "आर्य लोक वेदाच्या काळापूर्वीं एकेश्वरी होते, आणि जेव्हां ते अनेक देवांची भक्ति करूं लागले, तेव्हां ते एक देवाचें स्मरण विसरले नाहींत, त्यांच्या मूर्तिसेवेसंबंधी बोलण्याच्या थाटणींत जसें चालत जाणाऱ्या अभ्रांखालीं निळें आकाश झांकलेलें असतें तद्वत एक व अनंत देवांचें स्मरण असल्याचें दिसण्यांत येतें."

ज्याला आर्य लोक द्यौसपितर=आकाश—बाप ह्मणत त्याची ते फार प्राचीनकाळीं भक्ति करीत असतील; परंतु वैदिक काळांत ते अनेक

देवांस भजूं लागले याविषयीं संशय नाहीं. मोक्ष मूलर अणखी असें ह्मणतात कीं, "देव ह्मटलेली उपास्य पात्रांची फार मोठी संख्या उत्पन्न झाली, सर्व जग त्यांकडून भरलें, आणि सृष्टीचें प्रत्येक कर्म,—मग तें भूमीवरील असो किंवा अंतरिक्षामधील असो, अथवा परमउच्च अशा स्वर्गांतील असो, तें त्यांच्या कृतीनें घडतें असें मानूं लागले. आपण ज्याला गडगडतें असें ह्मणतों त्याला ते 'इंद्र गर्जना करितो' असें ह्मणूं लागले. आपण पाऊस पडतो असें ह्मणतों त्याला ते 'पर्जन्य घागरी ओतितो' असें ह्मणत; पहाट होत आहे अशा ह्मणण्याऐवजीं 'सुंदर उषा नृत्य करणाऱ्या स्त्रीसारखी आपलें लावण्य दाखवीत आहे'; अंधार होत आहे अशा आपल्या भाषणाच्या जागीं 'सूर्य आपल्या रथाचे घोडे सोडीत आहे' असें ह्मणत. वैदिक कवींस सर्व सृष्टि जीवमय दिसत असे, आणि जिकडे तिकडे देव सर्वत्र विद्यमान आहेत असें त्यांस वाटे."

एकाच मुळापासून उत्पन्न झालेल्या देवांचीं थोडका काळपर्यंत सद्दी चालल्यावर ते एकमेकांत मिळून गेले. द्यौस् हा सर्वत्र असणाऱ्या प्रकाशादाखल आकाश होता. वरुण हा सर्वव्यापक आकाश होता. मित्र प्रभातकाळचें प्रकाशित झालेलें आकाश होता. सूर्य हा आकाशांत प्रकाशणारा रवि होता. सविता हा प्रकाश व जीवन आणणारा सूर्य. विष्णु हा तीन पादांनीं आकाशाचें आक्रमण करणारा सूर्य. इंद्र हा पर्जन्याचा दाता असा आकाशांत प्रगट झाला, आणि मरुत हे वादळांतून आकाशक्रमण करीत चालले. वात आणि वायु हे अंतरिक्षांतील वारे होते. अग्नि हा विस्तव व उजेड होता.

यामुळें सर्वदा असें होई कीं, एका देवाविषयीं जें सांगितलें जाई तेंच दुसऱ्याही देवाविषयीं सांगण्यांत येई. एका देवाचे नांवाचे बहुतजण वांटेकरी होत, एका देवाच्या कथा अनेक देवांविषयीं सांगण्यांत येत असत.

कित्येक प्राचीन ऋषि तर असें ह्मणतात कीं, एक देव व दुसरे देव एकच आहेत. अथर्व वेदांत ( १३. ३,१३ ) असें म्हटलें आहे कीं, " अग्नि संध्याकाळीं वरुण होतो, तो प्रातःकाळीं उगवतांना सूर्य होतो, तो सावित्र होऊन आकाशामधून जातो. तो इंद्र होऊन आ-

काश मध्यभागीं उष्ण करितो." सूर्य, इंद्र व अग्नि हे एकच आहेत असें म्हटलें आहे. सवितृ, मित्र व पूषाण हे एक मानिले आहेत. इंद्र व वरुण हे एक. द्यौस् ( आकाश ) व पर्जन्य ( पाऊस देव ) हे एक. आणखी एक कवि ह्मणतो कीं ( ऋग्वे०१. १६४. ४६. ) "कोणी इंद्र, मित्र, वरुण अथवा अग्नि असें ह्मणतात. जें एकच त्याला विद्वान लोक अनेक नांवें देतात. त्यालाच अग्नि, यम आणि मातरिश्वा असें ह्मणतात.*

कधीं कधीं सर्व देवांचा "विश्वेदेव" ह्या नामांत समावेश केला आहे, आणि त्या त्या समुच्चय रूपानें त्यांच्या प्रार्थनाही केल्या आहेत.

**सर्व देवमत कसें वाढत गेलें.**—कित्येक वैदिक कवींची ऐक्याकडे जी प्रवृत्ति होती तिचा परिणाम **एक देवमत** झालें नाहीं. त्यापासून वर **सर्व देवमत** उत्पन्न झालें. ह्मणजे सकल जगत् देव आहे असें मत निघालें. मंत्र व ब्राह्मण यांत अनेक देवमत आहे. ह्या दोन ग्रंथांस **कर्मकांड** ह्मणजे कर्ममार्गाचें प्रकरण ह्मणतात. ब्राह्मणांच्या शेवटीं उपनिषद नामक तत्त्वविचाराचे प्रबंध आहेत त्यांस **ज्ञानकांड** ह्मणतात. सकल विश्वांत परमेश्वरावांचून कोणी वस्तु नाहीं, आणि तोच विश्वरूप आहे हें अद्वैतमत कित्येक जुन्या उपनिषदांत दिसून येतें, इतकेंच कीं, तें दुर्बोध वचनें व दृष्टांत यांत गुंडाळलें आहे. छांदोग्य उपनिषदांतील एका वचनांत तें स्पष्ट रीतीनें दर्शविलें आहे. तें असें कीं, "एकमेवाद्वितीयम्."

राजे राममोहनराय यांनीं वेदाच्या मंत्रभागाचा धिक्कार केला होता हें आह्मी मागें सांगितलेंच आहे. त्यांच्या मतें उपनिषद हेच वेद होत, व त्यांत द्वैतमत आहे असें त्यांस वाटलें होतें. वर सांगितलेलें छांदोग्यांतील वचन बाबू केशव चंद्रसेन यांनींही आदरिलें होतें. परंतु त्याचा अर्थ 'एकावांचून दुसरा देव नाहीं' असा होत नाहीं,

* [ ह्या ऋचेवर वेदार्थयत्नकर्ते यांची टीप येणेंप्रमाणें आहे—"वेदांत ह्मणजे संहिता यांत अनेक देवांची भक्ति आणि स्तुति आहे, एका परमेश्वराचें प्रतिपादन नाहीं, असें ह्मणतात; आणि तें बहुतेक अंशीं खरें आहे. पण केव्हां केव्हां अशीं वचनें त्यांतच दृष्टीस पडतात कीं, अनेक देव जे सांगितले आहेत ते वस्तुतः अनेक नसतां एकाच देवाचीं तीं अनेक नांवें आहेत. हीं जीं थोडीं वचनें त्यांपैकीं ही एक ऋचा होय."]

तर एकावांचून दुसरें कांहीं नाहीं असा आहे. हें मत राममोहनरायांच्या अथवा बाबू केशव चंद्रसेन यांच्या अर्थाहून अगदीं भिन्न आहे.

**अद्वैत मताचा अर्वाचीन विकास.**—वैदिक ऋषींची ३३ देवांकडून तृप्ति झाली होती, परंतु पुराणकर्त्यांनीं त्यांची संख्या ३३ कोटी वाढविली. ही हिंदुस्थानांतील प्रत्येक पुरुष व स्त्री व लेंकरूं यांच्या संख्येहून जास्ती आहे.

हिंदु लोक जिला भजत नाहींत अशी एकही सृष्टवस्तु पृथ्वींत अथवा आकाशांत नाहीं.

कधीं कधीं अनेक देवमत व सर्वदेवमत यांचा संयोग करितात; परंतु शुद्ध अद्वैत किंवा एकेश्वरी मत हिंदुधर्मांत सांपडत नाहीं.

## वेदांत न सांगितलेले देव.

प्रोफेसर उइलसन असें ह्मणतात कीं, "सांप्रतकाळीं हिंदु लोक ज्या देवांची भक्ति करितात त्यांपैकीं बहुतेक वेदांत मुळींच सांपडत नाहींत, अथवा ते कनिष्ठ व निराळ्या अवस्थेंत अढळतात. **शिव, महादेव, दुर्गा, कालिका, राम, कृष्ण** यांचीं नांवें तर अगदीं सांपडत नाहींत. रुद्र नांवाचा देव ज्याला पुराणांत शिव ह्मटलें आहे व ज्याची उत्पत्ति पुराणांत देखील स्पष्ट अढळत नाहीं, व ज्याला शिव मानण्यास पुरता आधार सांपडत नाहीं, तो वेदांत मरुतांचा ( वाऱ्यांचा ) बाप असा वर्णिला आहे, आणि तो इंद्र किंवा अग्नि यांचें रूप असावा असें वाटतें. हिंदुस्थानांत कनिष्ठपेक्षीं एक हजार वर्षांपासून बहुधा ज्या एकाच रूपानें त्याची भक्ति ( लिंगपूजा ) चालली आहे त्या रूपाची वेदामध्यें किंचितही सूचना नाहीं. तसेंच ओम् चिन्हांकित जी ब्रह्मा, विष्णु व शिव यांच्या संयोगाची त्रिमूर्त्ति तिचाही त्यांत कोठें ठावठिकाण लागत नाहीं."

हिंदु लोक ज्या देवांची मुख्यत्वें भक्ति करितात ते अलीकडील काळांतील असून बनावट आहेत. नवीन देवांची भक्ति कशी चालू झाली हें सर ए. सि. लायल हे Asiatic Studies नामक आपल्या ग्रंथांत गेनेंप्रमाणें सांगतातः— " कोणी एखादा साधु मानलेला मनुष्य मरण

पावला ह्मणजे त्याच्या भक्तीचें देव्हारें मांडतात. जर तो आरंभीं विशेषें करून बायकांचे व मोलवान गुराढोरांचे रोग बरे करीत असे अशी त्याविषयीं कल्पना असली तर त्याची कीर्ति देशांत लवकरच पसरते. वऱ्हाडामध्यें जीं लोकप्रिय मातब्बर व प्रख्यात देवस्थानें आहेत त्यांची उत्पत्ति अशा प्रकारें झाली आहे." दक्षिण हिंदुस्थानांत जीं मोठीं धनाढ्य देवस्थानें आहेत त्यांपैकीं तिरूपती नामक जें मद्रासेजवळ आहे तें बाळाजी नांवाच्या माणसाच्या सन्मानार्थ स्थापिलें होतें. जेव्हां एखाद्या स्थानिक देवाचें माहात्म्य वाढतें तेव्हां तो विष्णूचा किंवा शिवाचा अवतार आहे असें ब्राह्मण लोकांस सांगत फिरतात.

## वेदांतील अर्पणें व यज्ञ.

**वैदिक यज्ञांचा गौरव.**–मि. कुंटे ह्मणतात कीं, ऋक् संहिता नामक स्तोत्रसंग्रहांत प्राचीन आर्यलोकांची जी सुधारलेली स्थिति दिसून येते ती कोणत्या प्रकारची होती व कोणत्या योग्यतेची होती हें त्या सुधारणुकेचा जीव अशी जी त्यांची यज्ञपद्धत ती शिकल्यावांचून समजणें अशक्य आहे. कोणतेंही स्तोत्र वाचा, त्याचा यज्ञाशीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष संबंध आहेच. त्यांत उदगात गाणाराचे छंद, किंवा यजन किंवा मख अशीं यज्ञाचीं नांवें अथवा यज्ञभाग घेण्याविषयीं एखाद्या देवाची प्रार्थना यांतून कांहींना कांहीं तरी असायाचेंच. ऋक्संहितेंत लोकसमाजाचें जें चित्र दिसतें त्याची मुख्य भूमि यज्ञ आहे."

यज्ञाच्या ठायीं जें कल्पित सामर्थ्य कल्पिलें आहे त्याजविषयीं डाक्तर हौग येणेंप्रमाणें लिहितातः—

"यज्ञाच्या योगानें इहलोकीं व परलोकीं सामर्थ्य प्राप्त होतें असें मानितात, दृश्य प्राणी व अदृश्य प्राणी, जीवंत व निर्जीव वस्तु ह्यांवर बळ प्राप्त होतें. ज्या कोणाला त्याचा यथाविधि प्रयोग समजतो व जो कोणी तो यथाविधि करितो, त्याला खरोखर ह्या जगताचा प्रभु असें मानितात. त्याच्या मनांत कोणतीही इच्छा असली व अत्यंत महत्वेच्छा जरी असली तरी ती पूर्ण होते. यज्ञाच्या योगानें त्याचे सर्व अर्थ सिद्धीस जातात. एकंदरीनें पाहतां यज्ञ हें एक प्रकारचें यंत्र आहे, असें

समजतात, त्याचे सर्व भाग परस्पराशीं जुळले पाहिजेत; अथवा तो एक प्रकारची मोठी सांखळी आहे, तींत एकही कडी कमी नसली पाहिजे; अथवा तो जिना आहे त्याच्या योगानें स्वर्गास चढून जातां येतें; अथवा तो पुरुष आहे त्याच्या ठायीं मनुष्यदेहाचीं सर्व गुणलक्षणें आहेत. यज्ञ अनादि असून तो प्रजापति किंवा ब्रह्मा यांपासून त्रयी (ऋक्, साम आणि यजु) विद्येसहित निघाला. सृष्टीची उत्पत्ति देखील परमात्म्यानें केलेल्या यज्ञापासून झाली असें मानिलें आहे."

**नाना जातीचीं अर्पणें व यज्ञः**—गायीचें दूध, दहीं, व घृत ह्यांचें अर्पण करीत. धान्य निरनिराळ्या प्रकारें, ह्मणजे भाजून, उकडून अथवा पिठाचे गोळे (पिंड) करून अर्पीत. यज्ञास बकरे, मेंढरें, गायी, रेडे, घोडे व मनुष्यें लागत, यांपैकीं घोडा व मनुष्य यांचा यज्ञ बहुमोलाचा मानीत. सोम वारंवार अर्पण करण्यांत येत असे. धूप जाळीत, परंतु लोकरीचे पुंजके व घोड्याची लीदही जाळीत.

**अर्पणाचे समय** इ०–सांप्रतकाळच्या हिंदुलोकांत देवपूजेची एक खोली घरांत एका बाजूस असते तशी पूर्वींच्या आर्य लोकांची नसे, तर माजघर हेंच त्यांचें देवघर असे. नव्या घरांत राहायास गेले ह्मणजे लांकडाचे दोन तुकडे एकमेकांवर घांसून अग्नि उत्पन्न करीत, तो कधीं विझूं देत नसत. भक्तिमान आर्य जन ह्या पवित्र अग्नीच्या भोंवतीं प्रातःकाळीं व सायंकाळीं मिळत. घरचा यजमान अग्निहोत्र्या-दाखल त्या अग्नीस काष्ठ व घृत हें हवि अर्पण करी. स्तोत्रें गात, त्यांत मुलें ध्रुपद ह्मणत, आणि स्वाहा व वौषट् हे शब्द इतक्या दीर्घ स्वरानें उच्चारीत कीं, तेणेंकरून घराचें धाबें दणदणून जाई.

अमावास्या व पौर्णिमा हे त्यांचे यज्ञसमय होते, त्याकरितां घर शृंगारीत, आणि दारावर व त्याच्या बाजूस गवत बांधीत.

मुख्य पांच यज्ञ होते, ह्मणजे १ अग्निहोत्र, २ दर्शपूर्णमास (अमावास्येस व पौर्णिमेस करायाचे यज्ञ), ३ चातुर्मास्य, ४ अश्वमेध व पशुयज्ञ, आणि ५ सोमयज्ञ. पशुयज्ञांत गाई, ह्मशी, मेंढरें, बकरीं यांचा बळी देत.

नवधान्य व नवीं फळें हीं सामान्यतः वर्षांतून दोनदां देवांस अर्पण करीत.

वर्षांतून एकदां ह्मणजे पावसाळ्याच्या तोंडीं यज्ञकर्त्याच्या घरांत बकरा कापीत. याशिवाय अणखीही कित्येक अर्पणें व यज्ञ असत ते पुढें सांगण्यांत येतील.

## सोम.

सोमरस हा सर्व मोठ्या यज्ञांत अर्पिण्याचा मोठ्या महत्वाचा पदार्थ होता. तो सोमनामक वल्लीपासून उखळांत कुटून व पाट्यावरवंट्यानें वाटून काढीत. त्यांत पाणी मिसळून त्याचा कस कांहींसा हलका करीत. याशिवाय त्यांत जवसाचें पीठ, तूप, देवभाताच्या तांदळाचें पीठ हे पदार्थ घालून एका बरणींत नऊ दिवस खतखत होईपर्यंत ठेवीत. अशा प्रकारचें दीर्घकाल खतखतलेलें पेयाला कैफ येत असेल यांत संशय नाहीं. तो प्याल्यानें मनुष्य व देव यांस माद येई असें वेदांत वारंवार वर्णन केलें आहे.*

आर्य लोकांस स्वतां सोम फार प्रिय असे, ते त्याचें वर्णन येणेंप्रमाणें करीतः—"इंद्राकरितां ओतलेल्या सोमा, अत्यंत मधुर व हर्षकारक (मादक) प्रवाहरूपानें शुद्ध वाहत राहा."

"आह्मी सोम प्राशन केला आहे, आह्मी अमर झालों आहोंत. आम्ही प्रकाशांत प्रवेश केला आहे. आम्ही देवांस जाणिलें आहे. शत्रु आमचें काय करणार आहे?"

सर्व देव आनंदानें सोम प्राशन करितात अशी आर्यलोकांची कल्पना होती.

"हे जलद व कल्याण वाहून आणणारे सोमरस ओतले आहेत. हे वायू, ये, आणि पुढें ठेवलेले रस प्राशन कर."

"मित्र आणि वरुण जे यज्ञाच्या ठायीं विद्यमान आहेत व ज्यांचें बळ शुद्ध आहे त्यांस आह्मी सोमरस प्राशन करण्यास बोलावितों."

"हे अग्नि, तूं मरुतांसहित ये, तुला आह्मी ह्या पूर्ण विधीप्रत सोम पिण्याकरितां आग्रहपूर्वक बोलावितों."

---

* [ सोम काढण्याचीं उखळें मुसळें, आणि बैलाच्या ज्या चामड्यावर सोम काढीत, तें चामडें यांस देवता मानून त्यांच्या प्रीत्यर्थ रचलेलें एक सूक्त ऋग्वेदांत आढळतें. (ऋ० १ २८.) "सोम सिद्ध झाल्यावर ठेवावयाचा तो देवांस अर्पण करण्यासाठीं बैलाच्या कातड्यावर ठेवीत असत, कारण कीं बैलाच्या कातड्याची अद्यापि अप्रतिष्ठा झाली नव्हती." वे० य० पु० १ पृ० २८० ]

"कल्याणकारक, पराक्रमी आणि सोन्याच्या रथांत बसून जाणारे जे अश्वी देव त्यांजला प्रातःकाळीं जागृत होणारे त्यांचे अश्व सोम पिण्यासाठीं येथें घेऊन येवोत."

"हे अग्नि, देवांच्या प्रिय पत्न्यांस आणि त्वस्त्री यांस सोमरस पिण्याकरितां घेऊन ये."

परंतु सर्व देवांपेक्षां इंद्राला सोमरस पिण्याचें फार मोठें व्यसन होतें. त्याचें "अधाशीपणानें सोमरस पिणारा" असें एक नांव होतें. "शत्रूचा नाश करणारा इंद्र, जेथें कोठें हव्यार्पण कारितात तेथें उन्माद येण्यासाठीं सोम प्राशन करायाला खचीत येतो." "सोमाचा चुराडा करणारा दगड आपल्या आवाजानें तुझें मन आह्माकडे ओढो." इंद्र आला ह्मणजे त्याला सोम पिण्याविषयीं येणेंप्रमाणें आग्रह करीतः—"हे इंद्रा, आनंदित हो, आपलें जाभाड उघड, घसा मोकळा कर, आमच्या अर्पणांकडून संतुष्ट हो." "इंद्र गटगटां सोम पितो; पेयार्पणें झटकन झोंकून देतो." तो इतकें पीत असे कीं, त्याला मोठें दोंद आलें होतें.

इंद्रानें खूप सोम ठांसल्यावर त्याचे भक्त त्याजपाशीं गायीदान मागत. "सोमरस प्राशन करणाऱ्या मित्रा, वज्र धारणकर्त्या आह्मी जे तुझे मित्र त्या आह्मास लांब जाभाडाच्या पुष्कळ गायी दे." सोम प्राशन केल्यानें इंद्रास वृत्रास जिकण्यास बळ येत असे असें त्याचे उपासक मानीत.

"घारीनें स्वर्गांतून आणिलेला जो अत्यंत मादक सोमरस तो ओतल्यावर त्यानें तुला माद आणिला, असा कीं तूं हें गर्जणाऱ्या, आपल्या बळानें आपला पराक्रम प्रगट करीत असतां आकाशांतून वृत्रास मारिता झालास."

देवांस जो सोम अर्पण करीत तो त्यांस आसनाकरितां मांडलेल्या गवतावर ओतीत असें दिसतें. "ह्या थपथपणारे सोमरसाची पवित्र गवतावर आहुति दिली आहे. तुझें बळ नवीन करण्यासाठीं हे इंद्रा तें प्राशन कर."

## पशुयज्ञ.

यज्ञाकरितां मुख्यत्वें बकरे, मेंढे, गायी, बैल, हरीण, व विशेष प्रसंगीं घोडे यांचा वध करीत. एकदां इंद्राला तीनशें रेड्यांचा बळी दिला होता असें सांगितलें आहे.

अलीकडील हिंदू लोक गायीची पूजा करितात, त्यांस आपले आर्य पूर्वज गायीचा यज्ञ करीत व तिचें मांस भक्षण करीत हें खरें वाटत नाहीं. परंतु गोमेधाविषयीं वेदांत अनेक वेळां सांगण्यांत आलें आहे. गोमेध ह्मणजे गायीचा यज्ञ. त्याचा विधि तैत्तिरीय ब्राह्मणांत येणें-प्रमाणें सांगितला आहे:—

"इंद्रास जाड पायांची गाय, वरुण आणि विष्णु यांस भाकड गाय, पूषणास काळी गाय, वायूस एका वेताची गाय, मित्र आणि वरुण यांस दुरंगी गाय, रुद्रास तांबडी गाय, सूर्यास पांढरी वांझ गाय, इ०."

पंचसारदीयसव नामक एक मोठा यज्ञ पांच पांच वर्षांनीं करीत, त्या समयीं सत्रा तरुण गायींचा होम करीत. तैत्तिरीय ब्राह्मणांत असें ह्मटलें आहे कीं, "ज्याला मोठें व्हायाचें आहे त्यानें पंचसारदीय करावा; तेणेंकरून तो खचीत मोठा होईल."

आश्वलायनगृह्यसूत्रांत "शूलगव" नामक एक यज्ञ सांगितला आहे, तो लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. तो करिते वेळीं गायी शूलावर ठेवून भाजीत. इंग्रजींत ज्याला Roast Beef म्हणतात त्यांतलाच हा प्रकार होता.

जसा गायींचा यज्ञ करीत तसाच बैलांचाही करीत. तैत्तिरीय ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, विष्णूला ठेंगणा बैल, इंद्राला गलित शिंगांचा बैल, सावित्रीला कबरा बैल, मित्राला पांढरा बैल, इ०.

हल्लींच्या काळांतील अज्ञान हिंदु लोक असें ह्मणतात कीं, वैदिक युगांत ऋषी यज्ञासाठीं खरोखर पशुवध करीत नसत; तर यज्ञाचा विधि आटोपल्यावर पशूंस सोडून देत. [ दुसरी कल्पना अशी आहे कीं, पशूचा वध केल्यावर त्याला पुन: जीवंत करीत. ही देखील कल्पना निराधार आहे. शुनःशेपाच्या यज्ञाची जी कथा वेदांत आहे तिच्यावर वेदार्थयत्नकर्त्यांनीं टीप दिली आहे तींत ते असें लिहितात कीं, "चवथी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी अशी आहे कीं, यज्ञांत जे बळी देत त्यांस पुनः जीवंत करण्याची शक्ति आणि चाल पुरातन काळच्या लोकांत होती ह्मणून जशी प्राणी मारून हत्या करण्याची चाल होती तशीच मारलेल्या प्राण्यांस फिरून जीव आणण्याचीही शक्ति

असे असें सांप्रतकाळीं मानितात; परंतु त्याला कांहीं आधार नाहीं. कारण कीं, जर असता तर शुनःशेपास मारल्यानंतर आपण पुनः जीवंत होईन अशा भरवंशावर तो उगीच राहिला असता. अथवा हरिश्चंद्राचा मुलगा रोहित यास मारला असता तरी काय अडचण होती? तो पुनः जीवंत झाला असता. तो सहा सात वर्षेंपर्यंत पळून कां जात असे? शिवाय जर पुनः जीवंत करितां आलें असतें, तर मला मारिलें तरी वरुणा मला पुनः जीवंत कर असें शुनःशेपानें ह्मटलें नसतें काय?" ( वे० य० पु०. १. पृ० २०८ )]

पशूचा वध करण्याची आर्य लोकांची चाल अशी होती कीं, प्रथम, पशूला यूप नामक यज्ञस्तंभाला बांधीत, नंतर मंत्र ह्मणून व कांहीं क्रिया करून कांहीं गवत भूमीवर पसरीत, आणि त्यावर पशूला त्याचें डोकें पश्चिमेकडे व पाय उत्तरेकडें करून निजवीत. त्याला मारिल्यावर अध्वर्यु 'संजनप्त'[1] (ह्मणजे तो बलि झाला ) असें ह्मणे.

बलिदान केलेल्या पशूचें मांस आर्य लोक भक्षण करीत हें आश्वलायनगृह्यसूत्रांत यज्ञशेष भक्षण करण्याविषयीं ज्या आज्ञा आहेत त्यांवरून स्पष्ट दिसतें. पशु मारिल्यावर त्याचे कापून तुकडे करण्याविषयीं तैत्तिरीय ब्राह्मणांत विधि सांगितले आहेत. जर त्याच्या मांसाची वांटणी करीत नसत तर त्याचे तुकडे करण्याचेंही कारण नव्हतें. ह्या विधींपैकीं कांहीं येणेंप्रमाणें होतेः—"( पशूचें शरीर ) अखंड राही असें त्याचें कातडें सोडीव. गरुडाप्रमाणें तें ( पंख पसरल्यासारखें ) दिसावें ह्मणून त्याचा ऊर फाड. पुढले पाय ( भुज ) वेगळे कर. ते आरीसारखे वेगळे कर. सव्वीस फांसोळ्या एकामागून एक अशा वेगळ्या कर. विष्ठा पुरण्याकरितां खांच खण. रक्त राक्षसांस फेंक. हे अध्रिगु, ( यज्ञपशुवध करणारा ) नेमून दिलेलें काम कर. आपलें काम कर; तें यथाविधि कर."

अथर्ववेदाच्या गोपथ ब्राह्मणांत यज्ञांत जीं मनुष्यें निरनिराळे कार्यभाग उचलीत त्यांस मांसाचे वांटे कसकसे द्यावे हें सांगितलें आहेः—

"प्रास्तोता ह्याला जिभेसुद्धां दोन जाभाडें मिळावीं, प्रतिहर्तोला मान आणि कोहळें मिळावें, उद्गाता ह्याला गरुडासारिखे पंख; नेष्टा याला उजवा भुज; सदस्याला डावा भुज; यज्ञस्थापक गृहस्थाला ( यजमानाला ) दोन उजवे पाय; त्याच्या स्त्रीला डावे पाय इ०."

वांटणीच्या ह्या नेमाचें जे उल्लंघन करितील त्यांजवर नानाप्रकारचें भयंकर शापोच्चारण केलें आहे.

कित्येकांच्या वांटणीस फारच निकृष्ट भाग येत, परंतु सर्वांस सोमरसाची बीर दारू पुष्कळ प्यायास मिळत असे.

**अश्वमेधः**—हा विधि आर्यांनीं मध्यएशियांतील स्कुथी किंवा सिथियन नामक लोकांपासून घेतला असावा असें दिसतें, ते आपल्या देवांस वारंवार घोडे अर्पीत असत. परंतु वैदिक काळाच्यामागून ह्या यज्ञाचें जितकें महत्त्व मानूं लागले तसें पूर्वीं मानीत नसत.

ह्या यज्ञाच्या तयारीस एक वर्ष लागत असे. तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितल्याप्रमाणें ह्या यज्ञाला दहापट अठरा ग्राम्यपशु अर्पण करावे लागत. ह्याशिवाय दोनशें साठ वनपशु आणून यज्ञस्तंभाला बांधून ठेवीत आणि त्यांच्या भोंवताली अग्नि फिरविल्यावर त्यांस सोडून देत.

प्रथम पूषणाला एक बकरा अर्पण करीत. घोडा खरोखर कापून त्याचें मांस शिजवीत हें पुढील मंत्रांवरून निःसंशय सिद्ध होतें. ऋ॰ वे॰ २. १६२ :—

११. "[ हे घोड्या ], अग्नीच्या योगानें तुझें शरीर शिजत असतां जो तुझा [ अंश ] खालीं गळेल, अथवा तुला मारिला ह्मणजे त्या वेळीं जो तुझा अंश सुरीकडेस गळेल, तो भूमीला अथवा गवताला चिकटून न राहो. तो इच्छाळू देवांला अर्पिला जावो.

१२. जे घोडा शिजलेला पाहतात, जे ह्मणतात कीं याला आतां चांगला सुगंध येतो ह्याला काढा, आणि जे घोड्याची मांसभिक्षा मिळेल ह्मणून वाट पाहत बसतात, त्यांचा सर्वांचा संल्कप आह्मांप्रत येवो.

१३. मांस शिजवायाच्या थाळींत घालायाची जी पळी, स्रुवा ओतून ठेवायाचीं जीं पात्रें, मांसपात्रांतील ऊब जाऊं नये ह्मणून वर ठेवण्याचीं जीं झांकणीं आणि जे आंकडे आणि सुऱ्या, तीं घोड्यांस भूषणदायक आहेत."

१८. प्रबळ आणि देवांचा बंधु असा जो घोडा, त्याच्या चवतीस बरगड्यांमध्यें सुरी घुसते. [ हे कापणारे हो, ] याचे अवयव सगळ्याचे सगळेच सोडवा; प्रत्येक सांधा एकामागून एक नांव घेऊन कापा."

जर घोडा खरोखर कापीत नसत तर ह्या मंत्रांत कांहीं अर्थ नाहीं असें ह्मटलें पाहिजे. प्रोफेसर उइलसन ह्मणतात कीं,

" घोड्याला खरोखर कापीत यांत कांहीं संशय नाहीं; त्याचें शरीर कापून तुकडे तुकडे करीत हेंही स्पष्ट आहे; तसेंच हे तुकडे कांहीं साफ करीत, कांहीं शिजवीत, कांहीं भाजीत यांतही संशय नाहीं. आणि जरी ह्या सूक्तांतील कांहीं वचनांचा अर्थ समजणें कठीण आहे, तरी यज्ञांतील सहकारी मनुष्यें कांहीं मांसभाग भक्षण करीत, व कांहीं भाग देवांस अर्पण करीत याविषयीं संशय नाहीं."

यज्ञांत बळी दिलेल्या घोड्यास तूं देवांप्रत जात आहेस असें सांगून त्याचें समाधान करीतः—

२०. " हे [ अश्वा,] तूं वर जात असतांना तुला तुझा प्रिय प्राण दुःख न देवो. सुरी तुझ्या गात्रांवर फार वेळ न बसो. अडाणी आणि गिधाडासारिखा कापणारा तुझीं गात्रें जागा सोडून सुरीनें उगीच न झिजरो.

२१. "[ हे अश्वा,] तूं जो हा मरत आहेस तो खरोखर मरत नाहींस, आणि नाशाप्रत पावत नाहींस. तूं चांगल्या मार्गांनीं देवांप्रत जात आहेस. [ तुला स्वर्गास नेण्याकरितां ] तुजबरोबर इंद्राचे पिवळे घोडे आणि मरुताच्या ठिपकेदार हरिणी तुझ्याबरोबर जोडिल्या जातील. अश्वीच्या गाढवाच्या धुरेला तुजबरोबर बळवान गाढव जोडिला जाईल."

ऋग्वेदांत अश्वमेध करण्याचा हेतु इतर यज्ञांच्या हेतूप्रमाणेंच दर्शविला आहे, ह्मणजे त्याच्या योगें संतति व संपत्ति प्राप्त व्हावी एवढ्याच हेतूनें हा यज्ञ करीतः—

२२. " हा अश्वमेध आह्माला चांगल्या गाई, चांगले घोडे, पुरुष आणि पुत्र आणि सर्वांचें पोषण करण्याजोगी संपत्ति देवो. अदिति आह्माला पापापासून मुक्त करो. हविरूपानें अर्पण केलेला घोडा आह्माला बळ प्राप्त करून देवो."

रामायणांत दशरथानें पुत्रप्राप्तीकारितां अश्वमेध केल्याची कथा आहे. त्या वेळीं जीं क्रियाकर्में केलीं त्यांत एक कर्म असें होतें कीं, दशरथाची पट्टराणी कौशल्या हिला एक रात्र मेलेल्या घोड्याच्या अंगाशीं अंग लावून निजायास लाविलें. " दुसरे दिवशीं प्रातःकाळीं जेव्हां राणी अशा ओंगळवाण्या स्थितीपासून मुक्त झाली तेव्हां ती व तिच्या दासी आणि मुख्य उपाध्या यांजमध्यें संवाद झाला त्याचा विषय अत्यंत मूर्खत्वाचा व बीभत्स आहे, तो यजुष् व शतपथ ब्राह्मणांचा अश्वमेधनामक भाग यांत दिला असून त्याचा अर्थ सूत्रांत सांगितला आहे.

वेदांत जरी कित्येक असभ्य आचारांस आधार सांपडतो, आणि आपल्या 'सनातन ब्रह्माच्या' शास्त्रांत सांप्रतकाळच्या संभावित हिंदूंस खरे मानण्यास कठीण पडतील अशा जरी कित्येक गोष्टी आहेत, तरी वर सांगितलेले घाणेरडे व ओंगळवाणे धर्मकर्मास वेदामध्यें आधार नाहीं." (प्रो० विलसन यांच्या वेदाच्या भाषांतराचा उपोद्धात, भाग २ पृ०१३.)

अश्वमेधाविषयीं अलीकडील कल्पना अशी आहे कीं, सार्वभौमत्वाची इच्छा बाळगिणारे हा यज्ञ करीत असत. दुसरी एक कादंबरी अशी आहे कीं, शंभर अश्वमेध केल्यानें इंद्र स्वर्गपदावरून च्युत होऊन यज्ञकर्त्यास त्याचें पद प्राप्त होतें.

## पुरुषमेध किंवा नरयज्ञ.

मनुष्यबलि देणें हें कर्म सांप्रतकाळीं मोठें अघोर मानितात, तरी प्राचीनकाळांत बहुतकरून सर्व राष्ट्रें तें आचरीत असत. आर्य हिंदु, ग्रीक, जर्मन व ब्रिटन हे लोक एकदां एकत्र राहत होते, त्यांची भाषा एक होती, आणि त्यांच्या चाली एक होत्या. पश्चिमेकडील आर्य नरमेध करीत हें आपणास इतिहासावरून समजतें. इंग्लंड देशांत पुष्कळ मनुष्यांस मूर्तीच्या आकाराच्या चिंबाऱ्यांच्या पिंजऱ्यांत घालून जाळीत असत. आथेन्स एथें सर्व राष्ट्राचे प्रायश्चित्तासाठीं प्रतिवर्षी एक पुरुष व एक स्त्री बळी देत असत. यावरून ही चाल पूर्वेकडील आर्यलोकांमध्येंही असावी असें संभवतें.

ह्या गोष्टीचा शोध दाक्तर राजेंद्रलाल मित्र नामक महा संस्कृतविद्वानांनीं फार बारीक रीतीनें केला आहे. ह्या विषयावर त्यांनीं ८४ पृष्ठांचा निबंध लिहिला आहे, त्यांत त्यांनीं प्रमाणार्थ पुष्कळ संस्कृत वचनें घेतलीं आहेत. ह्या ग्रंथांत ते असें ह्मणतात कीं, " प्राचीन हिंदुधर्म जरी सदय व परोपकारी होता तरी तो पशुयज्ञाला अगदीं प्रतिकूल नव्हता. उलटें त्याच्या मुख्य विधींपैकीं बहुतेकांत पशु व पक्षी यांचा वध करण्याची आज्ञा होती. समुद्रांत चालत जाऊन बुडून मरण्याचा एक विधि असे त्याला **महाप्रस्थ** ह्मणत. सांप्रतच्या युगांत हा विधि करण्यास मनाई आहे. दोषी मनुष्याचें पाप परिहार करण्याचा एक प्रायश्चित्तरूप विधि होता, तो असा कीं, अपराधी

मनुष्यानें अग्नीच्या चितेवर चढून आपणास जाळून घ्यावें. ह्या विधीला तुषानल ह्मणत. हें प्रायश्चित्त शास्त्रानें अद्याप वर्ज केलें नाहीं. अत्यंत कोमल स्वभावाच्या व भोळसर अशा ज्या बंगाली स्त्रिया त्या बहुतकालपर्यंत आपलें ज्येष्ठ बालक गंगानदीस अर्पण करीत, व हें करण्याचे पूर्वी एक धर्मकर्म करीत. गंगेस हें अर्पण करण्याची आज्ञा कोणत्याही प्राचीन धर्मशास्त्रांत सांपडत नाहीं."

[-कऱ्हाडे ब्राह्मणांत वर्षांतून एकदां देवीस मनुष्यबलि देण्याचा कुलाचार आहे, तोही शास्त्रानें वर्ज्य केला नाहीं तर केवळ सरकारच्या भयानें किंवा सुधारणेच्या जोरानें तो बंद पडला आहे. तरी कित्येक प्रसंगीं तो केल्याचें ऐकण्यांत येतें.]

ऋग्वेदाच्या प्रथम अष्टकांत मनुष्ययज्ञाच्या संबंधाचें एक सूक्त आहे. शुनःशेप नांवाच्या एका मनुष्यास बळी देण्याच्या पूर्वीं खांबाशीं बांधलें असतां त्यानें आपली सुटका होण्याकरितां सात स्तोत्रें ह्मटलीं त्यांविषयींची कथा ऋ० वे० च्या ऐतरेय ब्राह्मणांत सांगितली आहे ती येणेंप्रमाणेः—

हरिश्चंद्र राजाला पुत्रसंतान नव्हतें तेव्हां त्यानें वरूणाला नवस केला कीं, मला पुत्र दे ह्मणजे तो मी तुला अर्पण करीन, त्याप्रमाणें त्याला पुत्र झाला. त्याचें नांव त्यानें रोहित ठेविलें. पुढें राजा नवस फेडण्याविषयीं टाळाटाळ करूं लागला तेव्हां वरूणानें त्याला जलोदराच्या रोगानें पीडिलें. मग राजपुत्राला जेव्हां समजलें कीं, बाप आपला यज्ञ करणार, तेव्हां तो अरण्यांत पळत सुटला. तो तेथें सहा वर्षें भ्रमण करीत असतां त्याला अजीगर्त नामक ऋषि भेटला, त्यानें त्याचें वृत्त ऐकून आपल्या सहा पुत्रांपैकीं शुनःशेप याला शंभर गाई घेऊन त्याच्याबद्दल वरूणास देण्याचें कबूल केलें. नंतर रोहितानें त्याला आपल्या बापापाशीं आणिलें. त्या समयीं विश्वामित्र होता होता, जमदग्नि अध्वर्यु होता, वसिष्ठ ब्रह्मा होता, अयास्य हा उद्गाता होता. परंतु जेव्हां शुनःशेपाला सिद्ध करून आणिलें तेव्हां त्याला यज्ञस्तंभाला बांधायास कोणी मिळेना. मग त्याच्या बापानेंच अणखी शंभर गाई घेऊन तें काम करायाचें पत्करिलें. परंतु शुनःशेपाला

अग्निप्रदक्षिणा करायास लाविल्यावर त्याचा वध करायास कोणी मिळेना. तेव्हां तेंही काम करायास अजीगर्त अणखी शंभर गाईंवर मान्य झाला. मग तो सुरी पाजवून त्याला वधायास आला. याप्रमाणें मरण जवळ आलें असें पाहून शुनःशेपानें अग्नि, इंद्र, मित्र, वरूण व इतर देव यांचा धांवा केला. शेवटीं त्यानें वरूणाचा असा धांवा केला कीं, "हे राजा वरूणा, तूं सर्व जाणतोस, आणि तुला कोणीही ठकवूं शकत नाहीं. तूं मला सोडीव, आणि तूं माझे पाश सोडून टाक." (ऋग्वेद १. ६, २४, १३).

ह्या स्तोत्रांनीं वरूणानें संतुष्ट होऊन शुनःशेपाला सोडलें. नंतर त्याला आपल्या बापाचा कंटाळा येऊन त्यानें त्याला सोडून आपला चुलता विश्वामित्र याचा तो दत्तक पुत्र झाला.

ह्या कथेवरून आर्य लोकांमध्यें मनुष्ययज्ञ करण्याची चाल होती असें स्पष्ट दिसतें. मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं, ऐतरेय ब्राह्मणांतील कथेवरून असें दिसतें कीं, प्राचीनकाळीं ब्राह्मणांस मनुष्ययज्ञाची चाल ठाऊक होती. आणि ब्राह्मणजातीचीं मानलेलीं मनुष्यें आपले पुत्र यज्ञासाठीं विकायाला तयार असत.

[शुनःशेपाच्या कथेवर वेदार्थयत्नकर्त्यांच्या टीपेंतील कांहीं भाग येणेंप्रमाणें आहे:—

"ही सर्व कथा घडलेल्या गोष्टीचा अनुवाद असो, अथवा घडलेल्या लहानशा एखाद्या गोष्टीच्या बीजावरून केलेला कल्पनाविस्तार असो; इतकें खरें आहे कीं, तींत फार प्राचीनकाळीं चालू होत्या अशा कित्येक चमत्कारिक गोष्टींचा उल्लेख आहे. तो लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. पहिली ही कीं, प्राचीनकाळीं वैदिक युगांत पुरुषमेध करण्याची ह्मणजे मनुष्यास बळी देण्याची भयंकर चाल होती, कीं जिचें नांव घेतलें असतां आधुनिक आर्यजनांतून अगदीं जंगली लोकांच्याही अंगावर शहारे उठतील. दुसरी ही कीं, सर्व युगांत उत्तम युग जें मानितात त्या युगांत ऋषिजन शेंदोनशें गाई घेऊन आपल्या पोटचीं मुलें बळी देण्याकरितां जो विकत मागेल त्यास विकत देण्यास तयार होते. इतकेंच नव्हे, पण आतांच्या वेळचे अति नीच मानिलेले खा-

टीकसुद्धां जें काम कधींही करणार नाहींत तें आपल्याच मुलास आपल्याच हातानें तलवार घेऊन मारावयाचें काम थोडक्याच मोलासाठीं करण्यास तयार होते." ]

पुरुषमेध सर्व सृष्ट पदार्थांवर श्रेष्ठत्व प्राप्त व्हावें एतदर्थ करीत असत. तो ब्राह्मण व क्षत्रिय यांस मात्र करण्याचा अधिकार असे. त्यास चैत्र महिन्याच्या वद्यपक्षांतील दशमीस मात्र आरंभ करीत, आणि त्याची समाप्ति होण्यास ४० दिवस लागत; त्यांपैकीं केवळ पांच दिवसांस पुरुषमेधाचे दिवस ह्मणत, त्यावरून त्याला 'पंचाह' असें नांव पडलें होतें. ह्या यज्ञासाठीं अकरा खांब लागत. प्रत्येक खांबाशीं अग्नि व सोम यांस बळी देण्यास योग्य असें जनावर (वांझ गायी) बांधीत, आणि नरबळी खांबांच्या मध्यें ठेवीत.

ह्या विधीची अति प्राचीनकालिक सूचना श्वेतयजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेंत दृष्टीस पडते. तेथें जें या विषयासंबंधी स्थळ आहे त्यांत निरनिराळे देव व देवी यांस देण्यास योग्य अशा नरबळींचें वर्णन केलें आहे असें मानिलें आहे. ह्या खंडाच्या आरंभीं तीन मंत्र आहेत ते मनुष्यबळी देण्याचे वेळेस ह्मणायाचे मंत्र आहेत असें त्यांचा टीकाकार ह्मणतो. त्यांच्यामागून १७९ देवांच्या नामांची मालिका आहे, प्रत्येक नांव चतुर्थी विभक्तींत आहे व प्रत्येकाच्या मागून एक किंवा त्याहून अधिक पुरुषांचीं नांवें षष्ठी विभक्तींत आहेत. जसें ब्रह्म्याला ब्राह्मण, मरुतास वैश्य इ०. उद्देश्य आणि विधेय यांस जोडणारा शब्द तर कोठेंच दिला नाहीं. आणि पाहिजे तें क्रियापद योजण्याचें वाचकांकडे सोंपविलें आहे. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय ब्राह्मणांत थोड्याशा भेदानें हीं सर्व नांवें अढळतात. त्यांत कित्येक जागीं 'आलभते' हें क्रियापद मागून जोडलें आहे. हें क्रियापद 'लभ' ह्मणजे मारणें (वधणें) ह्या धातूपासून झालें आहे. त्याला 'आ' हा उपसर्ग लागला आहे. याचा अर्थ वध करणें असा टीकाकार साधारणतः करितात. कित्येक ठिकाणीं वधण्यापूर्वी वाहणें किंवा संस्कृत करणें असाही अर्थ होतो.

डाक्तर राजेंद्रलाल मित्र ह्यांनीं ब्राह्मणें आणि आपस्तंब यांतून

पुष्कळ वचनें काढून दाखवून शेवटीं असा निर्णय केला आहे कीं, आर्य लोक कोणत्या कोणत्या काळीं आपल्या देवांस संतुष्ट किंवा प्रसन्न करण्याकरितां मनुष्यबलि देत यांत संशय नाहीं.

नरमेध करण्याची चाल मंत्रकाळांतील होती, आणि आतां पांच सहाशें वर्षांपासून जसें वैष्णव लोक चंडिकेस बकरीं व रेडे देण्याच्या ऐवजीं भोंपळे व ऊस वाहतात, त्याप्रमाणें ब्राह्मण ग्रंथांनीं त्याचें घोर व क्रूर स्वरूप हिरावून तो लाक्षणिक केला.

पुरूषमेधास मात्र मनुष्यबलि लागत असे असें नाहीं, तर अश्वमेध करितांना देखील मनुष्यवध करीत असत. याच कारणामुळें पुरुष-मेधाच्या बरोबर अश्वमेधाचीही कलियुगांत मनाई झाली.

शतपथ ब्राह्मणांत एक श्लोक आहे त्यावरून नरमेध करण्याच्या रीतीची सूचना केलेली दृष्टीस पडते. त्यांत म्हटलें आहे कीं, "मनुष्याचें शीर अग्नीस अर्पण करीत. हें अर्पण हेंच यजन आहे; यास्तव तेणेंकरून मनुष्य यज्ञपशूंपैकीं होतो; आणि यास्तव यज्ञांत पशूंमध्यें मनुष्याचा समावेश होतो."

ब्राह्मणग्रंथ सोडून इतिहासांत पाहूं गेलें असतां त्यांच्या कर्त्यांस पुरूषमेध ठाऊक नव्हता असें दिसत नाहीं. मनूच्या धर्मशास्त्रांत हीच साक्ष मिळते, परंतु जेव्हां तें प्रचारांत आलें तेव्हां हा विधि लोक अघोर मानूं लागले होते असें दिसतें, व याच कारणास्तव ह्या युगांत तो वर्ज्य केलेला आहे.

पुराणांमध्यें पुरुषमेधाची जरी बंदी केली आहे तरी दुसरा एक प्रकारचा मनुष्यवध करण्याची आज्ञा त्यांत दिसून येते. त्याचें नांव **नरबलि**. हा चामुंडा किंवा चंडिका नामक कृष्णवर्ण, उग्ररूप, रुधिर-प्रिय अशा देवीस करितात.

कालिका पुराणांत असें सांगितलें आहे कीं, विधियुक्त एक नरबलि दिल्यानें देवी सहस्र वर्षें तृप्त राहते, आणि तीन नरबलि दिले असतां तिची एक लक्ष वर्षेंपर्यंत तृप्ति होते. माणसाच्या बलीस **अतिबलि** म्हटलें आहे. याविषयीं दा० राजेंद्रलाल मित्र असें म्हणतात कीं, "हा विधि बहुतकाळपर्यंत सर्व हिंदुस्थानांत चालत असे, ही गोष्ट

चांगली महशूर आहे. आणि देवीस संतृप्त करण्यासाठीं हिंदुस्थानांतील कोनाकोपऱ्यांत कारणप्रसंगीं मनुष्यवध होत असतो असा वहीम बाळगणारे लोक अद्याप पुष्कळ आहेत."

"शास्त्रांत सांगितलेल्या यज्ञांखेरीज क्षुद्रदैवतांस मनुष्यबलि अर्पण करण्याची चाल प्राचीनकालापासून ह्या देशांत होती. भूत, पिशाच इ० क्षुद्रदैवतें आहेत तीं दुष्ट स्वभावाचीं व खोडकर आहेत, त्यांचा कांहीं मानपान चुकला ह्मणजे तीं चिरडीस येऊन नानाप्रकारचे अपघात करितात अथवा एखाद्या मोठ्या कार्यास आरंभीं विघ्न आणितात; त्यांची शांति किंवा समजी करण्यासाठीं प्रायश्चित्तरूपानें, किंवा त्यांजपासून कांहीं मागून घेण्यासाठीं त्यांस प्रसन्न करण्याच्या हेतूनें त्यांस मनुष्यरक्त अर्पिलें पाहिजे असा लोकांचा समज होता (व अद्यापही कोठें कोठें तो आहे). ह्या समजुतीमुळें एखादें नवें तळें खणायाचें असलें, अथवा किल्ला बांधायाचा असला तर आरंभीं तेथें मनुष्यबळी देत असत. तसेंच एखाद्या मोठ्या इमारतीची अथवा देवळाची भिंत तडकली तर तें काम क्षुद्रदैवताचें आहे असें समजून त्या इमारतीचा किंवा देवळाचा जीर्णोद्धार करण्याचे आरंभीं त्या दैवताची मनुष्यबलीकडून तृप्ति केली पाहिजे असा लोकसमज असे." [तसेंच जमिनींत पुरून ठेवलेलें गुप्त धन काढण्यासाठींही त्यावरील दैवतास मनुष्याचा बळी दिला पाहिजे असें समजत, व अद्याप कोठें कोठें ह्या समजुतीप्रमाणें वर्तनही घडतें.]

"आपलें रक्त देवीस अर्पण करण्याची चाल मध्यंतरींची होती व सांप्रतकाळींही चालू आहे. हा विधि बायका करितात. बंगाल देशांत ज्या संभावित घराण्यांतील यजमाननीनें हा विधि केला नाहीं असें एकही घराणें मिळणें कठीण. कुटुंबांत नवरा किंवा मुलगा फार आजारी पडला ह्मणजे तो बरा होण्याकरितां देवीस नवस करितात, आणि तो बरा झाला ह्मणजे देवीला मनुष्याचें रक्त वाहून संतुष्ट करितात. प्रथम दुर्गापूजेंत किंवा कालीघाटावरील देवीच्या देवळांत किंवा एखाद्या पवित्र क्षेत्राच्या ठायीं जाऊन ती नवस करणारी यजमानीण बाई कांहीं क्रियाकर्में करिती, मग देवीपुढें आपली छाती उघडी करून

दोन स्तनांच्या मध्यप्रदेशांतून नराणीनें थोडेसें रक्त काढून देवीस अर्पण करिते."

हा वरील विषय डाक्तर राजेंद्रलाल मित्र यांच्या ग्रंथांतून घेतला आहे, यावरून ते ग्रंथकार पुढील गोष्टी निर्णीत करितातः—

१. "मनुष्यजातीच्या सुधारणेचा इतिहास व हिंदुलोकांची संस्कार-पद्धति हीं पाहतां प्राचीन काळीं हिंदु लोक आपल्या देवांस मनुष्यबलि अर्पण करीत नसत असें मानण्यास कांहीं आधार नाहीं.

२. ऋग्वेदांतील शुनःशेपाचीं स्तोत्रें बहुधा मनुष्ययज्ञासंबंधी असावींत.

३. ऐतरेय ब्राह्मणांत जे विधि सांगितले आहेत त्यांत लाक्षणिक मनुष्ययज्ञाची सूचना नाहीं, तर वास्तविक मनुष्ययज्ञाची सूचना आहे.

४. पुरुषयज्ञाकरितां पहिल्यानें मनुष्यांचा वध करावा लागत असे.

५. शतपथ ब्राह्मणांत कित्येक प्रसंगीं मनुष्याचा यज्ञ करण्याची आज्ञा आहे, परंतु पुरुषमेध लाक्षणिक धरिला आहे.

६. तैत्तिरीय ब्राह्मणांत अश्वमेधाच्याठायीं मनुष्यवध करण्याची आज्ञा आहे.

७. पुराणांत चंडिकेस मनुष्यबलि अर्पिणें निर्बाध मानिलें आहे. परंतु पुरुषमेधाचा निषेध केला आहे.

८. तंत्रांमध्यें चंडिकेस मनुष्यबलि देण्याविषयीं आज्ञा आहे; आणि जेव्हां मनुष्य मिळत नाहीं तेव्हां मनुष्याची प्रतिमा करून अर्पावी असें सांगितलें आहे."

## यज्ञांविरुद्ध प्रतिकार.

हिंदुलोकांचा धर्म व आचार यांजमध्यें आजपर्यंत पुष्कळ फेरफार होत आले आहेत. त्यांनीं अनेक वेळां आपले देव बदलले हें आह्मी मागें दाखविलेंच आहे; द्यौस्, वरुण, अग्नि, इंद्र ह्यांच्या जागीं विष्णु, शिव, राम, कृष्ण हे येऊन बसले आहेत.

याप्रमाणेंच त्यांचे आचारही बदलले आहेत. आर्यांनी प्रथम पंजाब देशांत प्रवेश केला तेव्हां ते मोठे पशुचारणजीवी लोक होते. त्यांच्या गुरांढोरांच्या कळपांकडून त्यांचें मुख्यत्वें उपजीवन होत असे. वैदिक

काळांत आर्य लोक प्रशस्त रीतीनें गोमांस भक्षण करीत व सोमरस प्राशन करीत, असें आह्मी मागें सप्रमाण सिद्ध केलें आहे. त्यांचा बहुतेक काळ मूळ प्रजांचीं शेतें व गुरें घेण्याकरितां लढाई करण्यांत जात असे. इंद्र हा मोठा बलिष्ठ योद्धा आहे असें मानून त्यांनीं त्याला आपला मुख्य देव केला होता.

पुढें हळु हळु आर्य लोकांस देश जिंकून घेतल्यावर स्वास्थ्य प्राप्त झालें. त्यांचे शत्रु पळून जाऊन गिरिकंदरीं राहते झाले, किंवा त्यांस शरण जाऊन त्यांचे ताबेदार झाले. आर्य लोक आपल्या पूर्वजांपेक्षां सौम्य झाले. गोमांस हें उत्तम अन्न आहे व सोमरस उत्तम पेय आहे असें समजणें सोडून देऊन कोणताही जीव मारूं नये व कोणताही मादक पदार्थ सेवन करूं नये असे विचार त्यांच्यामध्यें निघाले. तसेंच वैदिक काळांत जें माहीत नव्हतें असें जन्मांतरांचें मत त्यांच्यामध्यें उत्पन्न झालें. मनुष्य मेल्यावर त्याचा आत्मा दुसऱ्या योनींत जातो असें प्राचीन आर्यांचें मत नव्हतें; परंतु त्यांच्या वंशजांनीं तें आदरिल्यावरून मांस न खाण्याविषयीं त्यांस एक मोठें निमित्त झालें. एखाद्या वेळीं आपली आजी मेंढीच्या जन्मास गेली असली तर मेंढी मारून खाल्लीं असतां आजीला खाल्ल्यासारिखें होईल, असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले.

अशा विचाराच्या काळांत पशुभक्ति चालू झाली, तिचें वजन मांस भक्षणाऱ्यांविरूद्ध पडूं लागलें. प्राचीन आर्य लोक केवळ आकाशांतील जडें व शक्ति यांची भक्ति करीत. ते गायी पवित्र मानीत नसत, तर त्या मारून त्यांचें मांस निषिद्ध न मानितां खात. परंतु जेव्हां त्यांची ते भक्ति करूं लागले तेव्हां आपले देव खाणें ह्मणजे आपल्या आईबापांस खाणें असें त्यांस दुष्कर्म वाटूं लागलें.

यज्ञ व सोमरस यांचा निषेध करण्याच्या कामीं जे लोक होते त्यांजमध्यें गौतम बुध हा प्रमुख होता. हा एका हिंदु राजाचा पुत्र असून त्याच्या काळाला आतां २४०० वर्षें झालीं. त्याची पहिली आज्ञा अशी होती कीं, "कोणाचाही जीव घेऊं नको." ह्या आज्ञेंत त्यानें सर्व प्रकारच्या जीवांचा समावेश केला होता. त्यानें आपल्या शिष्यांस कोणती-

ही वनस्पति उपटण्याची मनाई केली होती, कारण तींत प्राण्यांसारिखाच जीव असून मनुष्य मरून त्याचा आत्मा तिच्यांत गेलेला असेल अशी त्याची कल्पना होती. यज्ञाच्या विरुद्ध बौद्ध लोकांचीं जीं वादप्रमाणें होतीं त्यांपैकीं एक हें होतें कीं, 'ज्योतिष्टोम विधि करितांना तत्प्रीत्यर्थ मारिलेला पशु स्वर्गास जातो असें असलें तर यज्ञकर्त्यानें यज्ञांत आपला बापच कां बळी न द्यावा!'

बुधाची दुसरी एक आज्ञा अशी होती कीं, "कोणताही मादक पदार्थ सेवन करूं नको." दारू पिण्यापासून जे अनर्थ होतात ते लोकांच्या अनुभवास येत चालले, आणि जरी ऋग्वेदांत सोमस्तुतीचीं ११४ सूक्तें आहेत तरी सोम प्राशन करणें पुष्कळ हिंदु लोकांनीं सोडून दिलें, केवळ थोड्याशा जातींमध्यें मात्र दारू पिण्याची संवयी राहिली.

बुद्धानें जे धर्मसंबंधी फेरफार करण्याविषयीं वाद केला ते प्रचारांत आणण्याच्या कामीं अशोक नामक मगधदेशच्या महापराक्रमी राजाचें वजन बऱ्याच उपयोगास पडलें. याची कारकीर्द इ. स. पू. २६०—२२० पर्यंत होती. त्यानें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागीं खडकांत लेख खोदून ठेविले आहेत, त्यांपैकीं एक येणेंप्रमाणें आहे:— "देवांचा प्रिय जो राजा पियदासी त्याचा हा आज्ञालेख आहे. जीवहत्या अगदीं बंद केली आहे."

ह्या प्रतिकाराचा मागमोस क्रमशः लावितां येतो. अतिप्राचीन मानिलेलें असें जें ऋग्वेदाचें ऐतरेय ब्राह्मण त्यांत खरोखर पशुयज्ञ होत असत अशी सूचना केली आहे. शतपथ ब्राह्मणांत कित्येक ठिकाणीं त्यांचा परमार्थपर अर्थ करण्याचा यत्न केला आहे. पशु व मनुष्यें ह्यांस यज्ञस्तंभाशीं बांधल्यावर सोडून देऊं लागले. ब्राह्मणलोकांनीं बुधाचे कित्येक मुख्य सिद्धांत आदरले, आणि यज्ञांत देखील पशुवध करणें हें त्यांस अघोर वाटूं लागलें. ज्या काळीं मनुसंहिता रचली त्या काळीं हिंदुधर्म अंशतः स्थित्यंतर पावत होता. संहितेंतील आज्ञा व वचनें यांत परस्पर विरोध दृष्टीस पडतो:—

"ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांनीं यथाविधि यागासाठीं शास्त्रविहित मृगपक्षी मारावे. अवश्य पोषणाला योग्य असा दासवर्ग, वृद्ध मातापितरादिक यांच्या रक्षणार्थ पूर्वकालीं अगस्त्य ऋषीनें तसें केलें आहे." (मनु. ५.२२)

"ज्यापेक्षां प्राचीनकालीं ऋषींनीं आपल्या यज्ञांमध्यें भक्ष्य जे मृगपक्षी त्यांच्या मांसेंकरून पुरोडाश केलें त्यापेक्षां यज्ञासाठीं एतत्कालीन ब्राह्मणादिकांनींही मृगपक्षी मारावे (२३).

दुसऱ्या पक्षीं असें म्हटलें आहे कीं, "जो माणूस प्राण्यांला बंधन, वध इ० क्लेश करण्याची इच्छा करीत नाहीं तो, सर्वांच्या हिताची इच्छा करणारा होत्साता अनंत सुखाप्रत पावतो (४६).

मांस भक्षण न करणें हें यज्ञ करण्यापेक्षांही श्रेष्ठ आहे, असें पुढील वचनांत दर्शविलें आहे :—

" जो पुरुष शंभर वर्षेंपर्यंत प्रतिवर्षी अश्वमेध यज्ञ करितो तो, आणि जो यावज्जीवपर्यंत मांस भक्षण करीत नाहीं तो या उभयतांचें पुण्यफल ( स्वर्गादिक ) समान जाणावें ( ५३ ).

पशुयज्ञांचा काल होऊन गेला आणि त्यांच्या जागीं दुसरे विधि आले, असें पुढील वचनांत दर्शविलें आहे.

" होमयागादिरूप वेदविहितक्रिया त्या सर्व स्वतां नाशवंत असून त्यांचीं फलें जीं स्वर्गादिक तींही नाशवंत आहेत. परंतु प्रजांचा अधिपति जें ब्रह्म तेंच हा ओंकार आहे. यास्तव यागादिरूप क्रियारहित जो ओंकार तो स्वरूपतः अविनाशी आहे. कारण ब्रह्मप्राप्तीला हेतु आहे, आणि याच्या जपानें ब्रह्मरूप होणें तें नाशवंत नाहीं यास्तव फलेंकरूनही तो अविनाशी आहे(२:८४).

" दर्शपौर्णमासादिक जे विधियज्ञ त्यांहून प्रणवादिकांच्या जपरूप यज्ञाचें फळ दशगुणित विशेष होतें. तो जपयज्ञ उपांशु (म्ह० समीप बसलेल्या दुसऱ्यासही अश्रुत ) केला असतां शतगुण अधिक होतो; मानासिक (मनांत केलेला) जप सहस्रगुण अधिक होतो (२. ८५ ).

महर्षींनीं सांगितलेले गृहस्थाश्रमाचे पंचमहायज्ञ येणेंप्रमाणें होते:—

" वेदाचें अध्यापन, व अध्ययन करणें तो **ब्रह्मयज्ञ**, अन्नादिकानें किंवा उदकानें तर्पण करणें तो **पितृयज्ञ**, अग्नीचे ठायीं जो होम करणें तो **देवयज्ञ**, भूतबलि तो **भूतयज्ञ**, आणि अतिथीचें पूजन करणें तो **मनुष्ययज्ञ** "(३.७०).

पशुयज्ञ बंद करण्यास वैष्णवांचा भक्तिमार्ग हा बऱ्याच अंशीं सहायभूत झाला. गेल्या पांचसहाशें शतकांत चंडिकेला देखील बकरीं व रेडे यांच्या यज्ञाच्या जागीं भोपळे व ऊंस वाहूं लागले हें वर सांगितलेंच आहे.

कालिकादेवीस बकरीं व रेडे यांचा बळी अद्याप देतात, परंतु

मनुष्याच्या जागीं त्याची प्रतिमा बनवून तिची **प्राणप्रतिष्ठा** केल्यावर ती अर्पितात.

[पुराणांत पशुयज्ञाचा निषेध कसा खडसून केला आहे याविषयीं मत्स्यपुराणांतील पुढील उतारा लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे :—]

"त्या कालीं सर्व ऋत्विज त्या श्रेष्ठ कर्मांत स्वकर्माविषयीं प्रवृत्त असून होम करणारा अग्नींत अनेक प्रकारचे होमद्रव्यांचा देवांच्या उद्देशानें होम करीत असतां, तेथें देव आले; तेव्हां सामवेदाचें गायन करणारे सुस्वरानें गायन करूं लागले; ते समयीं अध्वर्यूच्या हाताखालचे त्वरायुक्त पुरुष पशूंस मारण्याविषयीं प्रवृत्त होऊन त्यांनीं ते यज्ञाचे पशु मारले असतां, मन आदिकरून सर्व इंद्रियांस प्रेरणा करणारे जे देव आहेत ते यज्ञांतील भाग ग्रहण करणारे आहेत; ते देव नंतर त्या कालीं यज्ञार्थ बोलावून तेथें आले असतां; जे प्रतिकल्पाचे आरंभीं इंद्राचें साहाय्य करणारे देव असतात ते त्या देवांचें यजन करतात. नंतर अध्वर्यूनें प्रैषोच्चार करण्याचे समयीं ते सर्व महर्षि उठले; आणि आर्तस्वरानें ओरडणाऱ्या त्या पशूंच्या समुदायास पाहून ते दयाळू ऋषि त्या कालीं त्रैलोक्यराज इंद्रास विचारूं लागले कीं, हे इंद्रा, हा तुझे यज्ञाचा विधि कसा आहे? हे देवोत्तमा इंद्रा, या तुझ्या यज्ञांत धर्माच्या इच्छेनें ही दीनपशूंची हिंसा चालली आहे हा महाबलिष्ठ अधर्म आहे; तस्मात् पशु मारण्याचा हा विधि तुझे यज्ञांत आह्मांस इष्ट नाहीं. हे इंद्रा, त्वां धर्माच्या नाशार्थ पशु मारून हा अधर्म आरंभला आहेस, हा कांहीं धर्म नव्हे; तर हा अधर्मच आहे; कारण शास्त्रांत हिंसेस धर्म असें ह्मणत नाहींत. तस्मात् तूं धर्म करण्यास इच्छीत असशील तर वेदाचे प्रमाणानें धर्माचें आचरण कर. हे देवश्रेष्ठा, ज्या धर्मांत इतरांस दुःख नाहीं अशा शास्त्रविधियुक्त यज्ञाचे विधीनें धर्म, अर्थ व काम यांचे साधनास कारण अशा यज्ञोपयोगी धान्यांचे बीजांनीं यज्ञ कर. हे इंद्रा, हाच यज्ञ महान् श्रेष्ठ असें पूर्वीं ब्रह्मदेवानें सांगितलें आहे; याप्रमाणें तत्त्वज्ञानी ऋषींनीं सांगितलें तरी तो त्रैलोक्यराज इंद्र, गर्व व अविचार यांनीं युक्त होता; त्यामुळें त्यानें तें ऋषींचें मत मानिलें नाहीं. तेव्हां तेथें इंद्र व महर्षि यांचा मोठा विवाद उत्पन्न झाला; तो असा कीं, जंगम (पशु) स्थावर (धान्यबीजें) यांत कोणते द्रव्यानें यज्ञ करावा.

"नंतर ते ऋषि वादशक्तीनें समर्थ असूनही त्या वादानें खिन्न (श्रमी) होऊन इंद्राशीं मध्यस्थाचे द्वारानें निर्णय करण्याचा संकेत करून त्याविषयीं उपरिचर वसुराजास विचारितात. ऋषि बोलले, उत्तानपादवंशस्था, महाबुद्धिमंता, समर्था, उपरिचर वसुराजा, त्वां वेदशास्त्रांत यज्ञाचा विधि कसा पा-

हिला आहेस, तो सांगून आमचा संशय दूर कर. असें तें ऋषींचें वाक्य श्रवण करून तो उपरिचर वसु त्यांस बोलूं लागला. तो राजा बोलला कीं, मुंज झालेल्या ब्राह्मणांनीं जसा अवश्य यज्ञ करावा; तसेंच शुद्ध पशु किंवा फळें व मूळें यांनीं यज्ञ करावा. ऋषीहो, हिंसा हा यज्ञाचा स्वभावच आहे; असें माझ्या पहाण्यांत आहे; तसेंच यज्ञाचे मंत्रांतही पशुहिंसा करण्याचींच लिंगें आहेत; असें दीर्घ तप करणारे असून सर्व नक्षत्रादिकांस ज्ञानदृष्टीनें प्रत्यक्ष पाहणारे ऋषि जाणतात; या प्रमाणावरून म्यां सांगितलें; तस्मात् आतां तुह्मीं या वादापासून शांत होण्यास योग्य आहांत. ब्राह्मणहो, आपलीं वेदवाक्यें जर तुह्मास प्रमाण आहेत; तर जसें वेदवाक्यांचें प्रमाण आहे; तसा तुह्मीं यज्ञ प्रवृत्त करावा; परंतु अन्यथा भाषण न करावें. असें त्या मध्यस्थ उपरिचर वसुराजानें उत्तर केल्यावर त्या ऋषींनीं ध्यानयोगानें पुढें अवश्य होणारें तें भविष्य जाणून त्या कालीं त्या उपरिचर वसुराजास तूं खालीं पड असा शाप दिला, नंतर तो राजा पूर्वीं असा आकाशमार्गांत संचार करीत असून असें ऋषींचे मुखांतून शापवज्र निघतांच त्यानें तो राजा रसातळांत प्रवेश करिता झाला. वसुराजा धर्मांचे विचारांत संशयच्छेद करणारा असून तो ऋषींच्या शापवाक्यानें खालीं जाऊन भूतलावर संचार करूं लागला." (मत्स्यपु० अ०१४२.)

## वेदांतील प्रार्थना.

प्रार्थना हें धर्माचें एक आवश्यक अंग आहे. ईश्वराच्या ठायीं श्रद्धा ठेवणारा मनुष्य आपल्यास ज्या वस्तूंची गरज आहे असें समजतो त्या त्याजपाशीं मागतो.

प्रार्थना ही मनुष्याच्या वर्तनाचें व ज्या देवाची तो भक्ति करितो त्याच्या मानिलेल्या स्वभावाचें दर्शक आहे. बहुतेक लोक प्रपंचबुद्धीचे असतात, त्यांच्या प्रार्थना विषयसुखें प्राप्त होण्याकरितां असतात, ह्मणजे संपत्ति, संतति, आरोग्य, ऐहिक शत्रूपासून सुटका, इ० ते मागतात. परमार्थबुद्धीचीं मनुष्यें थोडीं असतात, तीं पापक्षमा, पवित्रता व ईश्वरी समागम यांची इच्छा बाळगून त्यांच्या प्राप्तीसाठीं प्रार्थना करितात.

प्रार्थनेंत बळ आहे असा वैदिक आर्यांचा दृढ विश्वास असे. एका सूक्तांत असें ह्मटलें आहे कीं, "इंद्र आमचें ऐको, कारण त्याला ऐकायास कान आहेत. आह्मी त्याजपाशीं धन मागितलें आहे; तो आमच्या

प्रार्थनांचा धिक्कार करील काय?" वास्तुप्रवेश (घरभरणी) करितेसमयीं रक्षकदेवतेची येणेंप्रमाणें प्रार्थना केली आहे:—"हे गृहस्वामी, आह्मास एथें स्वागतेंकरून बोलाव; आह्मास संकटापासून मुक्ति दे आणि सुखप्रवेश; आह्मी प्रार्थनेसहित जवळ येतों, ती तूं आह्मापासून स्वीकार. द्विपाद व चतुष्पाद यांस प्रसन्न हो." वेदांत पुष्कळ प्रार्थनांचा संग्रह आहे.

वैदिक सूक्तांत बहुधा आरंभीं देवांच्या मानलेल्या श्रेष्ठ गुणांची, महत्कर्मांची व कधीं कधीं त्यांच्या रूपाच्या सौंदर्याचीही स्तुति केलेली असते. याविषयीं खालीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत.

"परमसुंदर, श्रेष्ठ, संपत्तिमान्, परमपराक्रमी व डौलाचा (प्रौढ) अशा इंद्राचें मी स्तवन करितों."

इंद्राच्या पराक्रमाची स्तुति:—

"तूं अभिग्व याचा कैवार घेऊन आपल्या उजळ व चकचाकित भाल्यानें करंज व परनय यांचा वध केलास; कोणाचें सहाय न घेतां तूं वंद्रिद याचीं शंभर नगरें रिजस्वान यानें वेढलेलीं असतां पाडून टाकिलींस."

अग्नीची स्तुति:—

"अमर व प्रकाशमान अग्नि, हव्यद्रव्यें नेणारा, रुद्र व वसु यांनीं सन्मानित देवांस बोलावून आणणारा, अर्पणांचा अध्यक्ष, जो संपत्ति वाटून देतो, आपल्या उपासकांनीं स्तविलेला, आणि मनुष्यांमध्यें रथासारिखा वाखाणलेला, तो आपणास एकामागून एक अशीं दिलेलीं अर्पणें मान्य करितो."

"जन्मरहिता [ईश्वरा] प्रमाणें अग्नि विस्तीर्ण पृथ्वीला धारण करितो, आणि सत्यमंत्रांच्या योगानें द्युलोकास सांवरून धरितो."

"स्वर्गाचें मस्तक, पृथ्वीची नाभि जो अग्नि तो स्वर्ग आणि पृथ्वी यांचा प्रभु झाला. हे वैश्वानरा, सर्व देवांनीं तुला उत्पन्न केलें."

वरुणाच्या ठायीं सर्वाधिकार होता असें दुसऱ्या एका सूक्तांत ह्मटलें आहे:—

"हे प्रज्ञावंत देवा वरुणा, तूं सर्वांचा प्रभु आहेस."

मरुतांचें स्तवन व प्रार्थना:—

"हे मरुतहो, कर्मांचे पुढारी, आह्मांस प्रसन्न व्हा, तुह्मी अत्यंत संपत्तिमान, अमर, पर्जन्याची वृष्टि करणारे, सत्याविषयीं कीर्तिमान, प्रज्ञावान, तरुण, महाप्रशंसित व बहुत अर्पणांनीं उपासित [असें आहांत.]

कधीं कधीं देवांच्या सौंदर्यावरून त्यांची स्तुति केली आहे. देवांस वारंवार "सुरूप" ह्मटलें आहे. अनार्य लोकांचीं नाकें लहान होतीं, त्यांस आर्य लोक "बोकडाच्या नाकाचे" किंवा "नकटे" ह्मणत. परंतु इंद्राच्या नाकाचें वर्णन केलें आहे तें येणेंप्रमाणेः—

"हे सुशिप्र * इंद्रा, हर्षकारक स्तोत्रांनीं या यज्ञांत हर्ष पाव."

"जी चांगल्या बाहूंची, चांगल्या अंगुल्यांची, जी पुष्कळ मुलांना जन्म देणारी, त्या विश्वस्वामिनी सिनिवालीला † (चंद्राला) हव्य अर्पण करा."

## आर्य लोकांचीं आपल्या देवांपाशीं मागणीं.

**संपत्ति.**—प्राचीन आर्य लोक पशुचारणजीवी होते. ऋग्वेदांत गायींविषयीं पुष्कळ सूचना आहेत ; "गायी चोरून नेलेल्या परत आणिल्या," "गायी लुटून नेल्या" "गायी दान दिल्या," अशीं वचनें जागोजाग अढळतात. गायी मिळण्याविषयीं देवांच्या प्रार्थनाही पुष्कळ आहेत, तथापि दुसऱ्याही प्रकारची संपत्ति ते मागत असत. याविषयींचीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेतः—

"हे इंद्रा, सुख देणारी, यशस्कर, सर्वकाळ स्थिर राहणारी, आणि सर्वांत मोठी दौलत आह्मास आनंद होण्यासाठीं घेऊन ये."

"हे अग्नि, जें अन्न स्वर्गामध्यें, अंतरिक्षामध्यें तें आह्मासाठीं आण ; आणि पृथ्वीवर जी संपत्ति आहे ती आह्मास दे."

"हे उषे, तूं आह्मांस मोठें आणि सर्व प्रकारचें भाग्य भरपूर दे. आणि आह्मास धनधान्य भरपूर दे. हे अन्नपूर्णे तूं आम्हास अन्नें भरपूर दे."

"हे सत्वरगामी अश्वी हो, आह्मी धनाढ्य होऊं असें करा."

"पराक्रमशाली पुरुषापाशीं आह्मी धनसंपत्ति याचितों."

**पर्जन्य.**—पावसाकरितां इंद्राची वारंवार प्रार्थना केली आहेः—

"हे इंद्रा, तूं सर्वत्र अन्न विपुल, सहज मिळण्याजोगें, आणि निश्चयपूर्वक परिपूर्ण असें करितोस ; गायींचीं कुरणें उघडीं ठेव ; आणि पुष्कळ संपत्ति दे."

"हे इंद्रा, जेव्हां तूं आपल्या शत्रूंचा नाश करितोस तेव्हां पृथ्वी व स्वर्ग तुला

---

* [ सुशिप्र याचा अर्थ सायनाचार्य "चांगली हनुवटी ज्याची अथवा चांगलें नाक ज्याचें" असा करितात. वेदार्थयत्नकर्ते सुमुख असा अर्थ करितात. ]

† [ हें एका क्षुद्रदेवतेचें नांव आहे. वे. य. भा. ४ पृ. २२३ टीप पाहा. ]

सहाय करायास असमर्थ होतात; तूं आकाशांतील उदकांस आज्ञा दे; आह्मास उदारपणानें गायी पाठीव."

**संतति.**—ही मिळण्यासाठीं वारंवार प्रार्थना केल्या आहेत:—

"हे अग्नि, मला वीर्य, संतति व आयुष्य दे."

"बृहस्पति हा मोठा प्रबळ, सामर्थ्यवान आणि वीर्यवान देव झाला आहे.... आह्माला अन्न, बळ आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र यांची प्राप्ति होवो."

"हे इंद्रा,......तुझ्या कृपेनें शूरपुत्रसंपन्न आणि फार दीर्घायुष्यसंपन्न होत्साते तुला स्तवित राहूं असें कर."

"हे रुद्रा, आह्मी पुत्रपौत्रांनीं वाढूं असें कर."

"हे सुकेशभार सिनीवाली (चंद्रदेवता), जी देवांची बहीण होस ती तूं हें आह्मी अर्पण केलेलें हवि सेव. हे देवी तूं आह्माला संतति दे."

**ऋण.**—कर्जदार होण्याची चाल हिंदुस्थानांत फार प्राचीनकाळापासून आहे. पुढील प्रार्थना कर्जाच्या संबंधाची आहे:—

"हे वरुणा, माझ्या वाडवडिलांनीं करून ठेविलेलें कर्ज व आतां मी केलेलें कर्ज काढून टाक; हे राजा वरुणा, दुसऱ्यांनीं करून ठेविलेले कर्जावर मी अवलंबून राहूं नये (आपलें पोट न भरावें) असें कर."

**संकटापासून रक्षण.**—आर्य लोक या देशांतील मूळ प्रजांशीं सतत लढाई करण्यांत गुंतलेले असतां त्यांजवर अनेक संकटें येत, त्यांपासून रक्षण होण्याकरितां ते आपल्या देवांच्या वारंवार प्रार्थना करीत:—

"हे इंद्रा, तूं स्तुतीचा विषय आहेस, मनुष्यें आमच्या शरीरांस अपकार न करोत; तूं पराक्रमी आहेस, जुलमापासून आमचें रक्षण कर."

"अजिंक्य इंद्रा, लुटींनें भरलेल्या लढाईंत अनिवार्य आश्रयांकडून आमचें रक्षण कर."

"हे शुभकारी [अश्वी देवहो,] तुह्मी आमचे उत्तम रक्षक व्हा, आणि घातक दुष्टापासून आम्हाला रक्षा."

"हे तरुण आणि अत्यंत प्रकाशमान अग्नि, पिशाचांपासून आमचें रक्षण कर; आणि जो दुरात्मा (मनुष्य) दान देत नाहीं, त्यापासून; आणि अपकारक प्राण्यांपासून; आणि जे आमचा प्राण घेऊं पाहतात त्यांजपासून आमचें रक्षण कर."

"हे इंद्रा, वादळ वांकडें वांकडें जाऊन दूर पळो आणि अरण्याकडे जाओ." *

**शत्रूच्या नाशाविषयीं.**—कित्येक प्रार्थना सर्व प्रकारच्या अनिष्टकारक मनुष्यांविषयीं आहेत:—

"प्रकाशमान अग्नि, घृताच्या हवीनें आवाहित केलेला, ज्यांस पिशाचांचा आश्रय आहे असे जे आमचे शत्रु त्यांस जाळून भस्म कर."

"हे अग्नि, द्वेष्टयांला, राक्षसांला, आणि पिशाचांला हाकून लाव."

"हे इंद्रा, जे कोणी आमची निंदा करितात त्या सर्वांचा नाश कर; जे आह्मास पीडा करितात त्यांचा वध कर."

"हे इंद्रा, हा वैतालिक भाषणानें तुझी स्तुति करणारा गाढव याचा नाश कर."

"हे वज्रधरा, दस्यूंच्या अंगावर शस्त्र टाक, हे इंद्रा, आर्य लोकांचें बळ आणि यश वाढीव."

"हे धार्मिकांच्या प्रभो, आमच्या आर्यशत्रूंचा वध कर, आमच्या दस्युशत्रूंचा वध कर, जे कोणी आमचा द्वेष करितात त्या सर्वांचा नाश कर."

ज्या ऋषींनीं वैदिक स्तोत्रें रचिलीं ते सर्वदा परस्परांशीं मित्रभावानें वागत होते असें नाहीं. वशिष्ठ आणि विश्वामित्र यांच्या कुळांमध्यें विशेषेंकरून उघड उघड वैर असे. हा वैरभाव सर्व वैदिक काळांत चालू होता. भारतादि काव्यांच्या काळांत तर हें प्रकरण फारच पेटलें, आणि पुढें बराच काळपर्यंत तें धुमसत होतें. हा द्वेष इतका होता कीं, वेदावर भाष्य करणारा जर वशिष्ठाच्या गोत्रांतील असला तर तो ज्यांत विश्वामित्रानें वशिष्ठाला शाप दिले आहेत अशा ऋचांचा अर्थ करीत नाहीं. ह्या हाडवैराचें कारण असें सांगतात कीं, एकदां वैदिक काळांतील एका छोटेखानी राजानें आपल्या यज्ञाच्या ठायीं विश्वामित्राच्या जागीं वशिष्ठास मुख्य होता ( उपाध्या ) नेमिला, हेंच त्यांच्या वंशपरंपर द्वेषास कारण झालें.

मार्कंडेय पुराणांत वशिष्ठानें शाप देऊन विश्वामित्राचा बगळा

* [ ह्या मंत्रावर वे. य. कर्त्यांच्या टीपेंतील कांहीं भाग येणेंप्रमाणें आहे:—"पण असा प्रश्न निघतो कीं, नुसती वावटळ अंगावर येऊं नये इतक्याच साठीं ज्यांस इंद्राची मोठी विनवणी करावी लागे त्या पुरातन ऋषींनीं तप केलें ह्मणजे इंद्रास भीति पडे, आणि त्यांच्या आशीर्वादानें सूर्य उगवेल आणि शापानें जळून जाईल अशी त्यांस शक्ति होती. या कथेचा काय परिणाम. वे. य. भा. १. पृ. २८६ ]

केला, आणि विश्वामित्रानें वशिष्ठाची शाळुंका केली अशी कथा आहे. ह्या उभयतांचें इतकें तुंबळ युद्ध झालें कीं तेणेंकरून सृष्टिक्रम भंग झाला, आणि पुष्कळ प्राणी मरण पावले!

जे यजमान ऋषींस सढळ हातानें दक्षिणा व दानें देत नसत त्यांचाही ते द्वेष करीत:—

" अनुदार ( कृपण ) मनुष्याचा इंद्र झुडपाप्रमाणें केव्हां चुराडा करील ?"

" जो मनुष्य हव्य अर्पण करीत नाहीं तो कितीही समृद्ध असला तरी इंद्र त्याचा सहवास करीत नाहीं; तर तो अशा पुरुषाला व्याकुल करितो आणि एकदम त्याचा नाश करितो. आणि धार्मिक मनुष्याला गुरांचा कळप त्याचा भाग असा देतो. "

" हे प्रज्ञावान देवा, भक्तीचा द्वेष करणाऱ्यावर आपलें तप्त वज्र फेंक. कृपणांच्या काळजांत शस्त्र भोंसक, आणि मग त्यांस आमचे ताबेदार कर. "

परंतु आर्यांनीं आपला अत्यंत भयंकर द्वेष मूळच्या रहिवाशांकरितां राखून ठेविला होता. ते त्यांस राक्षस मानीत:—

"इंद्र आणि सोम हो, राक्षसांस जाळून टाका, त्यांस चीत करा. हे उभय वृषभ हो, त्यांस चीत करा, त्यांचा गळा दाबा, त्यांचा जिव घ्या, त्यांस फेंकून द्या, आणि बुभुक्षितांचा वध करा. इंद्रा, सोमा, शाप देणाऱ्या पिशाचावर दोघे मिळून उठा! तो हविद्रव्यासारिखा विस्तवांत जळो व चरचरो! जो ब्राह्मणाचा द्वेष करितो, जो मांस खातो, आणि ज्याचें रूप ओंगळ आहे, त्या लुच्चावर आपला चिरकालिक द्वेष घाल. "

" हे इन्द्रा, तुझा वज्रनाद जवळच्या शत्रूंस ऐकूं येवो, तूं त्यांजमध्यें तुझी अत्यंत तेजस्वी शक्ति ( भाला ) मार, तूं त्यांजला मुळांपासून कापून टाक, मारून टाक. पराजित कर. राक्षसांस मार. हे मघवान्, तूं त्यांजला आपल्या अधिकाराखालीं आण. "

" हे इंद्रा, राक्षसकूळ मुळासहित उपटून टाक. त्याची शेंडा कापून टाक. राक्षसांला अत्यंत दूर ठेव. ब्रह्मद्वेष्ट्यांवर तूं जाळणारें शस्त्र फेंक. "

**पापक्षमेकरितां प्रार्थना.**—ह्या इतर प्रार्थनांपेक्षां फारच थोडक्या आहेत. त्या मुख्यत्वेंकरून वरुणाच्या दोन किंवा तीन स्तोत्रांत अढळतात. त्यांपैकीं कांहीं उदाहरणार्थ सांगतों:—

"उदकेंहो, मजमध्यें जें कांहीं पाप तुम्हाला सांपडलें असेल तें दूर करा. मी

समजून उमजून जो अपराध केला असला, अथवा पवित्र मनुष्यांस शाप दिले असले, अथवा अनृत भाषण केलें असलें तर ( त्याची क्षमा करा )."

" अदिति, मित्र आणि वरुणहो, तुह्मांविरुद्ध जर आह्मी जें पाप केलें असलें तर त्याची क्षमा करा. दीर्घ अंधकार आह्मांस न आच्छादो. आदित्य आह्मास निष्पापता देवोत."

" हे अग्नि, आह्मास आमच्या पापांचा पश्चात्ताप होवो; आह्मास धन प्रगट कर; आह्मास आमच्या पापांचा पश्चात्ताप होवो."

**प्रार्थना ही किफायतीचा व्यापार आहे असें आर्य लोक मानीत.**–उपासकांनीं देवांस अर्पण केलेलीं स्तोत्रें व हवि यांच्या योगानें त्यांची ( देवांची ) शक्ति वाढते असा आर्य लोकांचा समज होता:—

" ह्या आमच्या स्तुतीकडून हे दीर्घायु इंद्रा, तुझी शक्ति वाढो; तिजकडून आह्मास आनंद प्राप्त होवो."

" इंद्रा, तूं निघून जा; आपल्या हातांत वाग्दोर घे; ओतलेल्या आणि चेतवलेल्या रसांनीं तुला आल्हादित केलें आहे; वज्रधरा, याप्रमाणें आहारानें संतृप्त होत्साता आपल्या भार्येसंगतीं आनंद कर."

"हे इंद्रा, जे तुला हवि अर्पण करितात ते तुझें महाबल आणि पुरुषवीर्य यांची वृद्धि करितात."

वेदांच्या सूक्तांत उपासकांची आपल्या देवांवरील प्रीति किंवा त्यांची कृतज्ञता ह्या भावना फारच थोड्या दृष्टोत्पत्तीस येतात. देव आणि त्यांचे भक्त हे देवघेवीचा व्यापार करणाऱ्यासारिखे दिसतात. " मी ह्या मालाला इतकें देतों " असें त्यांचें बोलणें आहे. बार्थ नामक एक महासंस्कृत विद्वान् वैदिक प्रार्थनांचा सारांश येणेंप्रमाणें सांगतोः —" एथें तूप आहे; आह्माला गाई दे." (तूप घेऊन त्याच्या मोबदला गाई दे, असा अर्थ.)

" अग्नीषोमहो, जो कोणी तुह्माला हें घृत अर्पण करितो त्याला पुष्कळ ( प्रतिफल ) द्या." ऋ. १.९३.

"हे अग्नि, धनप्राप्तीकरितां आह्मी तुझी स्तुति केली आहे." १.३१.

"हे इंद्रा, या देदीप्यमान, या आमच्या देदीप्यमान सोमरसांनीं तूं प्रसन्न होऊन गुरांच्या योगानें आमचें दारिद्र नष्ट करणारा हो." — सू. ५३.

"बलाचा पुत्र जो इंद्र त्याला आह्मास संपत्ति देण्याकरितां कोणतें योग्य

स्तोत्र आणील? — ३. २४. "इद्रांस जो हवि अर्पण करितो त्याला तो संपत्ति देतो." ३. २४.

रुद्र देवाची त्यानें "आपल्या उपासकांस व्यापाऱ्याप्रमाणें अडवून वेळ साधून घेऊं नये" प्रार्थना केली आहे.

देव व त्याचे उपासक यांच्या परस्पर संबंधाविषयीं क्यानन रालिन्सन असें ह्मणतात कीं, उपासक आपल्या उपास्य दैवताचा दास असण्याबद्दल देवच उपासकाचा दास नसला तरी चाकर असल्याप्रमाणें आहे, ह्मणजे भक्त हा धनी व देव हा त्याचा चाकर असा त्यांचा संबंध वेदांत दिसून येतो. जीं हव्यें व त्यांत विशेषतः सोमरस देवांस अर्पण करीत तीं त्यांस संतोषविण्याकरितां ह्मणून क्वचित् असत, पण बहुधा त्यांस बांधून घेण्याकरितां आणि उपासकास वर देण्यास भाग पाडण्याकरितां असतः—"ह्या माझ्या इंद्राला दाहा दुभत्या गाई देऊन कोण विकत घेतो?" असें वामदेव नामक एक वैदिक कवि (ऋषि) ह्मणतो. "त्यानें त्याच्या शत्रूला मारल्यानंतर विकत घेणारा मला तो परत देवो." ह्या ऋचेचा अर्थ भाष्यकार येणेंप्रमाणें करितोः—'वामदेवानें पुष्कळ स्तुति करून इंद्राला हस्तगत किंवा वश करून घेतलें, [आणि आतां] तो त्याला कबुलातीवर विकूं इच्छितो. तो त्याला दाहा दुभत्या गाईंवर थोडका वेळ दुसऱ्याच्या हातीं देऊं इच्छितो; परंतु त्याशीं अशी कबुलात करितो कीं, इंद्रानें त्या मनुष्याच्या शत्रूचा वध केल्यावर त्याला त्या विकत देणारास परत करावें.'

वेदाच्या पश्चात् हीच कल्पना मोठ्या जोरानें वाढली. अमूक काळपर्यंत तप केलें ह्मणजे देवांस इच्छित वर देणें भाग पडतें, मग वर देणारास त्या वरापासून संकट किंवा नाशही प्राप्त होण्याजोगा असला तरी तो त्याला द्यावाच लागत असे. याचीं उदाहरणें भस्मासुरास शिवानें दिलेल्या वराच्या कथेंत, व ब्रह्मदेवानें अनेक राक्षसांस दिलेले वर यांच्या कथेंत पाहावीं.

## ऋग्वेदांतील स्तोत्रांचे मासले.

वेदांतील ऋचांचे मासले वर पुष्कळ ठिकाणीं दाखविले आहेत, परंतु त्यांचें रूपलक्षण पूर्ण रीतीनें ध्यानांत येण्याकरितां कित्येक वैदिक

सूक्तें समग्र पाहिलीं पाहिजेत. बहुतकरून तीं सर्व सारखींच आहेत, तरी एक एका देवाच्या स्तुत्यर्थ वैदिक ऋषींनीं कसकशीं स्तोत्रें रचिलीं होतीं हें पुढील उदाहरणांवरून समजण्याजोगें आहे.

## अग्नीचीं स्तोत्रें.

१

१. "पुरोहित, यज्ञाचा देदीप्यमान ऋत्विज, होता, आणि संपत्तीतें अतिशयेंकरून देणारा अग्नि त्यास मी स्तवितों.

२. अग्नि पूर्वीच्या ऋषींनीं तसाच नव्या ऋषींनीं स्तुत्य होय; तो देवांस एथें आणो.

३. अग्नीच्या योगानें यजमान यज्ञसंपन्न आणि उत्तम वीर्यवान पुत्रांनीं युक्त अशा धनदौलतीसच दिवसानुदिवस पावो.

४. हे अग्नि, ज्या विघ्नरहित यज्ञासभोंतालीं तूं परिवेष्टन करून राहतोस तोच यज्ञ देवांप्रत प्रविष्ट होतो.

५. अग्नि हा कुशल, कपटरहित, आणि अतिशयेंकरून कीर्तिमान असा होमसंपादक होय; तो देव अग्नि देवांसहित येथें येवो.

६. हे बा अग्नि, तूं हविर्दान करणारांचें जें कल्याण करशील तें, हे अंगिरा खरोखरच तुझेंच कल्याण होतें.

७. हे रात्रींच्या वेळीं प्रकाशणाऱ्या अग्नि, प्रतिदिनीं आह्मी भक्तिपूर्वक नमन करीत तुझ्या संनिध येत असतों.

९. ह्मणून हे अग्नि, जसा पिता पुत्राला सुगम असतो तसा तूं आह्मांप्रत हो; आमच्या कल्याणास्तव आह्मांबरोबर राहा." (ऋग्वे. १. १.)

२

१. "हे अग्नि, तूं माझी ही समिध आणि ही माझी उपासना ग्रहण करून घे. आणि ह्या स्तुति चांगल्या प्रकारें ऐक.

२. हे अग्नि, या आहुतीनें आह्मांस तुला भजूं दे. हे बळाच्या पुत्रा, हे अश्वकामी, हे सुजात अग्नि, या स्तुतीनें आह्मांस तुला भजूं दे.

३. तर तुज स्तोत्रकामीला स्तोत्रांनीं, हे धनदात्या, तुज धनेच्छूला आह्मां भजकांस भजूं दे.

४. तर हे धनपती, हे धनदात्या, विद्वान् असा जो तूं तो संपत्ति देणारा हो. द्वेष्टयांला आह्मापासून दूर कर.

५. आणि आह्माकरितां द्युलोकांपासून वृष्टि कर, आणि अविनाशी बल दे, आणि हजारों प्रकारचें अन्न दे.

६. हे तरुणतमदूता, हे अत्यंत यजनकुशलहोत्या, आमच्या स्तुतीच्या योगानें तूं स्तुति करणाऱ्या रक्षणेच्छूप्रत ये.

७. हे अग्नि, हे प्रज्ञावान, प्रज्ञावान असा जो तूं तो जनांला हितकारक अशा दूताप्रमाणें उभयलोकांच्या मध्यें जातो येतोस.

८. यास्तव विद्वान् असा जो तूं तो देवांला आनंद कर आणि नंतर हे ज्ञानवान अग्नि, त्यांजप्रीत्यर्थ यजन कर. आणि ह्या दर्भांवर बैस. (२. ६.)

३

१. अरण्यांचा शत्रु आणि मर्त्यांचा मित्र असा जो अग्नि त्याला तरुण चाकर राजाला आवडतो तसा तरुण यजमान आवडतो. तर रक्षकाप्रमाणें चांगला आणि वीराप्रमाणें सुखकारक असा जो बुद्धिमान् होता अग्नि तो आमचा हव्यवाहक होवो.

२. सकल धनें हातांत घेऊन अग्नि जेव्हां गुहेंत जाऊन बसला तेव्हां त्यानें देवांस भयभीत केलें. मग ते बुद्धिमान् वीर जेव्हां मन लावून रचिलेले मंत्र ह्मणते झाले, तेव्हां हा त्यांस अवगत झाला.

३. जन्मरहिता [सूर्या] प्रमाणें अग्नि विस्तीर्ण पृथ्वीला धारण करितो आणि सत्य मंत्रांच्या योगानें द्युलोकास सांवरून धरितो. तर हे सकलान्न संपूर्ण अग्नि, गुरांस प्रिय जीं स्थानें तीं तूं संरक्षण कर आणि तूं गुहेंत लपून राहा.

४. गुह्यरूपानें असणाऱ्या अग्नीला जो जाणत असतो, जो सोमाचे धारेला धरून बसतो, आणि जे भक्तिभावेंकरून स्तोत्रें रचितात, त्यांस तो तत्काळ संपत्तीचा मार्ग दाखवितो.

५. जो आपल्या मोठेपणाच्या योगानें वनस्पतींच्या पोटीं वाढतो आणि जो आपल्या आयांच्या पोटीं जन्मतो, जो सर्वव्यापी, बुद्धिमान् अग्नि उदकांच्याठायीं असतो त्याला त्या स्थलीं त्याचें आसन जणूं मोजून देवांनीं स्थापिलें आहे. (१. ६७.)

## इंद्राचीं स्तोत्रें.

**ऋग्वेदांत इतर देवांपेक्षा इंद्राची स्तुति पुष्कळ केली आहे. पावसाकरितां व शत्रूच्या नाशाकरितां विशेषेंकरून त्याच्या प्रार्थना केल्या आहेत. लढाईंत बळ येण्याकरितां त्यानें सोमरस खूप झोकावा असें त्याला उत्तेजन दिलें आहे. उदाहरणार्थ दोन सूक्तें खालीं उतरून घेतलीं आहेत.**

१. "हे इंद्रा, तुझे पिंवळे घोडे तुला बलवंताला सोम पिण्यासाठीं येथें वाहून आणोत, सूर्याप्रमाणें दिसणारे ते घोडे तुला येथें आणोत.

२. तुपानें थपथपीत अशा ह्या लाह्यांजवळ पिंवळे घोडे इंद्राला परमसुखकारक रथांतून येथें वाहून आणोत.

३. इंद्राला आह्मी प्रातःकाळीं, इंद्राला यज्ञ चालू होतांच, इंद्राला आह्मी सोमपानार्थ बोलावीत असतों.

४. हे इंद्रा, तूं आपल्या अयाळी पिंवळ्या घोडयांच्या योगानें आमच्या ह्या सोमाप्रत ये; कारण कीं, सोम पिळून काढतांच आह्मी तुला बोलावीत आहों.

५. तर हे इंद्रा, तूं आमच्या ह्या स्तुतीप्रत, आमच्या ह्या सोमसेवनाप्रत ये, आणि ताहानेलेल्या गौरमृगाप्रमाणें सोमरस पी.

६. हे सोमबिंदू दर्भांवर गाळून काढिले आहेत. ते बळ येण्यासाठीं, हे इंद्रा, तूं पी.

७. हे इंद्रा, हें उत्तम आणि अंतःकरणास वेधणारें स्तोत्र तुला परमसुखकारक होवो. त्यानंतर हा पिळून काढिलेला सोम तूं पी.

८. जेथें जेथें सोम काढितात तेथें तेथें तो सोम प्यावा ह्मणून आणि मादयुक्त व्हावें ह्मणून वृत्रघ्न इंद्र जात असतो.

९. तर हे शतप्रज्ञ इंद्रा, तूं आमची ही इच्छा गाई आणि घोडे देऊन पूर्ण कर. तुला आह्मी भाविक अंतःकरणानें स्तवीत राहूं. " ( १. ४. १६. )

२

१. हे इंद्रा, सुख देणारी, यशस्कर, सर्वकाळ स्थिर राहणारी, आणि सर्वांत मोठी दौलत आह्मांस आनंद होण्यासाठीं घेऊन ये.

२. ज्या दौलतीच्या योगेंकरून आह्मी तुवां रक्षित असे आमच्या मुष्टींनीं शत्रूंस मारून फडशा पाडूं, किंवा घोडयावर बसून मारून फडशा पाडूं.

३. हे इंद्रा, आह्मीं आपला सोटा हातीं घेतला ह्मणजे तुवां रक्षिलेले असे जे त्या आह्मीं तुझें वज्रच धारण केल्याप्रमाणें होवो; आणि आमच्या शत्रूंवर आह्मांस युद्धांत जय मिळो.

४. हे इंद्रा, तुझें एकटयाचें साहाय्य मिळवून आह्मी जणूं काय अनेक शूर योद्धयांच्याच योगानें आमच्या लढाईखोर शत्रूंस जिंकून टाकूं असें कर.

५. इंद्र मोठा आणि मोठयापेक्षांहि अधिक आहे. वज्रधारी इंद्राच्या अंगीं मोठेपण राहो, आणि आकाशाप्रमाणें त्याचें बल विस्तीर्ण असो.

६,७. युद्धाविषयीं आणि अपत्यप्राप्तीविषयीं स्तुतिगायक व भाविक पुरुषांची जशी मनकामना पूर्ण होते; आणि अतिशय सोमपिणारें इंद्राचें पोट समुद्राप्रमाणें जसें भरतें, आणि पाण्याच्या आशयासारिखें जसें इंद्राचें तोंड सोमानें भरलेलें दिसतें,

८. तशीच त्याची विपुल, व गोसंपन्न मोठी देणगी उपासकाला पक्क फळांनीं भरलेल्या वृक्षशाखेप्रमाणें होत असते; [ आणि ]

९. तसेंच, हे इंद्रा, तुझे विपुल प्रसाद मजसारख्या उपासकासाठीं तत्काळ सिद्ध असतात; [आणि]

१०. तसेंच इंद्रास आवडणारें स्तोत्र आणि चरित्र हीं गावीं, कीं जेणेंकरून इंद्र येऊन सोम पिईल. ( १. ३. ८ )

## मरुत्.

मरुत् हे वादळांचे देव होते. यांची भक्ति इंद्रासहित वारंवार करीत असत, व त्यांच्या प्रीत्यर्थ पुष्कळ स्तोत्रें रचिलेलीं आहेतः—

१. महाप्रतापी, महाबलिष्ट, महान्, अप्रतिहत, संघात्मक, सोमपी, अतिशयेंकरून प्रियकर, अतिशयेंकरून शौर्ययुक्त, असे जे मरुत् ते कितीएक किरणांप्रमाणें आपल्या नक्षत्रसदृश आभरणांनीं आविर्भूत होत आहेत.

२. हे मरुतांनो, जेव्हां तुम्ही आकाशांतील प्रदेशांत पक्ष्यांप्रमाणें कोणत्याही मार्गानें जायाला तुमचा रथ सिद्ध करितां तेव्हां तुमच्या रथांवर मेघ गळतात. तुह्मी तुमच्या उपासकांकरितां मधूसारखें उदक ओतीत असता.

३. हे जेव्हां आपले रथ जोडितात आणि शोभतात तेव्हां यांच्या धांवण्याला आणि गमनाला भिऊन पृथिवी दीनासारखी थरथर कांपत असते. ते खेळाडू, चंचल, लकलकीत भाले धारण करणारे, आणि कंपाविणारे मरुत् आपलें मोठेंपण आपणच जणूं स्तवीत असतात.

४. कारण कीं, जो स्वगतिमान् होय, आणि पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी हेच ज्याचे घोडे होत, जो नित्य तरुण, असा जो प्रभु मरुद्गण तो या स्तुतीच्या योगेंकरून सकळ बळांनीं वेष्टित झाला आहे. हे मरुद्गणा, तूं सत्य होस. तूं ऋणनाशक, आणि अनिंद्य आहेस, तर तूं गण आमच्या कर्माचा प्रबळ संरक्षिता हो.

५. आह्मी आमच्या पुराणपित्यापासून जन्म पावून बोलतों कीं, सोमाला पाहून मरुतांची जिव्हा पुढें सरसावते; आणि जेव्हां मरुत् वृत्रवधाच्या कामीं स्तुति करीत करीत इंद्राला जाऊन मिळाले, तेव्हांपासूनच ते पूज्यत्व धारण करिते झाले.

६. मरुत् तेजांप्रत पावले आणि शोभले. ते किरणांप्रत पावले. त्या उत्तमाभरणालंकृत मरुतांला स्तोते प्राप्त झाले. ते कुठार धारण करणारे, गतिमान, निर्भय असे जे मरुत् ते प्रिय मारुतपदाप्रत पावले. ( १. १४. ८७. )

# पर्जन्य.

पावसाच्या देवाविषयीं तीन सूक्तें आहेत. वेदोत्तर कालांत इंद्राला पर्जन्य ह्मटलें आहे.

१. ह्या गाण्यांनीं समर्थ देवाचा धांवा करा. पर्जन्याची स्तुति करा; आदरानें त्याला भजा. कारण हा गर्जणारा वृषभ, बिंदु पाडणारा, वनस्पतींस बीजफल देतो.

२. तो उभा चिरतो, तो राक्षसांचा वध करितो, त्याच्या पराक्रमी शस्त्राखालीं सर्व पृथ्वी थरथर कांपते. जेव्हां पर्जन्य दुकर्म्यांस हाकून पाडतो तेव्हां ह्या पराक्रमीच्या पुढून निर्दोषी देखील पळून जातात.

३. जसा रथ हाकणारा आपल्या घोड्यांस चाबकानें मारितो, तसा तो आपले पर्जन्याचे दूत पुढें करितो. जेव्हां पर्जन्य आकाशाला पावसानें भरून टाकतो तेव्हां सिंहाच्या गर्जना दुरून उठतात.

४. वारे वाहूं लागतात, विजा उडूं लागतात, झाडें उगवतात, आकाश वर्षाव करितें. जेव्हां पर्जन्य आपल्या बीजाकडून पृथ्वीला आशीर्वाद देतो तेव्हां सर्व जगासाठीं अन्न उत्पन्न होतें.

५. हे पर्जन्या, ज्या तुझ्या कामानें पृथ्वी नमती, ज्या तुझ्या कामानें खुराचीं जनावरें पांगतात, ज्या तुझ्या कामानें वनस्पति नानारूप धारण करितात, तो तूं आमचें रक्षण कर.

६. हे मरुतहो, आम्हास आकाशाचा पाऊस द्या, बळकट घोड्याचे प्रवाह खालीं वाहायास लावा. आणि आपल्या गर्जनेसहित, वृष्टि करीत खालीं ये, कारण (हे पर्जन्या,) तूं जीवंत देव आहेस, तूं आमचा पिता आहेस.

७. तूं गर्जना व गडगडाट कर, आणि सफलता दे.

८. मोठी मोट वर ओढ, आणि ती खालीं ओत; धारा भळभळ वाहोत! आकाश आणि पृथ्वी यांस चिकणाईनें चिंब भिजवून टाक. आणि गायींकरितां चांगली वृष्टि होऊं दे.

९. हे पर्जन्या तूं गर्जना व गडगडाट करीत असतां तूं दुष्कर्मांस ठार मारितोस, तेव्हां जें कांहीं पृथ्वीवर जीवंत आहे तें सर्व आनंद करितें.

१०. तूं पाऊस पाठविला आहेस, आतां थांब! तूं रुक्ष अरण्य सुगम केलें आहेस, तूं अन्नाकरितां रोपडे वाढत असे केले आहेत, आणि तूं मनुष्यांपासून स्तुति प्राप्त करून घेतली आहेस. (५. ८३).

## सूर्य.

हा वैदिक देवांपैकीं एक प्रमुख देव आहे: पुढील स्तोत्र त्याविषयीं आहे.

१. देवांचें सुंदर मुख, आणि मित्राचें, वरुणाचें, आणि अग्नीचें चक्षु, आणि जंगमाचा व स्थावरांचा जीव असा जो सूर्य तो हा पाहा उगवला आहे, आणि द्युलोक, पृथ्वी आणि अंतरिक्ष यांस तेजानें भरून टाकीत आहे.

२. तरुण स्त्रीच्या मागून पुरुष जातो तसा हा सूर्य तेजस्वी उषा देवीच्या मागून चालत आहे; ज्या वेळीं भजक लोक आपलीं कर्में करितात, कीं जेणेंकरून सुखकारक सूर्याला सुख होईल.

३. कल्याणकारक, पिंगट, सुंदर, चित्रविचित्र आणि वाखाणण्यास योग्य असे सूर्याचे घोडे सूर्याची स्तुति करीत करीत आकाशाच्या पाठीवर चढत असतात आणि एका दिवसांत द्युलोक आणि पृथ्वी यांच्या सभोंवताली प्रदक्षिणा करितात.

४. सूर्याचें देवत्व इतक्यावरून दिसून येतें आणि त्याचें माहात्म्य इतक्यावरून दिसून येतें कीं, आमच्या कानाच्या मधूनच तो आपलें किरणजाल काढून घेतो, रथापासून तो आपले पिंगट घोडे जेव्हां सोडून घेतो तेव्हांच रात्र एकदम सकळ विश्वावर पडदा टाकिते.

५. तर मित्र आणि वरुण यांचें दर्शन लोकांस व्हावें ह्मणून सूर्य द्युलोकाच्या मध्यभागीं आपलें रूप प्रगट करितो. त्याचे पिंगट घोडे, त्याचें एक तेजस्वी अनंतरूप दिवसा आणि दुसरें काळें रूप रात्रीं पसरितात.

६. हे देव हो, आज सूर्योदयसमयीं तुह्मी आह्मास संकटापासून आणि दोषापासून मुक्त करा. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथ्वी आणि द्युलोक आह्मांस देवोत (१. १६. ११५.).

## उषा.

पहाटेला उषा देवी ह्मणत. ही आकाशाची कन्या व आदित्याची बहीण होती.

१. हे उषे, हे अन्नाने, अन्नसंपन्ने, हे धनवती, प्रज्ञानयुक्त अशी बी तूं त्याचें स्तोत्र सेवन कर. हे सर्वप्रिय देवी, सदा तरुण आणि बहुस्तुति- अशी जी पुरातन तूं ती कर्माच्या मागून जातेस.

२. हे देवी उषे, सुवर्णरथवती, आणि मधुर वाणीतें प्रेरणारी अशी मरणर-

हित जी तूं ती प्रकाश. जे महाबळवान होत ते तुझे आज्ञाधारक अश्व तुज हिरण्यवर्णेला येथें आणोत.

३. हे उषे, अमरत्वाचा झेंडा अशी जी तूं ती सकळ भुवनांच्या तोंडासमोर येऊन उंच उभी राहतेस. हे नित्यनूतन उषे, नित्य एकच स्थानाप्रत जाणारी अशी जी तूं ती चक्राप्रमाणें फिर.

४. अंधकाररूप पडद्याला काढून टाकीत टाकीत जी सूर्याची पत्नी धनसंपन्न, सौभाग्यवती, आणि सुचरित उषा प्रकाशाला प्रगट करीत करीत जाते, ती द्यूच्या सीमेपर्यंत आणि पृथिवीच्या सीमेपर्यंत पसरते.

५. हे स्तोतिजन हो, तुह्मांसंमुख प्रकाशणारी जी देदीप्यमान उषा, तिजप्रत नमस्कारासहित चांगलें स्तोत्र अर्पण करा. माधुर्य देणारी उषा आपलें तेज उंच फेकीत आहे. तेजस्वी आणि रमणीयस्वरूप उषा लखलखीत प्रकाशली आहे.

६. सत्यवती उषा द्युलोकाच्या तेजासहित जागी झाली आहे. धनसंपन्न उषा द्यावापृथिवीवर सुंदर रीतीनें आरूढ झाली आहे. हे अग्नि, तेजस्वी उषा येऊं लागली म्हणजे तूं तिजपाशीं अभिलाषणीय धन याचीत जात असतोस.

७. सत्यमय दिवसाच्या आरंभीं उषेला प्रेरणारा वीर आदित्य, विशाळ ज्या द्यावापृथिवी त्यांत प्रवेश करितो. मित्राची आणि वरुणाची महामाया सुवर्णवर्ण उषेप्रमाणें सर्वत्र प्रकाशाला पसरिते.

## अश्विदेव.

**अश्वि देवांविषयीं अनेक स्तोत्रें आहेत. त्यांपैकीं उदाहरणार्थ खालीं एकाचा उतारा घेतला आहे:—**

१. धेनु, सनातन जो त्यानें वांछिलेल्या वस्तूचा पान्हा सोडणारी होय. उषेचा पुत्र आंत फिरतो. शुभ्ररथ उषा प्रकाशाला आणिते. उषेचें स्तोत्र अश्वींला जागृत करितें.

२. हे अश्वीहो, चांगले जोडलेले अश्व सत्यरूप रथांत तुह्माला आणितात. पित्याप्रमाणें तुह्मास अनुलक्षून यज्ञ सिद्ध होतात. आमची स्तुति निष्फल न करितां कृपणाची स्तुति निष्फल करा. आह्मी तुम्हांकरितां हविरन्न सिद्ध केलें आहे. तुह्मी इकडे या.

३. चांगल्या जोडलेल्या घोड्यांनीं चांगल्या चाकांच्या रथानें महापराक्रम-कारी तुह्मी येऊन ग्राव्यांचा हा ध्वनि ऐका. कारण कीं हे अश्वी हो, तुह्मी संकटाला उत्तम रीतीनें पावणारे आहां असें पुरातन विद्वान कां ह्मणतात ?

४. तुह्मी लक्ष द्याल काय? आणि घोड्यांनीं याल काय? तुम्हां अश्वींला सकळ जन बोलावितात. कारण उषेच्या पूर्वी गोरसमिश्रित हे सोमरस तुह्मांला हे ऋत्विज मित्रांप्रमाणें अर्पण करीत आहेत.

५. हे अश्वी हो, देवांनीं संचार करण्याच्या मार्गांनीं अनेक लोक ओलांडून तुह्मी एथें या. हे धनसंपन्न अश्वीहो, जनामध्यें तुह्मांकरितां स्तोत्र ह्मटलें जातें. हे महापराक्रमकारी अश्वीहो, हीं मधुर सोमरसाचीं पात्रें तुह्मास अर्पण केलीं आहेत.

६. तुमचा पुरातन अनुग्रह आणि सख्य कल्याणकारक होय. हे शूर हो, तुमची संपत्ति जन्हु कुळांत आहे. आतां कल्याणकारक मैत्री पुनः ताजी करून परस्पर मित्र होत्साते आपण एकत्र सोमरसानें हर्ष पावूं ( ३. ५८. १-६ ).

## सोमदेव.

ऋग्वेदांत बहुतकरून एक सगळें मंडळ सोमाविषयींच्या सूक्तांनीं भरलें आहे, त्याशिवाय बहुतकरून सर्व सूक्तांत त्याचा उल्लेख आहे. पुढील सूक्त फार लांब आहे, त्यांतून कांहीं ऋचा उदाहरणार्थ घेतल्या आहेत

१. हे सोमा, तूं आपल्या दिव्य प्रज्ञेनें सर्व जाणतोस. तूं अत्यंत सरळ मार्गानें वर्त्तवितोस. हे इंदू, तुझ्याच प्रसादेंकरून आमचे बुद्धिमंत वाडवडील देवांबरोबर उत्तम सुखाप्रत पावले.

२. हे सोमा, तूं सकल प्रज्ञांच्या योगेंकरून सुप्रज्ञ होस. तूं सकल बलांनीं महाबळ आणि सर्वज्ञ होस. तूं सकल वीर्यांच्या योगेंकरून आणि मोठेपणाच्या योगेंकरून महावीर होस. मनुष्यांवर कृपादृष्टि करणारा जो तूं तो वैभवांनीं महविभवी झाला आहेस.

५. हे सोमा, तूं सज्जनांचा पाळक होस, तूं राजा आणि शत्रुघातक होस. तूं उत्तम वीर होस.

६. हे सोमा, आह्मी जगावें असें तूं इच्छिशील, तर आह्मी मरणार नाहीं. तूं स्तोत्रलुब्ध वनस्पति होस.

१२. हे सोमा, तूं आह्माला गृहवर्धक, रोगनाशक, धनदायक, प्रकर्षवर्धक आणि सुमित्र असा हो.

१५. हे सोमा, तूं आह्माला शापापासून रक्ष, पापापासून रक्ष, आमचा सुखकारक सखा हो.

१७. हे परमप्रमादकारी सोमा तूं सकळ वल्लीच्या योगेंकरून प्रवृद्ध हो. परमसंपत्तियुक्त मित्र जो तूं तो आमचा उत्कर्ष कर.

२०. सोमाला जो कोण भजतो त्याजप्रत तो धेनु देतो. त्याला सोम चपळ घोडे देतो. त्याला सोम पराक्रमी पुत्र देतो, – कीं जो पुत्र संसारिक, यज्ञकुशल, सभ्य आणि पित्याची कीर्ति वाढविणारा होतो.

२१. हे सोमा, युद्धांत अजिंक्य, संग्रामांत पार पाडणारा, स्वर्गाची प्राप्ति करून देणारा, उदकें देणारा, बळाचें रक्षण करणारा, यज्ञांत जन्मलेला, सुस्थळीं राहणारा, सुकीर्तिमान, आणि विजयी असा जो तूं त्या तुला पाहून आह्मी आनंद पावूं असें होवो.

२२. हे सोमा, तूं ह्या सकळ वनस्पति उत्पन्न केल्या आहेस. तूं उदकें आणि तूं गाई उत्पन्न केल्या आहेस. तूं हें विस्तीर्ण अंतरिक्ष पसरिलें आहेस, तूं प्रकाशाच्या योगानें हा अंधकार नाहींसा केला आहेस.

२३. हे देवा सोमा, हे बलाढ्या, तूं दिव्य मनानें युद्ध करून आह्माला संपत्तीचा भाग मिळवून दे. तुझा कोणीही पाडाव न करो. तूं शौर्याचा प्रभु होस. तूं युद्धांत उभयतांला उपाय सांगत जा. (१. १४. ९१.)

[ह्या सूक्तावर वेदार्थयत्नकर्त्यांची येणेंप्रमाणें टीप आहेः—"एकदां कोणत्याहि पदार्थाला देव असें ह्मटलें ह्मणजे देवांनीं करायाचीं सर्व कार्यें तो करितो असें समजून त्याचें वर्णन करणें साहजिक आहे. सोम देवाला वनस्पतींचा राजा किंवा उत्पादक असें ह्मटलें तर योग्यच होय; कारण कीं वनस्पति कुटून पिळून सोमरस निर्माण करीत असत. पण सोमरूप देवतेच्या हातून अंतरिक्ष निर्माण कसें होईल, आणि प्रकाशाचा प्रादुर्भाव होऊन अंधकाराचा नाश कसा होईल हें सोमरसाच्या गुणावरून समजावयाचें नाहीं." मंत्र २३ यावरील टीप —"या मंत्रांत जी प्रार्थना केली आहे तिचें तात्पर्य 'युद्धांत आमचें सहाय कर' इतकें आहे. प्राचीन आर्य युद्धपरायण असत त्यामुळें त्यांची प्रार्थना युद्धांत आपणास जय होवो अशी बहुतकरून नेहमीं असे."]

## अनेकजातीय स्तोत्रें.

कित्येक स्तोत्रांत अनेक देवांची एकत्र स्तुति केली आहे.—

१. हे इन्द्रावरुण हो, हीं तुमचीं भ्रमण करणारीं गर्वी आयुधें तुमच्या उपासकाच्या आंगावर मारिलीं न जावोत. हे इन्द्रावरुण हो, ज्या यशानें तुह्मी तुमच्या मित्रांला अन्न आणीत असतां, तें तुमचें यश कोठें आहे?

४. हे बृहस्पति, सकळ देवांसहित तूं आमचीं हव्यें सेव.

९. जो सकल भूतांला पृथक् पाहतो आणि एकत्रही पाहतो तो पूषा आमचा रक्षक होवो.

१०. जो सविता आमच्या बुद्धीला प्रेरूं शकतो त्या देदीप्यमान सवित्याचें श्रेष्ठ तेज आह्मी ध्यातों.

१४. सोम आह्मांला आणि दोन पायांच्या पशूंला आणि चार पायांच्या पशूंला रोगरहित अन्नें प्राप्त करून देवो.

१६. हे मित्रावरुणहो, तुह्मी आमचा गोठा घृतांनीं भिजवा; हे सच्चरित मित्रावरुण हो, तुह्मी आमच्या स्थानाला मधुर रसांनीं भिजवा. ( ३. ६२. )

**पुढील सूक्तांत एक ईश्वराविषयीं आहे असें मोक्ष मूलर यांचें मत आहे.**

१. प्रारंभीं हिरण्यगर्भ ( सुवर्णाचें बीज ) उत्पन्न झाला. ह्या विश्वाचा तो जन्मापासून स्वामी होता. त्यानें पृथ्वी व आकाश यांची स्थापना केली. तो देव कोण आहे ? त्यास आपण बलिदानें अर्पण करूं ?

२. जो श्वास देतो, जो सामर्थ्य देतो, ज्याची आज्ञा सर्व तेजस्वी देव सन्मानपूर्वक मानितात, ज्याची छाया अमृतत्व आहे, ज्याची छाया मृत्यु आहे – तो देव कोणता आहे, त्यास आपण बलिदानें अर्पण करूं ?

जो आपल्या सामर्थ्याच्या योगानें या श्वासोच्छ्वास करणाऱ्या व निद्रावश विश्वाचा एकटा राजा होऊन राहिला; जो मनुष्य, पश्वादि सर्वांचा शास्ता होय असा देव कोणचा, त्यास आपण आपलीं बलिदानें अर्पण करूं ?

ज्याच्या शक्तीनें हे हिमपर्वत स्थित आहेत, व समुद्र ज्याची शक्ति प्रगट करितो; दूरच्या नद्या रसांसहित; ज्याचे हे प्रदेश दोन बाहु आहेत; असा देव कोण आहे ? त्यास आपण बलिदानें अर्पण करूं.

ज्याच्यामुळें आकाश प्रकाशित आहे व पृथ्वी सदृढ आहे, ज्यानें हें आकाश, परमउंच आकाशही स्थापिलें आहे; आकाशांतील विस्ताराचेंही माप केलें तो देव कोण आहे? त्यास आपण आपलीं बलिदानें अर्पण करूं. आकाश व पृथ्वी हीं त्याच्या इच्छेनुरूप उभीं राहून आपल्या ठिकाणीं भयकंपित होत्सातीं ज्याचें अवलोकन करितात; ज्याच्या योगानें उगवणारा सूर्य प्रकाशमान होत्साता वर निघतो तो देव कोणता आहे? त्यास आपण बलिदानें अर्पण करूं.

ज्या काळीं बीज धारण करणारे व अग्नीस उत्पन्न करणारे जलप्रवाह चोहों दिशांकडे वाहत गेले त्या काळीं त्यांतून जो उत्पन्न झाला व जो एकटा देवांचा प्राण आहे:-तो देव कोणता आहे? त्यास आपण आपलीं बलिदानें अर्पण करूं.

ज्यानें आपल्या शक्तीनें जलप्रवाहांत शक्ति निर्माण केली व ज्यानें यज्ञकुंडांतील अग्नि चेतविला, जो सर्वदेवांचा अग्नि देव आहे—तो कोणता ?

त्यास आपण आपलीं बलिदानें आर्पण करूं. तो आमचा नाश न करो! जो पृथ्वीचा उत्पन्नकर्त्ता; अथवा ज्यानें आकाश उत्पन्न केलें तो सत्यधर्मी; ज्यानें तेजस्वी व पराक्रमी जलें उत्पन्न केलीं.— ( ऋग्वे. १०.१२१.)

ऋग्वेदाच्या दाहाव्या मंडलांतील १२९ व्या सूक्तांत सृष्ट्युत्पत्तीच्या गुजाचें वर्णन करण्याचा यत्न केला आहे:—

१. भाव नव्हता व अभावही नव्हता; व्योम ( अंतरिक्ष ) नव्हतें व वर आकाश नव्हतें. सर्व कशानें वेष्टित होतें? कोठें व कशाच्या पोटांत तें होतें? तें गंभीर अतल जल होतें काय?

२. तेव्हां मृत्यु नव्हता; अथवा अमरत्वही नव्हतें. दिवस व रात्र यांचा भेद नव्हता, तें एकात्मक मात्र स्थिरतेनें, स्वाधारानें श्वासोच्छ्वास करीत होतें. त्याजपासून किंवा त्याच्यावर असें कांहीं भिन्न नव्हतें.

३. आरंभीं अंधारानें वेष्टित अंधकार होता. हें सर्व अलक्ष्य जल होतें. तें जें एक शून्य व अभाव परिवेष्टित होतें तें उष्णतेच्या बलानें प्रगट झालें.

४. त्याच्या ठायीं प्रथम काम ( इच्छा ) उत्पन्न झाला, तो मनाचें आदिबीज होता; तें ऋषींनें आपल्या बुद्धीनें शोधून पाहिल्यावर आपल्या अंतःकरणांत असें जाणिलें कीं, भाव व अभाव यांस जोडणारें बंधन तेंच आहे.

५. ह्या भुवनांच्या वरून जें किरण (किंवा दोरी) ताणलेलें आहे तें खालीं होतें किंवा वर होतें? तेथें गर्भोत्पादक वीर्यें व महाशक्ति होत्या, खालीं आधारभूत सत्त्व होतें, आणि वर शक्ति होती.

६. ही सृष्टि कोठून, कोणीकडून निघाली हें कोण जाणतो? अथवा एथें कोणाच्यानें सांगवेल? ही सृष्टि प्रकट झाल्यानंतर देव झाले, यास्तव ती कोठून झाली हें कोण जाणतो?

७. ही सृष्टि कशापासून झाली, आणि कोणी ही केली किंवा नाहीं, – जो परम आकाशांत तिचा शास्ता आहे तो खरोखर जाणतो, अथवा तोही जाणत नाहीं. । इयं विसृष्टिर्यत आबभूव यदि वा दधे यदि वा न । यो अस्याध्यक्ष परमे व्योमनत्सो अंग वेदयादि वा न वेद ॥

ब्रह्मणस्पति किंवा बृहस्पति याला एका सूक्तांत देवांचा बाप (देवानां पितरं) ह्मटलें आहे, व त्यानें लोहाराप्रमाणें देवांचें जन्म फुंकून काढिले:—

१. आपण गीत गाऊन व स्तुति करून देवांचें जन्म वर्णूंया. ह्या अलीकडील युगांत आम्हांतून कोणीही तें पाहावें.

२. ब्रह्मणस्पतीनें लोहाराप्रमाणें हें जन्म फुंकून काढलें. देवांच्या पूर्व युगांत असत् यापासून सत् उत्पन्न झालें.

३. देवांच्या प्रथम युगांत सतापासून असत् झालें. त्यानंतर दिशा उत्पन्न झाल्या, त्यानंतर उत्तानपदापासून [ झाल्या ].

४. उत्तानपदापासून भूमि उत्पन्न झाली, भूमीपासून दिशा; दक्षापासून अदिति आणि अदितीपासून दक्ष.

५. अदितीपासून हे दक्षा, तुझी जी कन्या ती उत्पन्न झाली. तिच्या मागून देव जन्मले, [जे] अमृत्वाचे सुखविभागी.

६. देवहो, जेव्हां तुह्मी ह्या जलांवर चलित झालां, क्षोभ पावलां, तेव्हां नाचणाऱ्यांच्या [ पायां ] पासून जशी धूळ उडते तशी तुमच्यापासून उडाली.

७. देवहो, तुह्मी जेव्हां प्रयत्नवान मनुष्यांप्रमाणें पृथ्वी पुनः भरलीत तेव्हां समुद्रांत लपालेला सूर्य तुह्मी बाहेर काढिलात.

८. अदितीला जे तिच्या शरीरापासून झालेले आठ पुत्र, त्यांतून सातांसहित ती देवांपाशीं गेली, आणि ( आठवा ) मार्तंड यास तिनें बाहेर टाकिलें.

९. अदिती सात पुत्रांसहित ( देवांच्या ) पूर्वयुगापाशीं गेली; तिनें पुनः मार्तंड जन्मासाठीं व मरणासाठीं उत्पन्न केला. ( ऋग्वे. १०.७२ )

ह्या सृष्ट्युत्पत्तीच्या कामांत अदितीनें जो कार्यभाग घेतला तो बरोबर समजत नाहीं. दक्षापासून अदिति व अदितीपासून दक्ष कसा उत्पन्न झाला?

ऋग्वेदांत पुरुषसूक्त नामक एक नूतन व प्रसिद्ध सूक्त आहे. त्याविषयीं सर मानियर उलियमस् असें ह्मणतात कीं, हिंदु एकदेव (एकेश्वरी ) मत हळूहळू सर्वदेव ( अद्वैत ) मताकडे कसें वळत गेलें हें ह्या सूक्तावरून चांगलें दिसतें. ऋग्वेदांतील सगळ्या सूक्तांमध्यें केवळ ह्याच सूक्तांत ज्या जातीनें शेकडों वर्षांपासून हिंदुस्थानास आपल्या गुलामगिरींत ठेविलें आहे तिच्या उत्पत्तीची सूचना आहे :—

१. पुरुषास हजार मस्तकें, हजार नेत्र व हजार पाय आहेत. चोहोंकडून भूमीनें वेष्टित असतां तो ती दशांगुलांच्या प्रदेशांत उल्लघून गेला.

२. पुरुष हाच सकल विश्व आहे. जें कांहीं होऊन गेलें, आणि जें कांहीं होणार ( तें तो आहे ) तो अमृत्वाचाही प्रभु आहे, कारण तो अन्नाच्या योगानें पसरतो.

३. असें त्याचें थोरपण आहे, आणि पुरुष ह्यापेक्षां श्रेष्ठ आहे. सर्व

भूतवस्तु ( ज्या वस्तु आहेत त्या ) त्याचा चतुर्थांश आहेत. आणि ह्याचे तीन चतुर्थांश स्वर्गांत जे अमर आहे ते आहेत.

४. तीन चतुर्थांशानीं पुरुष वर चढला, तेथें त्याचा एक चतुर्थांश पुनः उत्पन्न झाला. नंतर जें कांहीं भक्षण करीत ते व जे भक्षण करीत नाहींत त्या सर्व वस्तु त्यानें व्यापिल्या.

५. त्यापासून विराज जन्मला, आणि विराजापासून पुरुष जन्मल्यावर तो पृथ्वीच्या मागें व पुढें पसरला.

६. जेव्हां देवांनीं पुरुषाचा बलि देऊन यज्ञ केला तेव्हां वसंत त्याचें घृत होतें, ग्रीष्म त्याचें इंधन (सर्पण), शरद् त्याचा ( आनुषंगिक—सोबती असणारा ) हवि होतें.

७. हा यज्ञ (बलि) पुरुष प्रारंभीं जन्मला, त्याचें त्यांनीं यज्ञाच्या गवतावर बलिदान केलें.

८. त्या सर्वाहुती (यज्ञा) पासून दहीं व तूप हीं उत्पन्न झालीं. त्यापासून आकाशगामी प्राणी (पक्षी) व ग्राम्यपशु व वनपशु उत्पन्न झाले.

९. त्या सर्वाहुतीपासून ऋक् आणि साम ऋचा उत्पन्न झाल्या; छंद आणि यजुस् (उत्पन्न झाले).

१०. त्यापासून घोडे व दोन दंतपंक्तीचीं जनावरें झालीं; गायी त्यापासून झाल्या. त्यापासून बकरे व मेंढरें (झालीं).

११. जेव्हां देवांनीं पुरुषाचे भाग केले तेव्हां त्यांनीं त्याचीं किती खंडें केलीं? त्याचें मुख काय होतें? त्याचे बाहु काय होते? त्याच्या मांड्या व पाय कोणत्या दोन वस्तु होत्या?

१२. ब्राह्मण त्याचें मुख होतें. राजन्य त्याचे बाहु झाला. ज्याला वैश्य ह्मणतात तो त्याच्या मांड्या झाला. त्याच्या पायांपासून शूद्र निघाला.

१३. त्याच्या मनापासून चंद्र झाला. त्याच्या नेत्रांपासून सूर्य; इंद्र व अग्नि हे त्याच्या मुखापासून झाले, आणि त्याच्या श्वासापासून वायु झाला.

१४. त्याच्या नाभीपासून अंतरिक्ष, त्याच्या मस्तकापासून आकाश, त्याच्या पायांपासून पृथ्वी, त्याच्या कर्णांपासून चार दिशा; ह्या रीतीनें देवांनीं लोक (भुवनें) उत्पन्न केले.

१५. जेव्हां देवांनीं यज्ञ करितांना पुरुषाला पशु (बलि) असा बांधिला, तेव्हां अग्नीच्या भोंवतीं सात समिधा (काठ्या) रोविल्या, आणि तीन पट सात लांकडाचे तुकडे केले.

१६. यज्ञेंकरून देवांनीं यज्ञ केला. ह्या प्रथम धर्मक्रिया होत्या. ह्या महाशक्ति जेथें पूर्वीचे साद्य ( देव ) आहेत त्या स्वर्गाप्रत पावल्या आहेत.*

ऋग्वेदांतील सूक्तांत पापक्षमेच्या प्रार्थना फारच थोड्या आहेत; त्यांचा मासला:—

१. हे वरुणा, मला इतक्यांत मातीच्या घरांत जाऊं देऊं नको; हे समर्था, दया कर, दया कर!

२. वाऱ्यानें लोटलेल्या मेघाप्रमाणें मी जर कांपत जात आहें; मजवर दया कर, मजवर दया कर!

३. हे बलवान व तेजस्वी देवा, शक्ति नसल्यामुळें मी वांकड्या वाटेनें गेलों; हे समर्था, दया कर, दया कर!

४. उपासक पाण्यामध्यें जरी उभा होता तरी त्याला तहान लागली; हे समर्था, दया कर, दया कर!

५. हे वरुणा, जेव्हां ह्या मानवांकडून दिव्य समुदायांपुढें ( विरुद्ध ) अपराध होतो; जेव्हां आमच्या हातून अविचारानें धर्मभंग होतो, तेव्हां त्या अपराधाबद्दल हे देवा, आह्माला शिक्षा करूं नको ( ७. ८९. )

मंडळ ७, सूक्त ८६:—

१. ज्यानें विस्तीर्ण आकाशमंडलें ( आकाश व पृथ्वी ) उभीं चिरलीं, त्याचीं कृत्यें सज्ञानाचीं व सामर्थ्याचीं आहेत. त्यानें उंच व दिव्य आकाश वर उचललें; त्यानें नक्षत्रमंडल आणि भूमि हीं वेगळालीं विस्तारिलीं.

२. हें मी आपणाशींच बोलतों काय? मी वरुणाप्रत कसा जाईन? तो रागावल्यावांचून माझीं अर्पणें मान्य करील काय? मी त्याला शांत मनानें प्रसन्न झालेला केव्हां पाहीन?

३. हे वरुणा, माझें पाप जाणण्याची इच्छा धरून मी हें विचारितों. मी ज्ञान्यांस विचारायास जातों. ज्ञानी मला हेंच सांगतात. तुजवर वरुण रागावला आहे.

४. जो तुझा मित्र सर्वदां तुझी स्तुति करितो, त्याचा हे वरुणा, एखाद्या जुन्या पापामुळें तूं नाश करूं इच्छितोस काय? हे अजिंक्य प्रभो, मला सांग, ह्मणजे मी पापमुक्त होऊन स्तुतिसहित तुला नमन करीन.

५. आमच्या पितरांच्या पापांपासून आह्मांस मुक्त कर. आणि जीं पापें

[* यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन्। ते हि नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ]

आह्मी आमच्या शरीरांनीं केलीं त्यांच्या दोषांपासून आह्मास मुक्त कर. हे राजा, चोर जसा चोरलेला बैल खाऊन धणंगतो त्याप्रमाणें जो वशिष्ठ त्याला मुक्त कर. जसें वासराला दांव्यापासून सोडतात तसें त्याला सोड.

६. हे वरुणा, हें आमचें कृत्य नव्हतें; तें अगत्य–गरज ( किंवा मोह ), सुरा (दारू ) राग, फांसें, अविचार ( यांचें काम होतें ). तरुणास वांकड्या वाटेनें नेण्यास वृद्ध तेथें आहे; निद्रा देखील अधर्म आणिते.

७. जसा दास आपल्या उदार धन्याचें समाधान करितो त्याप्रमाणें मला क्रोधायमान झालेल्या देवाचें पापविरहित समाधान करूंद्या.

८. हे प्रभो वरुणा, हें स्तोत्र तुझ्या मनाला चांगलें लागो; आह्माला ( संपत्ति ) रक्षण करण्यांत व मिळविण्यांत यश येवो! देवहो, आपल्या आशीर्वादांनीं आमचें सर्वदां रक्षण करा !

## ब्राह्मणें.

ब्राह्मणग्रंथांत यज्ञसंबंधानें मोठमोठे वाद आहेत, व त्यांचा मुख्य हेतु ह्मटला ह्मणजे यज्ञाचें वर्णन व यज्ञाची व्यवस्था होय, हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. हे ग्रंथ वेदमंत्रांप्रमाणेंच श्रुति मानिले आहेत.

ब्राह्मणांची योग्यता मोक्ष मूलर यांनीं येणेंप्रमाणें वर्णिली आहे:—

“हिंदु लोकांच्या मानसिक इतिहासाचें एक मोठें मनोरंजक रूप ब्राह्मणांमध्यें दिसून येतें यांत संशय नाहीं. परंतु ते विद्याविषयक ग्रंथ मानून त्यांची परीक्षा केली असतां मोठी निराशा होते. इतक्या प्राचीन काळांत व जनसमाजाच्या आद्यस्थितींत पोकळ पांडित्य व निवळ असमंजसपणा यांत दुसरा कोणताही ग्रंथ त्यांची बरोबरी करूं शकणार नाहीं. असे ग्रंथ उत्पन्न होतील असें कोणास वाटलें नसतें. या ग्रंथसमूहांत आश्चर्य वाटण्याजोग्या कल्पना, ठळक उक्ति, सयुक्तिक तर्कप्रबंध, व विलक्षण दंतकथा यांची न्यूनता आहे असें नाहीं; परंतु हीं मस्तक व हस्तपादहीन मूर्तींच्या धडाच्या शकलांप्रमाणें होत; जसें पितळेच्या किंवा कथलाच्या कोंदणांत मोलवान रत्नें बसवावीं तद्वत् त्यांची रचना आहे. ह्या सर्व ग्रंथांचें साधारण लक्षण असें आहे कीं, त्यांत मोठ्या अरेरावकीच्या थिल्लर गोष्टी, उपाध्यांचा दिमाख, आणि जुन्या काळचें शुष्क पांडित्य हीं आहेत. राष्ट्राच्या लुसलुसीत व निरोगी-

पणाच्या वाढीवर उपाध्याचे डावपेंच व धर्मसंबंधी अत्याचार यांचा तांबारा किती लवकर पडतो हें जाणणें इतिहासकर्त्यांस मोठ्या अगत्याचें आहे. अशा प्रकारच्या धामी राष्ट्रांवर त्यांच्या तारुण्यावस्थेंत व ह्यातारचळांतही येतात, हें जाणण्याचें आह्मास अगत्य आहे. जसा वैद्य एखाद्या खुळ्या मनुष्याची बडबड, व वेड्याचें बरळणें यांचा अभ्यास करितो त्याप्रमाणें ह्या ग्रंथांचा अभ्यास करण्यापुरती त्यांची योग्यता आहे. पण आपण ह्या ग्रंथांचें स्वभाषेंत भाषांतर करण्याचा प्रयत्न करूं लागलों, ह्मणजे मानवी भाषा व मानवी कल्पना यांचा कोणी अशा कामीं उपयोग करावा याचें आपल्यास मोठें आश्चर्य वाटेल."

प्रोफेसर इजलिंग ह्यांनीं शतपथब्राह्मणाचें भाषांतर केलें आहे, त्यांचेंही मत असेंच आहे. ते ह्मणतात कीं, "मी जें भाषांतर करीत आहें, त्याचा स्वीकार साधारण वाचक कसा करितील याविषयीं मला भ्रांति बाळगायाला नको. जगांत जितके विद्याविषयक ग्रंथ आहेत त्या सर्वांत ब्राह्मणें नामक जे हिंदु देवज्ञानाचे ग्रंथ आहेत त्यांविषयीं, त्या ग्रंथांचा विशेष अभ्यास करणारे अशीं थोडकीं मनुष्यें खेरीज करून, दुसरे कोणी अगत्य बाळगणार नाहींत. त्यांत जसे कंटाळवाणे, लांबलचक अर्थवाद (टीका) आहेत, व त्या अर्थवादांत सयुक्तिक विचारांबद्दल जितक्या हटवादाच्या उपपत्ति व असार सांकेतिक लक्षणांच्या पद्धति आहेत तशा कदाचित् दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत क्वचित् अढळतील."

दोन ब्राह्मणांतील उतारे पुढें दिले जातील.

ऋग्वेदाचे ऐतरेय ब्राह्मणांत यज्ञसंबंधी प्रार्थनांचा अर्थ, आणि वैदिक धर्माच्या क्रियांची उत्पत्ति, कृति व अर्थ हे विषय आहेत. पुणें एथील माजी संस्कृत विद्येचे सुप्रिंटेन्डेन्ट डाक्तर हौग यांनीं हें ब्राह्मण मूळ व इंग्लिश भाषांतरासुद्धां छापून प्रसिद्ध केलें आहे. त्यांच्या भाषांतराचा आरंभ येणेंप्रमाणें आहे:—

"देवांमध्यें अग्नीला सर्वांहून नीचस्थान आहे, विष्णूला सर्वांहून उच्चस्थान आहे, त्या उभयतांच्या मध्यें दुसरीं सर्व दैवतें आहेत.

"ते अग्नि-विष्णु यांस दक्षणीय इष्टीचा पुरोडाश (भाताचा पिंड) अर्पितात, आणि त्याचे निरनिराळे भाग अकरा खापराच्या तुकड्यांवर (कपाल)

ठेवितात. हा पिंड ह्या इष्टीच्या कोणत्याही देवतेला न विसरतां सर्वांस खरो-खर अर्पितात. कारण अग्नि हा सर्वदेवता आहे, आणि विष्णु सर्वदेवता आहे. कारण हीं दोन शरीरें अग्नि व विष्णु यज्ञाचीं दोन शेवटें होत. ह्मणून जेव्हां ते अग्नि – विष्णूचे पिंडा ( पुरोडाशा ) च्या वांटण्या करितात तेव्हां ते शेवटास ( यज्ञ समाप्त झाल्यावर ) यज्ञाच्या सर्व देवतांस कृतार्थ करितात. ''

" एथें ते असें ह्मणतातः—ज्यावर पुरोडाशाचे भाग ठेविले आहेत अशीं जर ११ खापरें आहेत, आणि अग्नि व विष्णु ह्या दोनच देवता आहेत, तर दोघांकरितां काय व्यवस्था केली आहे ? अथवा काय विभाग आहेत ?

" ( ह्याचें उत्तर ) आठ विभागांवरील आठ पुरोडाश अग्नीचे आहेत, कारण गायत्रीमंत्रांत आठ अक्षरें आहेत, आणि गायत्री हा अग्नीचा छंद आहे. तीन खापरांवरील पुरोडाश विष्णूचे आहेत, कारण विष्णु ( सूर्य ) सृष्टीवरून तीनदां ढेंगें टाकून गेला. त्यांच्याकरितां करायाची ती हीच व्यवस्था; हाच विभाग.''

" ज्याला पदवी नाहीं असें वाटतें त्यानें ज्यावर घृत ओतलें आहे असा चरु ( शिजविलेला भात ) अर्पिण्याकरितां सिद्ध करावा. कारण जो थोर पदवीचा उपभोग घेत नाहीं, त्याला ह्या जगांत स्थिर आधार नाहीं. चरूवर ओतलेलें घृत स्त्रीचें दूध आहे. कांडलेल्या भाताचें धान्य ( तांदूळ ) पुरुषाचें आहे; दोन्ही मिळून एक युग्म ( जुळें ) आहे. यास्तव चरु हा युग्म ( स्त्री व पुरुष असे भाग ) असल्यामुळें त्याला त्याच्या वेलविस्ताराकरितां त्याला संतति व गुरें देऊन त्याचें कल्याण करितो. ज्याला हें ज्ञान प्राप्त होतें त्याचा वंश व त्याचीं गुरेंढोरें वाढतात.

" जो कोणी दर्शपूर्णमास इष्टी ( अमावास्येच्या व पौर्णिमेच्या यज्ञा ) चीं हव्यें आणितो त्यानें यज्ञास आरंभ केलाच आहे, आणि देवतांच्या यज्ञयुक्त पूजेसही आरंभ केला आहे. दर्शाचा किंवा पौर्णिमेचा बलि आणिल्यावर ह्या बलीच्या ठायीं अर्पण केल्यामुळें, व दर्भ पसरल्यामुळें त्याला प्रतिष्ठापित करावें. ही एक दीक्षा समजावी.

" अग्नीला सर्पणासाठीं काटक्या टाकतेवेळीं होत्यानें १७ ऋचा ह्मणाव्या. कारण प्रजापति सत्रापट आहे, महिने बारा आहेत, आणि हेमंत व ( हिंवाळा ) शिशिर ( हिंवाळा व वसंत यांच्या मधला ऋतु ) एक केल्यानें ऋतु पांच आहेत. वर्ष प्रजापति आहे. ज्याला हें ज्ञान आहे तो ह्या ऋचा ज्या प्रजापतीमध्यें राहतात त्यांकडून सिद्धि पावतो. ''

**वरील उताऱ्याप्रमाणें भाताचे (शिजविलेल्या तांदळांचें) घृतयुक्त अर्पणानें उपासकास लेंकरें व गुरें यांची प्राप्ति होते.**

एका ब्राह्मणांत शंभर अध्याय आहेत ह्मणून त्याला **शतपथ** (शंभर वांटांचें) **ब्राह्मण** ह्मटलें आहे. त्याच्या प्रथम कांडांत दर्शपूर्णमासइष्टी (अमावास्येस व पूर्णिमेस करायाचे यज्ञ) सांगितल्या आहेत.

त्याच्या पहिल्या ११ ऋचांत यज्ञास आरंभ करण्यापूर्वी शुद्ध कसें व्हावें हें सांगितलें आहे. बाकीचा विषय पुढें सांगितल्याप्रमाणें आहे:—

"१२. दुसऱ्या दिवशीं अध्वर्यूस जें प्रातःकाळीं कर्म करायाचें तें हेंच कीं, तो पाण्यावर जातो, आणि पाणी पुढें आणितो. कारण पाणी हें (यज्ञाचें एक साधन) आहे. ह्मणून ह्या प्रथम कर्माकडून तो यज्ञास प्रवृत्त होतो; आणि पाणी पुढें आणिल्यानें तो यज्ञ पसरतो (सिद्ध करितो.)

"१३. तो ह्या गूढ शब्दांनीं बोलून तें पुढें आणितोः—'तुला कोण (किंवा प्रजापति) (ह्या अग्नीला) जोडतो? तो तुला जोडतो. तो (किंवा, प्रजापति) कशाकरितां तुला जोडतो? त्यास ( न. पु. ) (किंवा त्याला) तो तुला जोडतो.' कारण प्रजापति गूढ आहे; प्रजापति यज्ञ आहे. यास्तव तो त्याकडून आपला यज्ञ जो प्रजापति त्याला जोडतो (यज्ञ करायास सिद्ध करितो).

"१४. तो पाणी अशासाठीं पुढें आणितो कीं, हें सकल विश्व पाण्यानें व्यापिलें आहे; यास्तव तो ह्या आपल्या प्रथम कर्मानें हें सर्व विश्व व्यापितो (किंवा मिळवितो).

"१५. आणि ह्या यज्ञांत होत्री किंवा अध्वर्यु, अथवा ब्राह्मण किंवा आग्निध्र, अथवा यज्ञकर्त्ता ह्यांस जें कांहीं साधत नाहीं तें सर्व येणेंकरून प्राप्त होतें.

"१६. तो पाणी पुढें कां आणितो याचें दुसरें एक कारण असें आहे कीं, जेव्हां देव यज्ञ करण्यांत गुंतले होते, तेव्हां असुर व राक्षस यांनीं त्यांस (रक्ष) मना केलें आणि ह्मटलें, 'त्यानें यज्ञ करूं नये!' आणि त्यांनीं मना केलें (रक्ष) ह्मणून त्यांस राक्षस ह्मणतात.

"१७. तेव्हां देवांनीं हें वज्र ह्मणजे पाणी पाहिलें. पाणी वज्र आहे, कारण पाणी खरोखर वज्र आहे ह्मणून तें जेथें कोठें जातें तेथें (जमिनींत) खळगा करितें; आणि ज्या कशाच्या जवळ तें जातें त्यास तें जाळून टाकितें. यास्तव त्यांनीं तें वज्र घेतलें आणि त्याच्या निर्भय व शत्रुहीन आश्रयाखालीं त्यांनीं यज्ञ पसरिला (केला). त्याप्रमाणें तो (अध्वर्यु, उपाध्या) हें वज्र घेतो, आणि त्याच्या निर्भय व शत्रुहीन आश्रयाखालीं तो यज्ञ पसरितो; तो पाणी पुढें कां आणितो त्याचें कारण हेंच.

" १८. त्यानें त्यांतून कांहीं (चंबूंत) ओतल्यावर तो तें गार्ह्यपत्य अग्नीच्या उत्तरेस ठेवितो, कारण पाणी ( आप ) स्त्री आहे, व अग्नि पुरुष आहे, आणि गार्ह्यपत्य घर आहे: यामुळें या घरांत संभोगापासून उत्पत्ति होते. जो कोणी पाणी पुढें आणितो, तो वज्र उचलून घेतो; परंतु जेव्हां तो वज्र घेतो तेव्हां स्थिर उभें राहिल्यावांचून त्याच्यानें तें घेववत नाहीं; नाहीं तर तें त्याचा नाश करितें.

" १९. तो गार्ह्यपत्य अग्नीसमीप तें अशासाठीं ठेवितो कीं, गार्ह्यपत्य घर आहे, आणि घर विश्रांतीचें निर्भयस्थान आहे; असा तो घरांत स्थिर उभा राहतो; आणि यास्तव निर्भय विसाव्याच्या जागीं; याप्रमाणें तें वज्र त्याचा नाश करीत नाहीं, — यास्तव तें तो गार्ह्यपत्य अग्नीसमीप ठेवितो.

" २०. नंतर तो तें आहवनीय अग्नीच्या उत्तरेस नेतो. कारण पाणी स्त्री आहे व अग्नि पुरुष आहे. येणेंकरून मैथुनधर्मक संतति उत्पन्न होते. आणि याच रीतीनें यथाक्रम संभोग घडतो, कारण स्त्री पुरुषाच्या डाव्या बाजूस ( उत्तरेस ) निजते."

" २१. पाणी (आणि अग्नि) यांच्या मधून कोणी जाऊं नये, गेला असतां तेणेंकरून जो संभोग चालला आहे त्याला तो व्यत्यय आणील. तो पाणी (अग्नीच्या उत्तरभागाच्या, ह्मणजे पूर्वेकडल्या बाजूच्या ) पलीकडे न नेतां खालीं ठेवो. अथवा त्यानें तें (उत्तरेच्या बाजूस —पश्चिमेस नव्हे) पोंचण्यापूर्वीं खालीं ठेवूं नये. कारण, त्यानें पलीकडे नेऊन पाणी खालीं ठेविलें—अग्नि आणि पाणी यांच्यामध्यें जणू काय मोठी स्पर्धा आहे—तर तो अग्नीची स्पर्धा बाहेर पाडील; आणि जेव्हां ते ( उपाध्या व यज्ञकर्त्ता) ह्या ( भांड्यांतील ) पाण्याला स्पर्श करितील, तेव्हां तो तें ( उत्तरेच्या बाजूच्या ) पलीकडे नेल्यानें शत्रूस अग्नींत चिरकांडीं सोडायास लावील, परंतु जर तो ( उत्तरेच्या बाजूस जाण्याच्या पूर्वीं ) तें खालीं ठेवील तर ज्या कार्याकरितां तें पुढें आणिलें त्याची सिद्धि त्याला प्राप्त होणार नाहीं. यास्तव तो नेमका अहवनीय अग्नीच्या उत्तरेस खालीं ठेवो."

" २२. आतां तो ( अग्नीच्या ) भोंवतीं दर्भ पसरतो; आणि दर खेपेस दोन दोन अशीं उपकरणें आणितो; ह्मणजे सूप, आणि अग्निहोत्राच्या पळ्या, लांकडी तलवार आणि खापरें, पाचर आणि कृष्णमृगचर्म ( काळ्या काळविटाचें कातडें ), उखळ मुसळ, लहान व मोठीं जातीं, ह्यांची संख्या १० आहे; कारण विराज १० अक्षरांचा आहे; आणि प्रकाशमान विराज हाही यज्ञ आहे. तो एक एक वेळेस दोन कां नेतो याचें कारण असें आहे कीं, जोडी ह्मणजे बळ; कारण जेव्हां दोघेजण एखादें काम हातीं घेतात तेव्हां त्यांत बळ असतें

याशिवाय जोडी ( युग्म ) उत्पादक संभोगाचें दर्शक आहे; यास्तव तेणेंकरून ( ह्या प्रत्येक वस्तूचा ) उत्पादक संभोग घडतो."

अमावास्या पूर्णिमेच्या यज्ञांविषयींचे निर्देशांनीं २७२ पृष्ठें भरलीं आहेत. वर जो मासला दाखविला आहे त्यावरून ह्या निर्देशांत कंटाळवाणें चर्वितचर्वण आहे असें दिसून येईल, आणि त्यांतील तर्कशास्त्र तर केवळ अयुक्तिक आहे ( वरील १४,१६,१८ पाहा ). दुसऱ्या कांडांत पुण्यकर्मोपयोगी अग्नींची स्थापना, अग्नींची उपासना इ० विषय आहेत. अग्निहोत्र. किंवा सकाळचीं व संध्याकाळचीं दुधाचीं अर्पणें याविषयीं खालीं उतारा घेतला आहे.

## कांड चौथें.

अग्निहोत्र किंवा प्रातःकाळचा व सायंकाळचा यज्ञ; आणि अग्नि-उपस्थान किंवा अग्नींची पूजा.

१. आरंभीं प्रजापति एकलाच होता. मी प्रजा कशी होईन असा त्यानें विचार केला. त्यानें श्रमानें तप केलें. त्यानें आपल्या मुखापासून अग्नि उत्पन्न केला. अग्नि त्यानें तो आपल्या मुखापासून उत्पन्न केला ह्मणून अग्नि अन्नभक्षक आहे; आणि खचीत अग्नि अन्नभक्षक आहे असें जो जाणतो तो स्वतां अन्नभक्षक होतो.

२. त्यानें त्याला देवांच्या पूर्वीं ( अग्रे ) उत्पन्न केलें म्हणून त्याला अग्नि ह्मणतात; कारण लोक ह्मणतात कीं, अग्नि व अग्री एकच आहे. तो उत्पन्न झाल्यावर प्रथम ( पूर्व ) असा गेला, कारण जो प्रथम जातो त्याला तो पुढें (अग्रे ) जातो असें ह्मणतात. याप्रमाणें त्या अग्नीची उत्पत्ति व स्वभाव आहे.

३. प्रजापतीनें मग असा विचार केला कीं, अग्नीला मी आपल्याकरितां अन्नभक्षक उत्पन्न केला, परंतु माझ्या शिवाय एथें दुसरें अन्न नाहीं, मला तर तो खचीत खाणार नाहीं. त्या काळीं पृथ्वी अगदीं बोडकी (सुनी) होती. तिजवर कांहीं झाडझुडूप नव्हतें. ह्याची त्याला चिंता लागली.

४. नंतर अग्नि आपलें मुख उघडून प्रजापतीकडे फिरला, आणि तो (प्रजापति) भयभीत होत्साता त्याची महिमा (थोरपण) त्याला सोडून गेली. वाचा हीच त्याची महिमा आहे. त्यानें आपल्यामध्यें आहूति इच्छिली, आणि (आपले हात) चोळले; आणि त्यानें (आपले हात) चोळले ह्मणून हा व तो (हाताचे तळवे) केशरहित आहेत. मग त्यानें घृताहुति किंवा पयाहुति (दुधाचें अर्पण) मिळविलीं; परंतु दोन्ही खरोखर दूधच आहेत.

५. परंतु ह्या आहुतीनें त्याची तृप्ति झाली नाहीं, कारण तींत केश होते. त्यानें ती 'जळत असतां पी' (ओषधय) असें ह्मणून अग्नींत ओतिली. त्यापासून वनस्पति उगवली, ह्मणून तिला औषधि (औषधयः) ह्मणतात. त्यानें आपले हात दुसऱ्यानें चोळले, आणि त्यामुळें त्याला दुसरी आहुति मिळाली, ती घृताहुति किंवा पयाहुति होती, तरी दोन्ही दूधच आहेत.

६. ह्या आहुतीकडून त्याची तृप्ति झाली. तो आशंकित होऊन "मी ती टाकूं? मी ती न टाकूं?" असा विचार करूं लागला. त्याची महिमा त्याला ह्मणाली, आहुति दे. आपली (स्व) महिमाच आपल्याशीं बोलली (आहे) हें प्रजापतीला ठाऊक होतें, याकरितांच आहुति देतांना "स्वाहा" म्हणतात. त्यानंतर तो तपणारा (सूर्य) उगवला, नंतर तो वाहणारा (वायु) उठला. मग अग्नि परतला (त्यानें तोंड फिरविलें).

७. प्रजापतीनें आहुति दिल्यावर आपल्यास पुनः उत्पन्न केलें; आणि त्याला भक्षणार होता तो मृत्यु ह्मणजे अग्नि त्यापासून आपलें रक्षण केलें. आणि जो कोणी हें जाणून अग्निहोत्र करितो तो जसा प्रजापति आपणच पुनः उत्पन्न झाला तसा संतानाच्या द्वारें पुनः खचित उत्पन्न होतो; आणि अग्नि जो मृत्यु तो त्याला भक्षण करूं लागला असतां त्यापासून आपलें रक्षण करितो.

८. आणि तो मेल्यावर लोक त्याला जेव्हां अग्नीवर ठेवितात, तेव्हां तो अग्नींतून पुनः जन्मतो. अग्नि त्याच्या शरीराचें मात्र दहन करितो. तो जसा आपल्या मातापितरांपासून झालेला असतो तसा अग्नीपासून जन्मतो. परंतु जो अग्निहोत्र करीत नाहीं तो पुनः जन्मास येत नाहीं. यास्तव अग्निहोत्र खचीत केलेंच पाहिजे.

९. आतां संशयांतून बाहेर पडण्याच्या त्याच जन्माविषयीं:— जेव्हां प्रजापतीनें संशय धरिला तेव्हां संशय धरीत असतां तो अधिक चांगल्या बाजूस स्थिर राहिला, असा कीं, त्यानें आपणाला पुनः उत्पन्न केलें, आणि अग्नि जो मृत्यु, जो त्याला भक्षणार होता त्यापासून आपलें रक्षण केलें. तर जेव्हां कोणी कशाविषयीं संशय धरितो तेव्हां संशयापासून बाहेर पडण्याच्या जन्माविषयीं जाणतो, तो अद्यापि अधिक चांगल्या बाजूस राहतो.

१०. हवि दिल्यावर त्यानें आपले (हात) चोळले. त्यापासून विकंकटवृक्ष उत्पन्न झाला; यास्तव तो वृक्ष यज्ञास विहित आहे, आणि यज्ञाच्या उपकरणांस योग्य आहे. त्यानंतर देवांमध्यें जे तीन वीर ते जन्मले; ह्मणजे अग्नि, तो वाहणारा (वायु), आणि सूर्य; आणि खचित जो कोणी देवांमधील ह्या वीरांस जाणतो त्याला वीर जन्मतो.

११. मग ते ह्मणाले, 'आह्मी आमचा पिता प्रजापति याच्या मागून येतों, तर जें आमच्या मागून येईल तें आपण उत्पन्न करूं!' एका भूमीच्या तुकड्याला कुंपण घालून त्यांनीं हीन्नविरहित गायत्रीमंत्रानें स्तुति गायिली; आणि ज्याचें त्यांनीं कुंपण घातलें तो समुद्र होता, आणि ही पृथ्वी स्तवनभूमि ( अस्ताव ) होती.

१२. त्यांनीं स्तुति गाइल्यावर ते पूर्वेकडे गेले, आणि ह्मणाले कीं, 'आह्मी तिकडे परत जाऊं.' देवांस एक उद्भवलेली ( उत्पन्न झालेली ) गाय भेटली. त्यांजकडे पाहून तिनें 'हीन्न' असा ध्वनि केला. देवांनीं पाहिलें कीं, हा सामन् (यज्ञांतील मधुर गीत) आहे; कारण याच्या पूर्वीं त्यांच्या गीतांत 'हीन्न' नव्हतें, परंतु यानंतर तें खरें सामन् होतें. आणि ज्यापेक्षां हा सामनाचा हीन्न ध्वनि गायीमध्यें होता, त्यापेक्षां तिच्यापासून ( गाईपासून ) उपजीविकेचें साधन उत्पन्न होतें. त्याप्रमाणेंच जो कोणी सामन् याचा हीन्न गायीमध्यें जाणतो ( ओळखतो ) तो उपजीवनाचें साधन उत्पन्न करितो.

१३. ते ह्मणाले, जें आह्मी एथें उत्पन्न केलें तें शुभ आहे, आह्मी गाय उत्पन्न केली; कारण ती खरोखर यज्ञ आहे, तिच्यावांचून कोणताही यज्ञ होत नाहीं; ती अन्नही आहे, कारण गाय खरोखर सर्व अन्न आहे.

१४. हा शब्द ('जा') त्या गायीचें नांव आहे, आणि तसाच तो यज्ञाचाही आहे. यास्तव तो त्याचा पुनः उच्चार करो, (तो असें ह्मणो कीं, शुभ, उत्तम! आणि जो कोणी हें जाणून, तें पुनः पुनः ह्मणतो) (जसें) शुभ, उत्तम! त्याच्या ह्या गायी वृद्धि पावतात, आणि यज्ञ त्याजकडे झुकतील ( वळतील ).

१५. अग्नीनें तिचा लोभ धरिलाः त्यानें मनांत ह्मटलें कीं, मी तिच्याशीं जुळूं काय? तो तिच्याशीं जुळला, आणि त्याचें बीज तिचें दूध झालें; यास्तव गाय कोंवळी असतांना तिच्यांतलें तें दूध शिजलेलें ( उष्ण ) असतें; कारण तें अग्नीचें बीज आहे, यास्तव तें काळ्या किंवा तांबड्या ( गायींत ) असलें तरी तें सर्वदां पांढरें असतें, आणि सर्वदां अग्नीसारखें लकलकीत असतें. यामुळेंच तें पहिल्यानें काढलेलें असतां उष्ण असतें, कारण तें अग्नीचें बीज आहे.

१६. ते ( मनुष्य ) ह्मणाले कीं, 'चला, आपण हे अर्पूं!' (ते देव ह्मणाले) 'आह्मांतून कोणाला हे प्रथम अर्पितील?' अग्नि ह्मणाला, 'मला!' वाहणारा ( वायु ) ह्मणाला, 'मला!' सूर्य ह्मणाला, 'मला!' त्यांचें एकमत झालें नाहीं; आणि एकमत न झाल्यामुळें ते ह्मणाले, 'आपण आपला पिता

प्रजापति याजकडे जाऊं, आणि आपणांतून ज्या कोणाला प्रथम अर्पावें असें तो ह्मणेल त्याला ते हें अर्पितील.' ते आपला बाप प्रजापति याच्यापाशीं गेले, आणि ह्मणाले, 'आह्मांपैकीं कोणाला ते हें अर्पितील?'

१७. तो ह्मणाला, 'अग्नीला. अग्नि तत्क्षणींच आपलें बीज पुनः उत्पन्न करील, आणि तुह्मी पुनः उत्पन्न केले जाल.' तो सूर्यास ह्मणाला, 'नंतर तुला. आणि जें कांहीं अर्पिलेल्या दुधांतून त्यापाशीं असेल तें त्या वाहणाराला (वायूला)!' आणि याप्रमाणें ते याच रीतीनें आजपर्यंत हें दूध त्यांस अर्पण करितात; सायंकाळीं अग्नीस, आणि प्रातःकाळीं सूर्यास; आणि आणिलेल्या दुधांपैकीं जें त्याजवळ त्या वेळीं असतें तें त्या वाहणाराचें आहे.

१८. हावि अर्पणापासून ज्या रीतीनें देव उत्पन्न झाले त्या रीतीनें ते झाले, त्याच्यायोगें त्यांनीं जो जय मिळविला तो मिळविला, अग्नीनें ही पृथ्वी जिंकिली, वायूनें अंतरीक्ष जिंकिलें, सूर्यानें आकाश जिंकिलें; आणि जो कोणी हें जाणून अग्निहोत्र करितो, तो त्याच रीतीनें खरोखर उत्पन्न केला जातो, जो जय त्यांनीं मिळविला तो तो मिळवितो;—खरोखर जो हें जाणून अग्निहोत्र करितो तो त्यांच्याबरोबर त्याच लोकाचा सहभागी होतो. यास्तव अग्निहोत्र खचीत करावें.

प्रोफेसर मोक्ष मूलर व यजालिंग यांनीं ब्राह्मणग्रंथांवर जी खरमरीत टीका केली आहे ती बरोबर नाहीं असें हा मासला पाहून कोणताही विचारशील पुरुष ह्मणणार नाहीं.

## आर्यसमाज.

हिंदुस्थानांतील शास्त्री, पंडित व साधारण लोकांचा बहुत मोठा भाग हे चार वेदांशिवाय ब्राह्मणें, उपनिषदें, मनुधर्मशास्त्र, इतिहास, पुराण इ० ग्रंथ ईश्वरप्रणित मानितात, आणि शतावधि वर्षांपासून त्या ग्रंथांच्या भाष्यकारांनीं व टीकाकारांनीं जो अर्थ केला आहे तो त्यांस मान्य आहे.

पश्चिमेकडील विद्येचा ह्या देशांत कमी जास्ती मानानें चहूंकडे प्रसार होत चालला आहे. ह्या विद्येची झुळूक कित्येकांस देशीभाषांच्या द्वारें दिसत आहे, कित्येकांस इंग्रजी भाषेच्या अपूर्ण ज्ञानाच्या योगानें ती प्राप्त होत आहे. अशीं मनुष्यें कधीं कधीं हिंदु लोकांच्या कल्पना व पाश्चात्य देशच्या कल्पना यांची ढवळाढवळ करूं पाहतात. ह्या कल्पना बहुतेक बाबतींत एकमेकांशीं विरुद्ध आहेत, तरी त्यांचा जुवा

बसवून देण्याकरितां हिंदु ग्रंथांतील कल्पना ओढून ताणून व मुरगाळून त्यांचा नवा अर्थ करितात. असें करणारांपैकीं आर्यसमाजाचे स्थापक दयानंद सरस्वति हे एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेले.

प्रथम त्यांच्या जीवनचरित्रांतील कांहीं गोष्टी सांगतों. दयानंद यांचा जन्म सुमारें ६० वर्षांमागें काठेवाड प्रांतांतील मोरवी नामक गांवीं झाला. ह्यांनीं लहानपणींच संस्कृत व्याकरणाचा अभ्यास केला, आणि ते वेद मुखपाठ शिकले. पुढें त्यांच्या बापाच्या मनांत त्यांस लिंगभक्तीचा उपदेश देण्याचें आलें, त्याकरितां दयानंदजींस शिवालयांत रात्रभर उपोषण करावें लागलें. तेथें असतां त्यांच्या मनांत कांहीं विचार आले ते येणेंप्रमाणें:—

"मी आपल्या मनाशीं असा प्रश्न केला कीं, ज्याविषयीं असें सांगतात कीं, तो चहूंकडे चालतो, हिंडतो, खातो पितो, निजतो, ज्याच्या हातांत त्रिशूळ आहे, जो डमरू वाजवितो, ज्याला मनुष्यास शाप देण्याची शक्ति आहे असा जो थोर शिव परमात्मा तोच ही माझ्या समोर बैलावर ढेंगें टाकून बसलेली मूर्त्ति असूं शकेल काय? असे विचार मनांतून काढून टाकण्यास असमर्थ असतां मी आपल्या पिताजीस झोंपेंतून उठवून विचारिलें कीं, ही विक्राळ मूर्ति शास्त्रांत सांगितलेला देव आहे काय? पिताजी ह्मणाले, 'तूं असा प्रश्न कां करितोस?' मी ह्मटलें, 'सर्वशक्तिमान देवाविषयींच्या कल्पनेशीं ह्या मूर्त्तीचा माझ्यानें मेळ घालून देतां येत नाहीं. ह्या मूर्तीच्या अंगावर उंदीर धांवतात, व ते तिला भ्रष्ट करितात तरी ती त्यांस कांहीं अटकाव करीत नाहीं.' तेव्हां माझ्या बापानें माझी समजूत करण्याचा प्रयत्न केला तो असा कीं, 'ही महादेवाची पाषाणमूर्त्ति पवित्र ब्राह्मणांनीं प्रतिष्ठित केल्यामुळें देवत्व पावली आहे. या कलियुगांत शिव आपल्या दृष्टीस पडत नाहीं, ह्मणून त्याच्या भक्तांनीं ही मूर्त्ति करून तींत देव आहे अशी कल्पना केली आहे.' परंतु ह्या स्पष्टीकरणाकडून माझें समाधान झालें नाहीं."

दयानंद २१ वर्षांचे असतां त्यांचे बापानें त्यांचें लग्न करण्याचा बेत केला, परंतु तो त्यांस न आवडून त्यांनीं गुप्त रीतीनें घर सोडलें. नंतर बापानें शोध करून त्यांस परत आणिलें. परंतु पुनः त्यांनीं पला-

यन केलें. पुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत ते भटकत फिरले, त्यांत कांहीं काळपर्यंत ते संन्याशी बनले होते. त्यांस आपल्या दहा वर्षांच्या वयांत देखील मूर्तिपूजेचें मूर्खत्व दिसून आलें. प्रौढ वयांत ते केवळ चार वेद, आणि यजुर्वेदाचें ईश उपनिषद इतके ग्रंथ मात्र ईश्वरप्रणित आहेत असें मानूं लागले, वरकड सर्व ग्रंथांचा त्यांनीं अनंगिकार केला.

सन १८८१ मध्यें दयानंदांशीं त्यांच्या मतांविषयीं वादविवाद करण्याकरितां एक मोठी परिषद् (सभा) मिळाली, तींत गौडा, नवदीप व काशी एथून २०० पंडित जमले होते. त्या परिषदेनें जे निर्णय केले ते येणेप्रमाणें :—

१. ब्राह्मणें हीं मंत्राप्रमाणेंच सप्रमाण व व्यवहारोपयोगी आहेत, आणि मनुस्मृतिप्रमाणेंच इतर स्मृति सप्रमाण व व्यवहारोपयोगी आहेत.

२. विष्णु, शिव, दुर्गा व हिंदु लोकांचे इतर देव यांची भक्ति, व मृताचें श्राद्ध व गंगास्नान हीं करण्यास शास्त्राधार आहे.

३. ऋग्वेदाचें जें प्रथम सूक्त अग्नीमीत्यर्थ आहे त्यांत अग्नि शब्दाचा मूळ अर्थ विस्तव व दुसरा अर्थ (अग्नि) देवता असा आहे.

४. मोक्षप्राप्तिकरितां यज्ञ करितात.

दयानंद हे व्याख्यानें देत गांवोगांव फिरत असत. याशिवाय त्यांनीं आपल्या उत्तर वयाचीं कित्येक वर्षें पुस्तकें लिहून प्रसिद्ध करण्यांत घालविलीं. त्यांनीं मरणाच्यापूर्वीं अर्ध्या वेदाचें हिंदी भाषांतर समाप्त केलें होतें. त्यांचे धर्मसंबंधी मुख्य सिद्धांत **ऋग्वेदादिभाष्यभूमिका** नामक ग्रंथांत संग्रहित केलेले आहेत. त्यांच्या **सत्यार्थप्रकाशांत** धर्मसंबंधी व सामाजिक चालींविषयीं त्यांचा उपदेश आहे.

दयानंदाचा काळ अजमीर एथें १८८३ मध्यें झाला. त्या वेळीं त्यांचें वय ५९ वर्षांचें होतें.

दयानंदांनीं हिंदुधर्मग्रंथांपैकीं जे आपल्यास आवडले ते कबूल केले, व बाकीचे झुगारून दिले, आणि मनास वाटेल तसा सर्व ग्रंथांचा अर्थ केला; ज्या कोणी त्यांचा अर्थ कबूल केला नाहीं त्यांस त्यांनीं अज्ञानी ठरविलें, त्यांच्यापूर्वीं २५०० वर्षांपासून झालेले सर्व विद्वान्, भाष्यकार, टीकाकार, वैयाकरणी, व शब्दकोशकार हे सर्व चुकले, व हेच काय ते वेदांचा खरा अर्थ करणारे झाले. वादविवाद करिते वेळीं

आपल्या प्रतिपक्ष्यांचा हंसून उपमर्द करितील असें मित्रमंडळ आपल्याबरोबर ते बाळगीत असत. याप्रमाणें त्यांनीं काशीच्या पंडितांशीं वाद चालवितांना प्रथम दिवशीं केलें. दुसऱ्या दिवशीं पंडितांनीं दयानंदांच्या टोळीपेक्षां मोठी टोळी आपल्याबरोबर आणिली, तिनें दयानंदांनीं जें कांहीं बोलावें त्याची हंसून बचेरी उडवावी, व त्याची हुर्यो करावी; याप्रमाणें ज्याचें कोडें त्याच्यापुढें ठेवून त्यांचा हिरमोड केला.

दयानंदांच्या वेदार्थाला अनुसरणाऱ्या अशा "आर्यसमाज" नामक पुष्कळ मंडळ्या उत्तर हिंदुस्थानांत व पंजाबांत झाल्या आहेत. लाहोर एथें एक आंग्लो वैदिक कॉलेज स्थापिलें आहे, आणि आर्यपत्रिका नांवाचें इंग्रजी पत्र तेथें निघत असतें.

दयानंदांचीं मुख्य धर्ममतें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:—

१. **वेदांचें अनादित्व.**—मि० फोरमन असें ह्मणतात कीं, पंडित लोकांचें ह्मणणें असें आहे कीं, सृष्टीच्या आरंभीं, ब्रह्म यानें ब्रह्मदेवास वेद शिकविले, आणि ब्रह्मदेवानें आपल्या चार मुखांतून चार वेद काढिले, आणि त्यानें ते ऋषींस शिकविले, त्या ऋषींनीं ते लिहून ठेविले. परंतु एवढ्यानें दयानंदांचें समाधान झालें नाहीं. दयानंद ह्या मताचा उपहास करितात. त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, "ब्रह्मा हा देव नव्हता, तो एक मोठा राजा होता, आणि तो वेदांचा कर्त्ता नव्हता, तर तो स्वतां वेद शिकणारा होता. तर वेद केवल अनादि आहेत, ते ईश्वराचें ज्ञान आहे, याकरितां ईश्वराप्रमाणेंच ते सनातन आहेत. आणि जसे ते आतां आहेत तसेच ते अनादिकालापासून ह्या लोकास (जगास) व इतर लोकांस (जगांस) त्यांच्या उत्पत्तीपासून लयापर्यंतच्या दीर्घ गतींत दिलेले आहेत. त्यांच्या (जगांच्या) उत्पत्तीचा व लयाचा काल अनेक परार्ध वर्षें होता. सांप्रतच्या जगाकरितां जी वेदांची आवृत्ति झाली ती १००,९६०,८५२,९७९ वर्षांमागें देवानें प्रथमच्या चार मनुष्यांस शिकविली. ह्या चार मनुष्यांचीं नांवें अग्नि, वायु, सूर्ज (सूर्य) व अंगिर अशीं होतीं. ह्यांनीं ईश्वरापासून वेद शिकून घेतल्यावर एक एक वेदाचा ग्रंथ लिहिला."

उपत्तीच्या काळाविषयींचें गणित आर्यसमाजी यांत सारखें नाहीं. सन १८८४ सालच्या Aryan Magazine नामक पुस्तकांत आर्य शक १९६ कोटि, ८ लक्ष, ५२, ९८४ वर्षांचा सांगितला आहे. त्याच पुस्तकांत एक लिहिणारा ह्मणतो कीं, अद्याप २३५ कोटि, ९१ लक्ष, ४७, ०१५ वर्षें जायाचीं आहेत. ह्या प्राचीन काळाबाबद आर्य लोकांच्या ह्मणण्याविषयीं Indian Spectator नामक पत्रकर्त्यांनीं येणेंप्रमाणें लिहिलें आहेः—

“ज्ञानहीन व संवृद्धिहीन युग.” हिंदु आर्य आपल्या आस्तित्वाच्या काळाची गणना शतकांनीं करीत नाहींत, तर लक्षावधि वर्षांनीं करितात. हें त्यांचें १,९६१ लक्षावें वर्ष आहे. आमचें १९. वें शतक ह्या काळाशीं लावून पाहिलें असतां तें किती भिकार दिसतें! परंतु हाय हाय! हीं महापद्म व शंकुवर्षें हिंदु लोकांस इतिहासांतील ‘डार्क एजस्’ नामक अज्ञानतिमिराच्या काळांतील अळंब्यासारिख्या युरोपियनांपेक्षां अधिक ज्ञानी करून सोडून गेलीं नाहींत. आर्य हिंदूंचें १९६ वें लक्ष वर्षांपेक्षां युरोपाचें १९ वें शतक अधिक चांगलें आहे.”

दयानंद हे शब्दाच्या अनादित्वावरून वेदांचें अनादित्व स्थापितात. ते ह्मणत कीं, “**गौ** (गाय) हा शब्द उदाहरणार्थ घ्या. ग हा ध्वनि अनादिकाळापासून आहे. तसाच **औ** हा ध्वनि; त्या चौघांनीं (अग्नि, वायु इ०) हे एकत्र केले, आणि लिहिण्यांत **गौ** हा शब्द दिला.” अणखी त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, “ह्या ध्वनींकडून सर्व आकाश (स्थल) व्याप्त आहे. जेव्हां कोणी मनुष्य बोलूं लागतो तेव्हां तो केवल जे ध्वनि पाहिजेत ते निवडून घेतो, आणि ते आंत घेतल्यावर त्याला जशी पाहिजे तशी त्यांची तो रचना करितो; याप्रमाणें तो शब्द व वाक्यें जुळतो. प्रत्येक ध्वनीनें आपापलें काम बजाविल्यावर तो ध्वनि ज्या दुसऱ्या ध्वनीशीं थोड्या वेळापुरता संयुक्त असतो त्यापासून वेगळा होऊन आकाशांत आपल्या स्थानीं जातो, आणि जेव्हां त्याची पुनः गरज लागेल, तेव्हां तो कामास सिद्ध असतो.” हें मत दयानंदानीं जयमिनीच्या पूर्वमिमांसेवरून घेतलें होतें. ह्या तर्कवादाप्रमाणें कोणताही ग्रंथ अनादि आहे असें सिद्ध करितां येईल.

वेदाच्या अनादित्वाविषयीं दयानंदी कल्पनेचें खंडन वैदिक सूक्तेंच करितात, हें आह्मी मागें दाखविलें आहे. कित्येक सूक्तें नवीं व कित्येक जुनीं आहेत, तसेंच सूक्तें रचणारांचीं नांवें त्यांतच सांगितलीं आहेत. याशिवाय हीं सूक्तें आर्य लोक हिंदुस्थानांत प्रवेश करीत असतां व दस्यु वगैरे मूळप्रजांशीं लढाईंत गुंतलेले असतां रचिलेलीं आहेत, असें वेदांतील अंतर प्रमाणांवरून समजतें.

काशी एथील राजे शिवप्रसाद यांनीं पंडित दयानंदजीस ते संहिता ईश्वरप्रणीत कां मानितात व ब्राह्मणें कां मानीत नाहींत असा प्रश्न केला होता. त्यास पंडितजींनीं असें उत्तर दिलें कीं, " संहिता ही स्वतां दृष्टिगोचर असून, तीं इंद्रियज्ञानेंकरून स्थापित होते." मग पंडितजींस पुनः असें विचारिलें कीं, " ब्राह्मणें ही स्वतां दृष्टिगोचर असून इंद्रियज्ञानानें स्थापित केलीं जातात, " ह्या प्रश्नास त्यांच्याकडून कांहीं उत्तर मिळालें नाहीं.

इतर हिंदुलोकांप्रमाणें दयानंद हे वेदांचें ईश्वरप्रणितत्त्व स्वतः सिद्ध आहे, त्याला प्रमाण नको असें ह्मणत असत, त्याविषयीं आर्य पत्रिकेंत असें लिहिलें आहे कीं, " ते ( वेद ) तारांगणांवर खोदलेले आहेत. ते भूमीच्या मऊ मातींत तिंबलेले आहेत. ते सूर्याच्या किरणांत लिहिलेले आहेत. ते विजेच्या झकाकींत आहेत. सारांश जो देव सर्वांठायीं भरलेला आहे त्या देवासंगतीं ते आहेत. " ( १६ ज्यानु० १८८६ )

२. **एकेश्वरमत.**—पंडित दयानंद हे हिंदूंचे ३३ कोटी देव व देवी यांस मानीत नव्हते, तर वेदांत एकेश्वरीमत आहे असें त्यांचें ह्मणणें होतें. परंतु वेदांत अनेक देवमत आहे हें आह्मी मागें दाखविलें आहे. देव अकराचे तीनपट आहेत असें वेदांत वारंवार सांगितलें आहे. त्यांचीं नांवें वेगळालीं आहेत, त्यांस बायकामुलें आहेत, व ते निरनिराळ्या ठिकाणीं राहतात असेंही सांगितलें आहे. जर ते सर्व एक आहेत तर आतां जीवंत असलेलीं ३६ मनुष्यें एक आहेत असें कां ह्मणूं नये ? वेदोत्तर कालांत अद्वैतमताची वृद्धि झाली, " एकमेवाद्वितीयम् " ह्या प्रसिद्ध वाक्याचा ' दुसरा देव नाहीं ' असा अर्थ नाहीं, तर ' एक देवावांचून दुसरें कांहीं नाहीं ' असा आहे. एकेश्वरीमत ख्रिस्तीधर्मापासून घेतलेलें आहे.

३. **आत्मे व प्रकृति यांचें अनादित्व.**—मागें आह्मी सांगितलें आहे कीं, दयानंदांनीं आपलें जुनें हिंदु मत जें कांहीं थोडेंसें पाश्चिमात्य लोकांचें ज्ञान त्यांस देशीभाषांच्या द्वारें प्राप्त झालें होतें त्यांत मिसळलें. जीवांचें अनादित्व व प्रकृतिविषयींच्या कल्पना ते कपिलाच्या सांख्य-दर्शनावरून शिकले. कपिलाच्या शास्त्रास हिंदु लोक निरीश्वर सांख्य ह्मणतात. कपिलावर ते नास्तिकपणाचा दोष ठेवितात.

आर्यपत्रिकेचा तर्कवाद येणेंप्रमाणें आहेः—

"जर आत्मा अमर आहे तर तो उत्पन्न केलेलें तत्व कसा आहे हें आमच्या बुद्धीस समजत नाहीं. आत्म्याचें अमरत्व गृहित केलें तर त्याचें अनादित्व ही गृहित केलें पाहिजे. आत्मा जर चिरकाल राहायाचा आहे तर तो अनंतकालापासून राहिलेला असावा. वस्तुतः जें कांहीं वर्त्तमानकालीं आहे तें पूर्वीपासून आहे व सर्वकाळ राहील. विश्वा-मध्यें जें कांहीं सांप्रत आहे त्याचा एक कणही नाहींसा होणार नाहीं. सृष्टींतील प्रत्येक वस्तु अनादि व अविनाशी आहे. पदार्थाच्या प्रस्तुत अस्तित्वावरून त्याच्या प्राक् (पूर्वीच्या) अस्तित्वाची कल्पना होते, आणि त्याच्या भावी (पुढील) अस्तित्वाचें अगत्य उत्पन्न होतें." (ज्यानु० ३१, १८८८.)

वरील लेखांत सांख्यमताचें स्पष्ट निरूपण आहे. हा एक स्थिर हिंदुसिद्धांत आहे कीं, 'न वस्तुनो वस्तु सिद्ध.'

हिंदुधर्माच्या ह्या मूलतत्त्वाच्या भ्रमाविषयीं बैबलांतील जें वाक्य ह्या पुस्तकाच्या नामपृष्ठावर घेतलें आहे त्यांत दर्शविलें आहे. "मी (परमेश्वर) केवळ तुजसारिखा आहें असें तुला वाटलें." सुताराच्यानें सामग्रीवांचून काम करवत नाहीं ह्मणून सर्वसमर्थ ईश्वरालाही तसें करवत नाहीं. "तुह्मी देवाचें सामर्थ्य न जाणून चुकतां." त्याला दुर्बल व अपूर्ण मनुष्याप्रमाणें सामग्रीसाठीं खोळंबून राहावें लागत नाहीं, तर केवळ इच्छामात्रेंकरून ती त्याला उत्पन्न करितां येते.

जीवात्मे अनादि आहेत तर आपण सर्व लहान लहान देव आहों असें ह्मटलें आहे. आणि मनुष्येंच लघुदेव आहेत असें नाहीं, तर भूमीवर सरपटत चालणारा प्रत्येक कृमि आणि हवेंत उडणारा प्रत्येक

कीटकही तसेच आहेत. हिंदुमताप्रमाणें जीवात्मे झाडांत व निर्जीव वस्तूंत देखील जाऊं शकतात. तर या स्वयंभु तत्त्वांची गणना कोणाच्यानें करवेल !

एकच अनंत पराक्रमी व अनंत ज्ञानी असा परमेश्वर आहे असें मानणें, अथवा असंख्य जड व निर्बुद्ध अनुरेणु, व आत्मे अनादिकालापासून आहेत असें मानणें यांतून कोणतें सयुक्तिक आहे ?

आत्मा अनंतकाल जगायाचा असला तर तो अनादिकालापासून जगत आला असला पाहिजे, हा तर्कवादही असाच निर्मूल आहे, येणेंकरून देखील ईश्वर सर्वशक्तिमान नाहीं असें ठरतें. तो आपण उत्पन्न केलेल्या प्राण्यास आपल्या इच्छेप्रमाणें, अनंतकालिक अस्तित्व देण्यास समर्थ आहे.

४. **जन्मांतर.**—ह्या मताचा मागमोस वेदांत सांपडत नाहीं असें मोक्ष मूलर ह्मणतात, तरी आर्यसमाजी तें बाळगितात. एक भ्रामक मत स्थापन करायाला बहुधा दुसऱ्या भ्रामक मताचें अवलंबन करावें लागतें, तसें जीवात्मे अनादिकालापासून आहेत ह्या खोट्या मताचें प्रतिपादन करायाला जन्मांतराचें खोटें मत ह्यांनीं अवलंबिलें आहे.

ह्या मताचा विचार "हिंदुवाचकाकरितां ख्रिस्ती धर्माचें स्पष्टीकरण" नामक पुस्तकांत केला आहे. एथें त्याची थोडीशी चर्चा करितों:—

१. जशापासून तसें उत्पन्न व्हावें असा जो सृष्टिक्रम त्याला हें मत विरुद्ध आहे.

प्रत्येक प्राणी व वनस्पति यांपासून त्याच्या त्याच्या जातीप्रमाणें प्राणी व वनस्पति उत्पन्न होतात. जन्मांतराच्या मताप्रमाणें मनुष्य दुसऱ्या जन्मीं वाघ, डुकर, माशी किंवा भोपळा होऊं शकतो.

२. कोणासही आपल्या पूर्वजन्माचें किंचित स्मरण नाहीं.

आत्मा अनादि आहे तर त्याला इहजन्माच्या पूर्वीं घडलेल्या गोष्टीची आठवण कां नाहीं ?

३. जन्मांतरानें आत्मे कार्य किंवा गुण दृष्टीनें नवीन प्राणी होतात, असें कीं, दुसऱ्याच्या अपराधाबद्दल त्यांस शिक्षा केली जाती.

ह्याविषयीं समाधानार्थ असें ह्मणतात कीं, प्रत्येक नवीन जन्माच्या समयीं जेणेंकरून पूर्वजन्मीचें स्मरण नष्ट होतें असें कांहीं घडतें. असें

जर आहे तर ज्या मनुष्यावर ही क्रिया घडते तो तेव्हांपासून तोच मनुष्य असा राहत नाहीं. ज्या मनुष्याविषयीं तो अगदीं अज्ञान आहे अशाच्या अपराधांबद्दल त्याला शिक्षा होते.

हें जग पूर्वींच्या काल्पित जन्मांत केलेल्या बऱ्या वाईट कर्मांबद्दल फल भोगण्याचें स्थल नव्हे; तर एथें आमच्या वर्तनाची परीक्षा होते. आह्मी एका मोठ्या राजाच्या सेवकांप्रमाणें आहों, त्यानें आह्मां सर्वांस निरनिराळीं कर्तव्यें लावून दिलीं आहेत, आणि जशीं तीं आह्मी बजावूं त्याप्रमाणें मरणानंतर आमचा न्याय होऊन आह्मास फल मिळेल.

९. **यज्ञांचा त्याग.**—दयानंद हे वेदांचा अत्यंत मान राखण्याचा बाणा बाळगीत असत, परंतु त्यांचा उपदेश पाहिला असतां वेदांच्या विरुद्ध आहे. मि० कुंटे ह्मणतात कीं, "कोणतेंही वैदिक सूक्त वाचून पाहा, त्यांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष यज्ञाचा संबंध किंवा सूचना आहेच." तसेंच डाक्टर क्लार्क ह्मणतात कीं, जगण्यांत किंवा मरणांत, आर्यांचा सर्व धर्म यज्ञाच्या कांव्यावर फिरत असे. त्यांच्या सर्व जिण्यांत पदोपदीं तो त्यांस भेटत असे, त्यांच्या अस्तित्वाच्या सर्व स्थितींत तो त्यांस सर्वकांहीं होता.

वैदिक यज्ञांचा एक हेतु पापांची क्षमा मिळविणें हा होता. यज्ञ हा पापाचा लोप (किंवा खोडून टाकणें, रद्द करणें) आहे, असें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. परंतु दयानंदांनीं ह्या कल्पनेची निंदा करून ती मूर्खपणाची ठरविली आहे. ते ह्मणतात कीं, "हवा शुद्ध करण्यासाठीं उत्तम प्रकारचा धूर उत्पन्न करावा ह्मणून वेदांत नानाप्रकारच्या वस्तु जाळण्याची आज्ञा आहे; हा धूर वर चढून तो मेघांत मिळून जातो, व मेघ उत्पन्न करितो, आणि पर्जन्याच्या रूपानें खालीं येतो, त्याच्या योगानें पर्जन्यही शुद्ध होतो. वैदिक यज्ञांचा हेतु हवा व पाणी शुद्ध करण्याचा, व तेणेंकरून रोगनाश करण्याचा आहे."

पंडितजींस कोणी एकदां असें विचारिलें कीं, यज्ञाकरितां ओटा, स्थंडिल, कुंड वगैरे करण्याविषयीं वेदांत ज्या आज्ञा आहेत त्यांचा अर्थ काय? पंडितजींनीं उत्तर दिलें कीं, ओटा वाटोळा, चौरस, त्रिकोनी बांधण्याची आज्ञा लोकांनीं भूमिति शिकावी ह्मणून वेदानें

दिली होती. जमिनींत कुंड खणण्याचें कारण असें होतें कीं, तें विटांनीं बांधून काढावें; तेणेंकरून लोकांस अमूक परिमाणाच्या बांधकामास अमूक विटा लागतात. असें समजल्यानें गणिताचा एक धडा शिकण्यास सांपडतो !

६. **जात.**— हिंदू लोक जो जातिभेद मानितात तो केवळ ब्राह्मणांनीं केला आहे, व तो फार वाईट आहे असें दयानंदांचें मत होतें. ख्रिस्ती व मुसलमान खेरीज करून हिंदूनें कोणाच्याही हातचें खावें असें त्यांचें मत होतें. ह्या उभयतांच्या हातचें खाण्याविषयीं मनाई करण्याचें कारण हेंच कीं, त्यांच्या शरीराच्या बनावटींत दुर्गंधाचे कण मिश्रित आहेत ! हिंदुलोकांनीं नीच जातीच्या हातचें खावें इतकेंच नाहीं, तर त्यांच्या मतें उंच जातीच्या लोकांनीं आपलें अन्न आपण शिजवूं नये, तर शूद्र किंवा नीच जातीचे लोक यांनीं शिजविलेलें अन्न मात्र खावें, कारण स्वयंपाक करितांना विस्तवापाशीं बसून डोकें तापतें, व मेंदूला इजा होते; याकरितां नीच लोकांनीं उंच लोकांकरितां हें काम करावें !

७. **मुलांचें शिक्षण.**—मुलांमुलींस तीं पांच वर्षांचीं झाल्यावर अगदीं वेगळें वेगळें ठेवावें. मुलींच्या शाळेवरील शिक्षक व चाकर स्त्रिया असाव्यात, व मुलग्यांच्या शाळेवर पुरुष असावेत. शाळा गांवापासून निदान आठ मैल दूर असावी. मुलें जोंपर्यंत विद्याभ्यास करितात, तोंपर्यंत त्यांस त्यांच्या आईबापांशीं भेटूं देऊं नये ; तोंपर्यंत मुलें व आईबाप यांच्यामध्यें पत्रव्यवहार देखील चालूं नये.

ह्या शाळांत वेदावांचून दुसरा कोणताही विषय शिकवूं नये. तोच विषय सर्वदा शिकवावा, कारण त्यांतच सत्य आहे, व सत्यावांचून दुसरें कांहीं नाहीं.

वेदाभ्यास निदान २४ वर्षें करावा, ह्मणजे ८ वर्षांच्या वयापासून ३२ वर्षांच्या वयापर्यंत ; ५० वर्षेंपर्यंत केला तर अधिक चांगलें, आणि ५६ वर्षेंपर्यंत केल्यास त्याहूनही चांगलें. ह्या अभ्यासक्रमापासून होणारे लाभ येणेंप्रमाणें आहेत:—प्रथम क्रमांत पहिल्या दोन वेदांपैकीं एकएक वेद बारा बारा वर्षें शिकल्यानें रोगापासून मुक्ति मिळते, व ७० पासून ८० पर्यंत आयुष्याची वृद्धि होते. दुसऱ्या क्रमांत पहिल्या

तीन वेदांपैकीं प्रत्येकास १२ वर्षें दिल्यानें, आणि शेवटच्या वेदास ८ वर्षें दिल्यानें जीव, अवयव, अंत:करण, आणि आत्मा हीं शक्तीनें संयोग पावून मनुष्य आपल्या शत्रूस रडायास लावितो, आणि सर्व चांगल्या मनुष्यांचें पोषण करणारा होतो. तिसरा क्रम ८ पासून ९६ वर्षांचा आहे; किंवा जशीं वर्णमालिकेंत ४८ अक्षरें आहेत तशीं अभ्यासाचीं ४८ वर्षें; ह्मणजे प्रत्येक वेदाला १२ वर्षें. याप्रमाणें जो अभ्यास करितो त्याचें आयुष्य त्याच्या स्वाधीन राहतें.

अशा प्रकारें सुशिक्षण पावलेले पुरुष व स्त्रिया संसाराच्या कामास लायक होऊन शाळेंतून बाहेर पडतात. मग तीं लग्न करून गृहस्थाश्रमांत राहोत. जो कोणी हे करार पाळतो तो आपलें आयुष्य आपल्या मत्तेंत अशा प्रकारें ठेवितो कीं, तो ४०० वर्षें जगतो.

ज्यांनीं ही उपपत्ति काढली ते पंडितजी जन्मभर वेदाभ्यास करूनही आपल्या वयाच्या ५९ व्या वर्षींच मरण पावले. हें त्या उपपत्तीचें मोठें दुर्भाग्य समजलें पाहिजे.

८. **विवाह.**—बालविवाहाचा निषेध केला आहे. लग्नाचा विहितकाल पुरुषास २५–४८ वर्षांचा, व स्त्रियांस १६–२५ वर्षांचा धरिला आहे.

सत्यार्थप्रकाशांत (पृ० ८०–८३) लग्नाविषयीं पुढील नियम सांगितले आहेत. मुलांच्या शाळेंतील जे लग्नास योग्य असे मुलगे असतील त्या सर्वांचे फोटोग्राफ शाळेच्या मुख्यानें मुलींच्या शाळेच्या मुख्याकडे पाठवून द्यावे व त्यानें ते ठेवून घ्यावे; तसेच मुलींच्या शाळेंतल्या मुख्यणीनें ज्या मुली लग्नयोग्य झाल्या असतील त्यांचे मुलांच्या शाळेच्या मुख्याकडे फोटोग्राफ पाठवावे. जेव्हां दोन्ही शाळांपैकीं एका प्रिन्सिपालास एखादा मुलगा किंवा मुलगी यांचें लग्न व्हावें असें वाटेल, तेव्हां तिनें किंवा त्यानें त्या फोटोंतून वर किंवा नवरी निवडून काढावी. नंतर तो फोटो दुसऱ्या शाळेंत पाठवावा. त्याबरोबर (मुलाचें किंवा मुलीचें) वय, उंची, गुण, कुल, धन यांचें वर्णन लिहून पाठवावें. जर त्या तरूण स्त्रीपुरुषांचें लग्न व्हावें असें दोन्ही शाळेचे प्रिन्सिपालांच्या मनास आलें, तर तो त्या तरूणाचा फोटो त्याच्या वर्णनासुद्धां त्या तरूणीस द्यावा, व तिचा फोटो तशाच रीतीनें त्याला दाखवावा.

सर्व गोष्टी अनुकूळ असल्या तर मुलांमुलींच्या आईबापांस ही गोष्ट कळवावी, आणि लग्न लावावें. जर आईबापांची इच्छा असली तर त्यांनीं-ही अशा रीतीनें लग्नाचा घाट बनवून आणावा.

**पुनर्विवाहा**ची मनाई केली आहे. परंतु **नियोग** करण्याविषयीं मोकळीक आहे. विधुर व विधवा यांनीं लेंकरें होण्याकरितां कांहीं काळ एकत्र राहावें. हा करार दोन लेंकरें होतपर्यंत कायम असावा, तीं झाल्यावर आई किंवा बाप यांतून ज्यांस त्यांची गरज असेल त्यांनीं तीं घ्यावीं. जर उभयतांसही लेंकरें पाहिजेत तर चार लेंकरें होतपर्यंत करार कायम ठेवावा, आणि एकएकानें तीं सारखीं वांटून घ्यावीं; नंतर करार पुरा करावा. पंडितजींनीं अणखी अशी आज्ञा लावून दिली आहे कीं, जे कोणी नियोगाचा हा विधि भंग करितील त्यांस आर्य-समाजांतून बहिष्कृत करावें.

कित्येक प्रसंगीं ज्यांचे नवरे जीवंत आहेत अशा स्त्रियांस व ज्यांच्या बायका जीवंत आहेत अशा पुरुषांसही नियोग करण्याची मोकळीक दिली आहे.

९. **भूगोलसंबंधी कल्पना.**—यांविषयीं एक उदाहरण:—प्रवास करण्याविषयीं सत्यार्थप्रकाशांत दयानंद असें ह्मणतात कीं, मुनि, ऋषि, व दुसरे श्रेष्ठजन परदेशांस जात असत. व्यासमुनि व त्याचा पुत्र शुकदेव आणि त्याचे शिष्य हे पाताळास ह्मणजे अमेरिकेस जाऊन राहिले होते! ते तेथें असतांना शुकदेवानें व्यासजी यांस ज्ञानाविषयीं कांहींएक प्रश्न केला. तेव्हां व्यासजीनें त्याला हिंदुस्थानांत जनक-पुरास जाऊन तेथील राजास विचारायास सांगितलें. पुढें शुकदेव ज्या ज्या देशांतून गेला त्यांचें वर्णन केलें आहे. तो जातां जातां हरिवर्ष ( हरि=माकड, वर्ष=देश ) माकडांच्या देशास—ह्मणजे ज्या देशचे लोक माकडांसारिखे होते, अथवा ज्यांचीं मुखें तांबडीं व केश उभरंग—अर्थात् युरोपास येऊन पोंचला. युरोपाहून तो हुंडिशास ह्मणजे यहूदी देशास गेला, तेथून चिनास आला, आणि तेथून हिंदु-स्थानास येऊन पोंचला.

शुकदेवानें युरोपांतून हिंदुस्थानास येण्याकरितां अशी गिरकांड्याची

वाट कां शोधून काढिली याचें स्पष्टीकरण करण्यापुरतें दयानंदजींपाशीं भूगोलविद्येचें ज्ञान क्वचितच असेल असें संभवतें.

अणखी त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, कृष्ण जहाजांत बसून अमेरिकेस गेला आणि तेथून उद्दालक मुनीस युधिष्ठिर राजाच्या राजसूययज्ञास बोलाविलें. त्याच काळांतील अर्जुन नामक एका हिंदुस्थानांतील राजानें अमेरिकेस जाऊन अमेरिकेच्या राजाशीं लढाई केली; आणि जेव्हां अमेरिकेच्या राजाचा पराभव झाला, तेव्हां त्यानें उलुपीनामक आपली कन्या अर्जुनास दिली !

१०. **नवीन युक्ति वेदांत सांपडतात अशी दयानंदाची कल्पना.**— दयानंदाविषयीं मोक्ष मूलर असें ह्मणतात कीं,—

" वेदांत सर्व जें कांहीं आहे तें पूर्ण सत्य होतें अशी दयानंदांची समजूत होती इतकेंच नाहीं तर, त्यांचें एक पाऊल याच्याही पुढें पडलें होतें, तें असें कीं, वेदाचा अत्यंत अविश्वसनीय अर्थ करून त्यांनीं आपल्या व दुसऱ्यांच्या मनाची अशी समजूत केली होती कीं, जें कांहीं जाणण्याजोगें आहे त्या सर्वांची व विद्येचे नवीन शोधांची सुद्धां सूचना वेदांत आहे. वाफेचीं यंत्रें, लोखंडी रस्ते, व आगबोटी हीं सर्व वैदिक ऋषींस निदान बीजरूपानें तरी अवगत होतीं; कारण वेद ह्मणजे ईश्वरीज्ञान, तेव्हां त्यापासून कोणती गोष्ट गुप्त राहूं शकेल ? असा त्यांचा वाद होता. " ( *Biographical Essays* ).

दयानंदांस वेदामध्यें लोखंडी रस्ता पुढें सांगितलेल्या रीतीनें सांपडला:—

" श्वेत अश्वं " याचा अर्थ पंडित लोक पांढरा घोडा असा करितात. परंतु दयानंदजींस त्यापेक्षांही कांहीं विशेष त्यांत सांपडलें. त्याचा अर्थ वाफेचा घोडा किंवा वाफ, यास्तव " अश्वी " ( याचा अर्थ एथें विस्तव व पाणी, ह्मणून वाफ ) मध्यें आगगाड्या चालण्याची शक्ति दिसून येते. अणखी " षडाश्व " याचा अर्थ पंडित लोक साहा घोडे असा करितात, परंतु दयानंदजी ह्मणतात कीं, पाणी व विस्तव ठेवण्याच्या गाड्यांचे साहा डबे ! *Rev. H. Forman, The Arya samj* ).

अशाच प्रकारच्या तर्ककोटींनीं दयानंदजींस वेदांत बलून, तोफा वगैरे सांपडल्या.

विद्या व कला यांविषयीं दयानंदजींनीं जें शिकविलें त्यांत हिंदुशास्त्रांतील कल्पना व इंग्लिश लोकांच्या त्याच विषयासंबंधी मूळच्या चुकीच्या कल्पना यांचें कच्चें मिश्रण आहे.

वैदिक कालांत आर्य लोक गोवध करीत असत व गोमांस खात असत, असें आह्मी मागें दाखविलेंच आहे; अर्वाचीन काळचे हिंदु लोक गायीची पूजा करितात, त्यामुळें आपल्या एका देवाचें भक्षण करणें यांत अधर्म आहे असें त्यांस वाटतें. मांसाहाराविरुद्ध दयानंदांची वादकोटी येणेंप्रमाणें होतीः—

दयानंदजींचें गणित असें आहे कीं, एक गायी महिन्यांत सरासरी ८ किंवा $८\frac{१}{२}$ मण दूध देते. या हिशेबानें एका वर्षांत ९९ मण किंवा तिच्या सर्व आयुष्यांत १२०१ मण दूध होतें. इतक्या दुधाचें तूप करून त्यांत योग्य परिमाणानें साखर घातली असतां २५,७४० मनुष्यांस एका दिवसापुरतें अन्न होतें. तर त्या एका गायीचें मांस खाऊन एका दिवसांत जितकीं मनुष्यें तृप्त होतील त्यांची संख्या ह्या संख्येशीं लावून पाहिली असतां किती क्षुल्लक दिसेल! परंतु जर ह्या एका गायीच्या जवळच्या संततीचा उपज ह्या उपजांत मिळवाल तर ही तुलना विशेष बळकट होऊन तिच्यापासून निघणारा सिद्धांतही तसाच दृढ होईल. अशी कल्पना करा कीं, ह्या गायीला १३ वांसरें आहेत व त्यांपैकीं एक लहानपणींच मरण पावलें, बाकी उरलीं ६ गायी व ६ बैल. हीं सर्व उपज देणारीं जनावरें होत. त्या ६ गायींच्या दुधावर १,५४,४४० मनुष्यांचें पोषण होईल. आणि ६ बैलांच्या जन्माच्या कष्टानें जें धान्य उत्पन्न होईल त्यावर दर माणसीं ३ पाव ह्या हिशेबानें २,५६,००० मानवी सैन्याचें पोषण होईल. याप्रमाणें एका गायीचा जीव वांचविला असतां ४,१०,४४० मनुष्यांची क्षुधा शांत करण्यापुरतें अन्न उत्पन्न होतें. हेंच गणित पंडितजी बकरीं व मेंढरें यांविषयीं करितात.

हा तर्कवाद अयुक्तिक आहे हें सहज दाखवितां येतें. एका गायीच्या मांसावर जितक्या मनुष्यांचा चरितार्थ चालेल त्यांच्या संख्येशीं दयानंदजी कांहीं गायी व बैल यांच्या संख्येची तुलना करितात खरें, परंतु

तितक्या गायी बैलांस वाढायास जो काळ लागतो, व चरायास जी जमीन लागती तिचा हिशेब ह्या तुलनेंत धरिला नाहीं. दयानंदजींच्या गणिताप्रमाणेंच एका गायीचे मांसावर त्यापेक्षांही जास्ती मनुष्यांचें पोषण होतें हें सिद्ध करून देतां येईल. असें समजा कीं, एका गायीचें मांसाचें अन्न तीस शेर गव्हांच्या अन्नाबरोबर आहे, आणि एक शेर गहूं पेरल्यानें १० शेर गहूं उत्पन्न होतात.

| | | |
|---|---|---|
| पेरले | ३० | शेर. |
| १ लें पीक | ३०० | ,, |
| २ रें ,, | ३,००० | ,, |
| ३ रें ,, | ३०,००० | ,, |
| ४ थें ,, | ३००,००० | ,, |
| ५ वें ,, | ३०००,००० | ,, |
| ६ वें ,, | ३०,०००,००० | ,, |
| | ३,३३,३३,३०० | |

दररोज एक शेर दाण्याचा खर्च धरिला, तरी ६ पिकांपासून जें धान्य उत्पन्न होईल तें ४ लक्षांपेक्षां जास्त मनुष्यांस पुरेल इतकेंच नाहीं, तर त्याकडून तीन कोटींहून जास्ती मनुष्यांचें पोषण होईल, आणि इतकें सर्व एक गायी खाल्ल्यापासून !

**बैबलाची परीक्षा.**—दयानंद ह्यांनीं वेदाचा मूळ अर्थ सोडून ओढून ताणून भलताच अर्थ केला, तेव्हां ख्रिस्ती शास्त्राचाही तसाच अर्थ त्यांनीं करावा यांत आश्चर्य नाहीं. याविषयींचीं एक दोन उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

शाब्बाथवार पवित्र पाळावा व त्याला देवानें आशीर्वाद दिला असें बैबलांत सांगितलें आहे. यावर दयानंद असें ह्मणतात कीं, "त्यानें (देवानें) आदितवाराला आशीर्वाद दिला तर सोमवाराला व इतर वारांला काय केलें ? त्यानें त्यांस शाप दिला असावा. शहाणा मनुष्य देखील असें करणार नाहीं, तर देव कसें करील !"

याप्रमाणें शास्त्रवचनांवरून निराधार निर्णय केले आहेत इतकेंच नाहीं, तर ज्या वचनांत जें सांगितलें नाहीं तें त्यांत आहे असेंही

दयानंद दाखवितात. उत्प. ३१.३०. यांत लाबानानें याकोबाला असें विचारिलें कीं, "तूं माझे देव कां चोरिलेस ?" परंतु ही ओवी दयानंदांनीं अशा रीतीनें उतरून घेतली आहे कीं, हा प्रश्न लाबानानें नव्हे तर जणू देवानें केला आहे, असें भासवून पुढें अशी शंका घेतली आहे कीं, ख्रिस्ती लोकांचा देव देखील दगडांचे देव कबूल करितो, नाहींपेक्षां देव चोरल्याविषयीं तो कशाला बोलता ?

दयानंद ख्रिस्तीधर्माचा जो द्वेष करीत होते तोच त्यांच्या अनुयायांमध्यें परंपरेनें चालत आहे. इंग्लंडांत सेक्युलारिस्ट नामक हलकट व अर्धवट शिकलेले लोक आहेत, ते हिंदुस्थानांतील चार्वाकच होत. ते ईश्वराचें अस्तित्व अथवा परलोक मानीत नाहींत. ते सर्व धर्मांचा उपहास करितात, व विशेषेंकरून ख्रिस्ती धर्माची नकल करून दाखविण्याचा यत्न करितात, व हलकट भाषणांनीं त्यावर हल्ला करितात. आर्यसमाजींस अज्ञानानें असें वाटतें कीं, ह्या लोकांनीं ख्रिस्तीधर्माविरुद्ध लिहिलेलीं पुस्तकें निरुत्तर आहेत. त्यांनीं त्यांतून कित्येकांचें देशीभाषेंत भाषांतरही केलें आहे. त्यांत ज्या शंका आहेत त्या अठराशें वर्षांपासून लोकांस माहीत आहेत; परंतु त्यांचें एकंदर लक्षण पाहतां त्यांत ख्रिस्ती धर्माचा गैरवांका दाखविला असून त्यांत कांहीं जीव नाहीं.

साधारणतः युरोपांत ह्या सेक्युलारिस्ट लोकांस तुच्छ मानितात. बहुत काळापूर्वीं एका ज्ञानी पुरुषानें असें ह्मटलें आहे कीं, "निंदक ज्ञान शोधितो, परंतु तें त्यास सांपडत नाहीं." संस्कृत ग्रंथ लिहिणारे एकादा विषय हातीं घेण्याचे पूर्वीं त्या विषयाचा अभ्यास करण्यास कोण "योग्य" असा प्रायः विचार करितात. न्यायसूत्रवृत्तिनामक ग्रंथांत विश्वनाथ भट्टाचार्य हे ह्मणतात कीं, 'जे सत्यार्थी आहेत तेच वाद करण्यास योग्य आहेत.' हें त्यांचें ह्मणणें वाजवी आहे. सत्य जाणण्याची इच्छा असल्यावांचून सर्व वादविवाद व्यर्थ आहे.

आर्यसमाजी सेक्युलारिस्ट लोकांचे ख्रिस्ती धर्माविरुद्ध हल्ल्यांचा आनंदानें उपयोग करितात, तरी त्यांनीं खूप समजावें कीं, जशी ते लोक बैबलाची थट्टा करितात तशीच आर्यलोकांच्या आस्तिक बुद्धीचीही ( देवावरील विश्वासाची ) करितात. ते दोघांचेही वैरी आहेत.

**आर्यसमाजाचें पुढें काय होईल ?** हिंदू लोकांस खुशामत फार आवडते. साधारण मनुष्यास देखील " महाराज, " " रावसाहेब " असें ह्मणतात ! आपले धर्मग्रंथ अनादि आहेत व त्यांत सर्व ज्ञानाचें बीज आहे अशा विचारानें लोकांचा दिमाख खुलतो. याशिवाय दयानंदांनीं हिंदुधर्मीतील कित्येक स्थूल गोष्टींचा त्याग केला होता. आर्यसमाजाविषयीं मोक्ष मूलर यांनीं जें भाकीत केलें आहे तें बहुधा खरें होईलसें दिसतें:—" दयानंदांनीं जें हें उदारबुद्धीचें हिंदुशास्त्रानुयायितेचें मत काढलें आहे तें कांहीं काळ चालेल; परंतु पश्चिमेकडील विचारांचा व विशेषेंकरून पाश्चिमात्य विद्वत्तेचा त्याला विशेष संस्कार घडला ह्मणजे त्याचा लोप होण्याचा विशेष संभव आहे. "

आर्यसमाजाविषयीं इंग्रजींत " The Arya Samaj, its Teachings and an Estimate of It " या नांवाचें एक पुस्तक रेव० एच. फोरमन यांनीं लिहिलें आहे, त्यांतून वरील मजकूर घेतला आहे. तें अलाहाबाद येथील नार्थ इंडिया ट्राक्ट सोसैटीनें प्रसिद्ध केलें आहे. त्याची किंमत एक आणा आहे.

## सिंहावलोकन.

वैदिक धर्माच्या गुणदोषांची ही जी आह्मी परीक्षा केली आहे तिच्यावरून ज्या गोष्टी निर्णित होतात, त्या सांगण्यापूर्वी सांप्रतकाळांत ज्या खोट्या स्वदेशप्रीतीचा लोक फार अभिमान बाळगितात, व जी हिंदुस्थानांत सुधारणा व खरी उन्नति होण्यास मोठी प्रतिबंधक आहे तिच्याविषयीं थोडीशी चर्चा केली पाहिजे.

खरी व खोटी स्वदेशप्रीति यांचा भेद संसारांतील गोष्टींच्या दाखल्यावरून दाखवितां येतो.

कोणी बाप आपल्या लेकरांचा मोठा अभिमानी आहे. त्याला वाटतें कीं, माझीं मुलें इतकीं हुशार आहेत कीं, त्यांस कोणी शिकवायास नको. तो त्यांस दुसऱ्या मुलांमध्यें मिळूं देत नाहीं, तेणेंकरून तीं जशीं जशीं मोठीं होतात तसा त्यांचा दिमाख वाढतो. त्याला अणखी असें वाटतें कीं तीं आपल्यापेक्षांही फार शहाणीं आहेत; आणि आपण अज्ञानी असल्यामुळें त्यांचीं पोरकट भाषणें तो ऋषिवचनांप्रमाणें मानितो.

17

दुसरा एक बाप आहे तोही आपल्या लेंकरांवर प्रीति करितो. परंतु त्याचें वर्तन निराळें आहे. तो त्यांच्याकरितां शिक्षक ठेवितो; आणि त्यांच्यासारिखीं दुसरींही मुलें हुशार आहेत असें त्यांनीं समजावें ह्मणून तो त्यांस त्यांच्याबरोबर शिकूं देतो. तो त्यांचें भाषण ऐकून संतुष्ट होतो, तरी तीं फार शहाणीं आहेत असें तो मानीत नाहीं. तर त्यांपासून आपण शिकण्यापेक्षां आपल्यापासून त्यांनीं शिकावें अशी इच्छा बाळगितो.

हे दोघे बाप आपापल्या मुलांवर सारखीच प्रीति करूं शकतील, परंतु एकाच्या प्रीतीचा वाईट परिणाम घडेल व दुसऱ्याचा चांगला घडेल. याचप्रमाणें खोटी व खरी स्वदेशप्रीति आहे.

सर्व राष्ट्रांत व सर्व काळांत असा एक चुकीचा समज चालत आहे कीं, जे लोक फार प्राचीनकाळामागें होऊन गेले तेच मोठे शिष्ट व मोठे ज्ञानी होते, आणि आतां जे लोक आहेत ते केवळ लेंकरांसारिखे अज्ञान आहेत. परंतु वास्तविक पाहतां याच्या उलट स्थिति आहे. **आह्मी वृद्ध आहों;** जे बहुतकाळामागें होते ते लेंकरें होतीं. आतांचें जग पूर्वीच्या जगापेक्षां हजारों वर्षांनीं वडील आहे.

वैदिक काळांत पुस्तकें नव्हतीं, आणि छापण्याची कळा माहीत नव्हती. पृथ्वीच्या कोणत्याही भागांत जो २५०० वर्षांत ज्ञानसंग्रह झाला तो सर्व आतां आमच्यापाशीं आहे. इतक्या काळांत लक्षावधि विद्वान लोक आमच्या विद्याभांडारांत भर पाडीत आले आहेत. कोणताही नवीन शोध लागला ह्मणजे लागलीच तारायंत्राच्या द्वारें व वर्त्तमानपत्रांच्या योगें सर्व सुधारलेल्या जगास त्याची प्रसिद्धि होते.

प्रौढ मनुष्य आपल्या बाळपणांतल्यापेक्षां शहाणा आहे ह्मणून त्याची कोणी तारीफ करीत नाहीं. सांप्रतची पिढी पूर्वीच्या सर्व युगांची वारीसदारीण असून काळाच्या अगदीं पुढल्या रांगेंत असली पाहिजे.

खोटा स्वदेशाभिमान बाळगून कित्येक हिंदु लोक आपल्या देशांतील सर्वच कांहीं चांगलें आहे असें ह्मणतात. सर टि. माधवराव हे अर्वाचीन हिंदुलोकांमध्यें मोठे नामांकित पुरुष होऊन गेले, त्यांनीं आपल्या लोकांच्या कल्याणार्थ पुष्कळ कळकळ दर्शविली. ह्या विषयाच्या संबंधानें ते एक खरें तत्त्व प्रगट करितात. ते ह्मणतात कीं,

**'जें कांहीं सत्य नाहीं तें स्वदेशाभिमानयुक्त असूं शकत नाहीं.'** जो मनुष्य एखादी गोष्ट खोटी असून ती राष्ट्रीय आहे ह्मणून तिचा पक्ष धरून भांडायास उठतो तो मोठ्या वाईट स्वदेशशत्रूंपैकीं आहे असें समजलें पाहिजे.

आमच्या वाचकांस माहित असेलच कीं, हिंदुधर्माप्रमाणें राहुकेतूंच्या योगानें ग्रहणें लागतात, आणि घृत, मधु, क्षीर इ० सागरांनीं वेष्टित असा मोठा मेरू पर्वत पृथ्वीच्या मध्यभागीं आहे. बरें, त्यांला कदाचित् असें वाटत असेल कीं, अशा असमंजस गोष्टी जरी राष्ट्रीय आहेत, तरी त्यांचा पक्ष धरून बसणें हें योग्य नव्हे. त्याचप्रमाणें खोट्या धर्ममतांचा अभिमान धरून बसणें हेंही अयोग्य असून त्यापेक्षांही भयावह आहे. काशी एथील राजाच्या घराण्याचा मुद्रालेख फार उमदा आहे, तो हा कीं, "सत्यापरता दुसरा धर्म नाहीं," सत्याचाच शोध केला पाहिजे. तेंच इतर सर्व गोष्टींपेक्षां श्रेष्ठ आहे असें शेवटीं ह्मणावें लागेल.

**वेदाविषयीं लोकमतें.**— दोन वर्गांचे लोक वेदाविषयीं अत्यंत सन्मान्यबुद्धि बाळगितात. पहिला वर्ग, ज्यांस वेदांत काय आहे हें मुळींच ठाऊक नाहीं तो; ह्या वर्गांत हिंदुस्थानांतील शिक्षित व अशिक्षित असे पुष्कळ लोक आहेत. लाटिन भाषेंत एक ह्मण आहे कीं, ज्याविषयीं आपण अज्ञान आहों तें कांहीं तरी मोठें असावें असें आपण मानितों, ह्या ह्मणीप्रमाणें वेदांत काय आहे हें न जाणून त्यांचें त्यांस मोठें महत्व वाटतें. दुसरा वर्ग, ज्यांस वेदावांचून अणखी कांहींच ठाऊक नाहीं तो. अशा प्रकारचे आडांतील बेडकांसारखे पंडित व दयानंदासारिखीं मनुष्यें हीं होत. दयानंद ह्मणत असत कीं, वेदांत जें कांहीं मिळत नाहीं तें खोटें किंवा निरूपयोगी होय; आणि जें कांहीं वेदांत आहे तें निर्विवाद सत्य आहे.

बुद्धिमान हिंदुलोकांनीं वेदाविषयीं जो निर्णय केला त्याचें वर्णन मोक्ष मूलर यांनीं येणेंप्रमाणें केलें आहे:—

"राममोहनरायाचे मित्र सर्वदा प्रामाणिक व कोणाला न भिणारे होते. त्यांनीं कित्येक तरूण विद्यार्थ्यांस काशीस वेद शिकायास व त्यांत काय मतलब आहे तो येऊन सांगायास पाठविलें. त्यांच्याक-

डून वेदांविषयींची हकीकत समजल्याबरोबर ब्रह्मसमाजाचे मुख्य देवेंद्रनाथ टागोर यांनीं एकदम असें ह्मटलें कीं, ' वेद हे प्राचीनकाळचें अवशेष समजून जरी पूज्य मानिले तरी त्यांजमध्यें इतक्या पोरकट, भ्रामक, व अशक्य गोष्टी आहेत कीं, ते ईश्वरदत्त आहेत असें ह्मणण्यास कांहींच प्रमाण नाहीं." (Biographical Essays.)

कलकत्ता एथील प्रेसिडेन्सी कालेजाचे माजी प्रिन्सिपाल मि० के. के. भट्टाचार्य Tagore Law Lectures नामक व्याख्यानांच्या पाठांत वैदिक कालाच्या सहस्र वर्षांचें वर्णन येणेंप्रमाणें करितातः—" तो काल शून्य अरण्य आहे. त्यांत संचार करितांना दूर दूरच्या अंतरावर दुराचरणोपहासक कवितेची किंचित् झगमग किंवा विलक्षण बुद्धिविलास हीं दृष्टीस पडल्यानें मात्र श्रमपरिहार होऊन मनाचें उपशमन होतें."

ज्यांनीं वेदाचें सायनभाष्यासहित प्रकाशन करण्यांत आपलें पुष्कळ आयुष्य खर्चिलें असे जे प्रोफेसर मोक्ष मूलर ते त्याविषयीं तुच्छ बुद्धि बाळगितील असें नाहीं, तर उलटी पूज्य बुद्धि धरण्याजोगे आहेत, तरी त्यांनीं त्याच्या योग्यतेचें कसें वर्णन केलें आहे तें ऐकावेंः—

" ज्या विद्वानांनीं वेदांच्या मूळ संहितेचें प्रकाशन करण्यांत अथवा त्यांच्या कित्येक ग्रंथांचा जपून अर्थ करण्यांत आपलें सर्व आयुष्य घातलें आहे, त्यांनीं उकिरड्याच्या ढिगारांतून चोख सोन्याचा एक एक तुकडा बाहेर काढल्यावर तें धन मात्र जनास दाखविण्याकडे त्यांचा जितका कल असतो तितका ज्या कचऱ्यांत ते तुकडे सांपडले तो लोकांच्या दृष्टीपुढें ठेवण्याची त्यांची इच्छा नसते. ह्याबद्दल मी त्यांस दोष लावीत नाहीं. कदाचित् माझ्या पदरीं हाच दोष येईल असें मला वाटावें; कारण ज्या विद्वानांस अरण्यांत एकादें मधुर फळ किंवा सुवासिक फूल सांपडतें त्यांस वाटेंत जीं कांटेरी झाडें व कांटे उपटून बाजूस टाकून द्यावीं लागलीं असतील तीं आपल्या आनंदांत विसरून जाणें हें साहजिक आहे." ( Sacred Books of the East नामक ग्रंथमालिकेची प्रस्तावना. पृ० १० )

" इतिहासदृष्ट्या वेदांचा प्रत्यवाय कमी आहे असें ह्मणतां येत नाहीं, परंतु त्यांचे अंगभूत गुण, आणि विशेषेंकरून त्यांतील विचारांचें सौंदर्य किंवा थोरवी यांची बहुतजणांनीं फाजील वाखाणणूक केली आहे. वेदांतील पुष्कळ सूक्तें अतिशय पोरकट आहेत. तीं कंटाळवाणीं, अप्रौढ, साधारण विचाराचीं अशीं आहेत. उपासकांनीं आपलें रक्षण व्हावें, आपणास अन्न मिळावें, गुरांढोरांचे कळप मिळावे, आपल्यास पुष्कळ संतति व्हावी व दीर्घायुष्य मिळावें ह्मणून आपल्या देवांच्या सतत प्रार्थना केल्या आहेत. आणि हे सर्व लाभ मिळण्याकरितां रोज रोज किंवा वर्षांतील अमुक ऋतूंत जे यज्ञ व स्तुति करीत तीं त्या देवांस बक्षीसदाखल देत असत. परंतु अशा प्रकारच्या केरकचऱ्यांत कांहीं अमोल्य रत्नें गुप्त आहेत. "

" मी तुह्मास पुनः आठवण देऊन सांगतों कीं, वेदांत पुष्कळ पोरकट व मूर्खपणाचा विषय आहे. खरोखर वाईट व बाध्य असेंही थोडें आहे. त्याचे कित्येक कवि ( ऋषि ) देवांवर अयोग्य अशा भावनांचा व विकारांचा आरोप करितात; ह्मणजे त्यांच्या ठायीं क्रोध, सूड घेण्याची बुद्धि, यज्ञद्रव्य सेवन करण्याची अति आवड, इ० तसेंच ह्या कवींच्या वर्णनांत मनुष्यस्वभाव स्वार्थी व प्रापंचिक अशा हलक्या प्रतीचा दर्शविला आहे. बहुतेक मंत्र केवळ अर्थहीन व असार आहेत, आणि अंतःकरणापासून निघालेल्या भावना व ज्यांत आपणासही मिळतां येईल अशा प्रार्थना कोठें कोठें सांपडण्यासाठीं, मोठ्या दमानें शोध केला पाहिजे. " (Lectures on the Vedas.)

जीं सूक्तें मासल्यासाठीं ह्या पुस्तकांत उतरून घेतलीं आहेत, तीं, जीं फारच हांशिलाचीं आहेत त्यांपैकीं आहेत, त्यावरून एकंदर सूक्तांविषयीं साधारण कल्पना करितां येणार नाहीं. वैदिक सूक्तांत विषयांच्या चर्वितचर्वणास व पुनरुक्तीस तर अंतच नाहीं. एका देवाची स्तुति करितांना त्याला जीं विशेषणें दिलीं आहेत व जे अलंकार योजिले आहेत तेच पुनःपुनः दुसऱ्या देवांविषयीं योजिले आहेत. "आह्मांस संपत्ति दे" ही प्रार्थना तर वेदांच्या बहुतकरून सर्व सूक्तांमध्यें आहे.

वेद कोट्यावधि वर्षांच्या पूर्वी ब्रह्मदेवाच्या मुखांतून निघाले असें जें हिंदुमत तें पुढील प्रमाणांवरून खोटें ठरतें.

१. पुष्कळ सूक्तांचे ऋषि तीं सूक्तें आपण रचिलीं असें स्पष्ट ह्मणतात. आणि हीं सूक्तें आर्य लोक हिंदुस्थानांत प्रवेश करीत असतां रचिलीं असें त्यांतच प्रमाण सांपडतें.

ह्याविषयीं (पृ० १६,२२) इतक्या विस्तारानें व स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे कीं त्याची एथें पुनरुक्ति करण्याचें अगत्य नाहीं.

२. त्यांत देवाविषयीं जे हलके विचार आहेत त्यांवरून तीं ईश्वरप्रणित नव्हेत असें सिद्ध होतें.

वेदांत अनेकदेवमत आहे याविषयीं कांहीं संशय नाहीं. परंतु ज्या अर्थी या काळांत सर्व विचारवंत मनुष्यें एकदेवमत कबूल करितात त्या अर्थी वेदांतले 'तीन पट अकरा' देव ह्मणजे एकच देव असें दर्शविण्याचा वेदाभिमानी लोक प्रयत्न करितात.

आर्यलोकांनीं आपल्या देवांची कल्पना आपल्या गुणांवरून बसविली. जसे ते एकमेकांशीं देण्याघेण्याची बोली करीत त्याप्रमाणें ते आपल्या देवांशीं करीत. ते त्यांचें आर्जव करीत; ते त्यांस गोडगोड पदार्थ अर्पण करून आमच्याशीं बरेपणानें वागा असें त्यांस सांगत. त्यांस स्वतां सोमबीर आवडत असे, ह्मणून ती इंद्रासही आवडते असें त्यांस वाटे. जसा दारूबाज मनुष्य दारूच्या वासानें मोहित होतो तसा इंद्र कोणी सोम तयार करीत आहे असें समजतांच आपल्या रथावर चढून त्या ठिकाणीं त्वरेनें येत असे. क्षणभर असें माना कीं, इंद्राला सोम प्रिय होता, तर ह्या स्वर्गीच्या राजास एखाद्या आर्य शेतकऱ्याच्या घरीं आल्याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं तो मिळत नसे काय? एका मंत्रांत असें ह्मटलें आहे कीं, "लादलेल्या घोड्यास काढणीनें धरून आणितात त्याप्रमाणें उपासक इंद्राला सोम पिण्याकरितां त्वरेनें धरून आणितो."

[जसे ह्या काळांतील हिंदु लोक संकटसमयीं एका देवाचा धांवा करीत असतां तो आपल्या धांव्यास धांवत नाहीं असें वाटल्यावरून त्याला सोडून दुसऱ्या व तिसऱ्या अशा अनेक देवांचा धांवा करितात त्याप्रमाणें वैदिक काळांतील आर्य लोक करीत असत. याविषयीं उदाहरणार्थ ऋग्वे. १. १०५ पाहा, हें सगळें सूक्त अशा अर्थाचें आहे.

यांतील १० व्या मंत्राचा भावार्थ वेदार्थयत्नकर्त्यांनीं येणेंप्रमाणें टीपेंत दिला आहे—"यांत ऋषीचा भावार्थ असा दिसतो कीं, हे जे पंच महाप्रबळ देव (इंद्र, वरुण, अग्नि, अर्यमा, आणि सविता किंवा दुसरे कोणी ९) या विस्तीर्ण द्युलोकाच्या मध्यें असतात आणि जे देव मी स्तोत्र ह्मणूं लागलों ह्मणजे नित्य येत असतात, ते आज मी स्तोत्र ह्मणत असतांही आणि मला संकट प्राप्त झालें आहे तरी मजकडेस न येतां आणि मला सहाय्य न करितां आपापलीं स्थानें सोडून गेले आहेत, आणि अदृश्य झाले आहेत. यास्तव द्यावापृथिवीहो, तुह्मी मात्र मला दिसत आहां, तर **तुह्मी तरी** ही माझी प्रार्थना ऐकून घ्या आणि मला पावा". हें "तुह्मी तरी" ह्या सूक्तांतील प्रत्येक मंत्रांत आहे.]

३. वैदिक सूक्तांत प्रापंचिक विषय भरले आहेत त्यांवरून त्यांची उत्पत्ति कोणापासून आहे हें दिसून येतें.

बिशप काल्डवेल ह्मणतात कीं, "जर कोणी वैदिक सूक्तें पहिल्यानेंच वाचील त्याला तर त्यांत जी साधारणतः प्रपंचलुब्धता, नीतिशून्यता, व परमार्थहीनता भरली आहे ती पाहून मोठें आश्चर्य वाटेल." रेव० के. एस. माकडोनाल्ड ह्यांचाही असाच अभिप्राय आहे:—

"वेदामध्यें मनुष्यप्राणि हा स्वभावतः ह्या जगापुरता मात्र आहे असा बहुधा विचार केला आहे. तो सर्वदा ह्या संसारांत गुंतलेला आहे, ह्मणजे जें कांहीं तो पाहतो, ऐकतो, चाखतो, स्पर्शितो त्यांतच तो निमग्न आहे असें त्याचें वर्णन दृष्टीस पडतें. विस्तवाची धगधग, विजेची झकाक, वादळाची गर्जना, वाऱ्याचा सुसाट, पावसाचें कोसळणें, सूर्याचा उदयास्त, पहाटेचें उगवणें, व दिवसाची रणरण; त्यांच्या गाई, उंट, पुत्र आणि घोडे यांची संख्या; त्यांच्या शत्रूचीं गांवें जाळून उद्वस्त करणें, आणि लूट घेऊन जाणें, दस्यु व राक्षस यांचा वध आणि अधिक पुत्र व गुरें ढोरें मिळण्याकरितां, आणि शत्रूची अधिक कत्तल होण्याकरितां इंद्र व अग्नि यांस घृत व सोम अर्पण करणें; ह्या व अशाच दुसऱ्या गोष्टी करणें हेंच कायतें मनुष्याचें कर्तव्य होतें, असें ऋग्वेदावरून दिसून येतें. वास्तविक पाहिलें असतां वेदांतच काय पण सर्व हिंदुधर्मांत मनुष्याचे कर्तव्याविषयीं शुद्ध कल्पना ह्मणून मिळत नाहीं."

ऋषींविषयीं ह्मटलें असतां आपणास विशेष चांगली अपेक्षा उत्पन्न होते, परंतु वास्तविक पाहतां ते साधारण लोकांप्रमाणेंच प्रापंचिक होते. त्यांच्या बहुतेक सूक्तांत संपत्तीविषयीं प्रार्थना आहेत. त्यांचे कांहीं मासले खालीं दाखविले आहेत.

पनवत्सनामक ऋषि अशी प्रार्थना करितो कीं, " हे मरुतहो, जो ऋषि तुमचें भजन करितो आणि ( धनार्थ ) तुमची याचना करितो त्याकडे तुह्मी केव्हां याल ! "

वत्सऋषीची प्रार्थना : – " नासत्यहो, घृतानें थपथपीत असें नाना-प्रकारचें अन्न ज्या वत्सऋषीनें तुह्मा उभयतांचें स्तोत्रेंकरून महत्व वर्णिलें आहे त्याला द्या. हे औदार्याचे प्रभूहो, तो सुखप्राप्तीकरितां तुमची स्तुति गात आहे. तो संपत्तीची इच्छा बाळगीत आहे."

ऋषि वनांत, गुहेंत किंवा पर्णकुटींत राहत नसत. एक ऋषि अशी प्रार्थना करितो कीं, "आह्मी मरुत, अश्वी, मित्र व वरुण ह्या दैवीरक्ष-कांपाशीं आमच्या कल्याणासाठीं एक मोठें विस्तीर्ण गृह मागतों. मित्र, अर्यमान, वरुण, मरुत हो, आह्मास निर्भय, उत्तम व चांगलें वसलेलें असें त्रिगुणात्मक आश्रयस्थान द्या."

दुसरा एक ऋषि इंद्राशीं असा वाद करितो कीं, " हे इंद्रा, जर मी तुझ्यासारिखा एकलाच धनाचा स्वामी असतों तर माझी स्तुति गाणारा गोधनसंपन्न असता."

अणखी एक ऋषि पुषाण देवानें आपल्यास सर्व कामांत संभाळावें इतकेंच नाहीं, तर पुष्कळ तरुण स्त्रियाही द्याव्या असें मागतो. ( ऋग्वे० ९.६७ )

वैदिक ऋषि धनसंपत्ति मिळण्याकरितां प्रत्यक्ष आपल्या देवांचीच प्रार्थना करीत असें नाहीं, तर जे त्यांस दक्षिणा देत त्यांच्यासाठीं देवांचा आशीर्वाद मागून व जे देवांस अर्पण वाहत नसत त्यांच्यावर शाप उच्चारून ती मिळविण्यास पाहत. [ ह्मणजे ह्या काळांत भट यजमानास आशीर्वाद देऊन दक्षिणा मिळवितात त्याप्रमाणें ] :—

" देवहो, जो धनसंपन्न राजा मला गाशासुद्धां ठिपकेदार गाई दान देतो तो कधीं नाश न पावो. '

"ह्या मनुष्याची आतां वृद्धि होवो; जो एकाच वेळीं एक लक्ष घोडा उदारपणें देतो तो कौंबाप्रमाणें वर वाढो."

"जो हवि देत नाहीं, तो कितीही बळकट असला तरी इंद्र त्याचा वध करणारा आहे."

पुढील उताऱ्यावरून कित्येक ऋषींनीं लबाडी तरी केली असावी, किंवा अत्यंत मोठीं दानें घेतलीं असावीं असें ह्मणावें लागतें. अम्मातिथि नामक ऋषि ह्मणतो कीं,

" अश्विनीहो, माझ्या अलीकडील दानाविषयीं ह्मणजे चिद्वीचा पुत्र कशु यानें मला शंभर उंट व दहा हजार गायी कशा दान दिल्या याविषयीं माहिती करून घ्या. चिद्वीचा पुत्र ज्यानें मला दहा राजे चाकरादाखल दिले तो सुवर्णासारिखा देदीप्यमान आहे, कारण सर्व मनुष्यें त्याच्या पायांखालीं आहेत. (तो हे राजे लढाईंत पाडाव करून माझ्या सेवेसाठीं मला देतो.)" ऋग्वे० ८. ५.

देवातिथि ऋषि ह्मणतो कीं,

" म्यां ऋषीनें मागाहून पूर्ण दान घेतलें. कण्वाचा धार्मिक पुत्र आणि नवशाली प्रियमेध यांच्या भक्तीकडून ६०, ००० शुद्ध गुरें मीं मिळविलीं. हें दान मी ग्रहण केल्यावर वृक्ष देखील महोच्चार करून ह्मणाले, (पहा हे ऋषी,) यांनीं उत्तम गायी मिळविल्या आहेत!" (—८.४)

४. सर्व मनुष्यें परस्परांचे बंधु आहेत असें वेदांत सांगितलें नाहीं. रेव० के. एस. माकडोनाल्ड साहेब ह्मणतात कीं,

" ऋषीचें क्षितिजाची मर्यादा त्याच्या पुरतीच आहे. तो आपल्या बायकोच्या किंवा मुलांच्या सुखाकरितां प्रार्थना करीत नाहीं, अथवा आपल्या गांवासाठीं किंवा कुळासाठीं आपल्या देवांपाशीं कांहीं मागत नाहीं; तो आपल्या राष्ट्राकरितां किंवा देशबांधवांकरितां याचना करीत नाहीं. त्यानें दुसऱ्याच्या दुःखाकडे डोळेझांक केली आहे. तो समसुखदुःखी आहे असें दिसत नाहीं."

परंतु या नास्तिपक्षापेक्षांही अधिक वाईट असें त्या ऋषींविषयीं ह्मणावें लागतें. ख्रिस्ती धर्म असें सांगतो कीं, " जशी तूं आपणावर प्रीति करितोस तशी आपल्या शेजाऱ्यावर कर." आह्मी आपल्या शत्रूंची क्षमा करावी व त्यांच्यासाठीं प्रार्थना करावी. येशू ख्रिस्त ह्मणतो कीं. " आपल्या शत्रूवर प्रीति करा, जे तुमचा द्वेष करितात त्यांचें बरें करा,

आणि जे तुह्मास गांजितात व तुमच्या पाठीस लागतात त्यांच्या-साठीं प्रार्थना करा. ”

आर्यांनीं केवळ अनार्य लोकांस बंधूप्रमाणें मानिलें नाहीं इतकेंच नाहीं, तर कित्येक आर्य कुळांस देखील त्यांनीं शत्रुवत् मानिलें; त्यांचा नाश व्हावा व त्यांची संपत्ति आपणास मिळावी इतकीच काय ती त्यांच्याविषयीं त्यांची इच्छा होती.

“ हे धार्मिकाच्या प्रभो, आमच्या आर्य ( जातीय ) शत्रूस मारून टाका, आमच्या दस्यु ( जातीय ) शत्रूस मारा, आमच्या सर्व द्वेष्टयांचा नाश करा.”

“ जे हवि अर्पण करीत नाहींत व जे तुला हर्षित करीत नाहींत, ते जरी नाश करायास कठीण आहेत तरी त्या सर्वांस मार; त्यांचें सर्व धन आह्मांला दे; उपासक त्याची अपेक्षा करितो.

“ वेल वाढलेल्या जुन्या झाडाप्रमाणें समूळ उपटून टाक; दस्यूंचें बळ जिंक, त्यानें संग्रह केलेल्या धनाचा वांटा इंद्राबरोबर आह्मास मिळो.”

९. वेदांमध्यें तारणाविषयीं समाधानकारक कांहीं मार्ग दाखविला नाहीं.

रेव० के. एस. माकडोनाल्ड साहेब ह्मणतात कीं, “ मनुष्याविषयीं ईश्वराची इच्छा काय आहे ती मनुष्यास कळविण्याविषयीं, अथवा मनुष्याचीं ईश्वरसंबंधी कर्तव्यें किंवा परस्परांविषयीं कर्तव्यें काय आहेत तीं कळविण्याविषयीं, ईश्वरानें, किंवा अनेक देवांनीं, किंवा एकाद्या देवानें कोणत्याही ऋषीला आज्ञा दिल्याचें मला तर वेदांत कोठें अढळलें नाहीं. तसेंच मनुष्य कोठून आला व कोठें जाणार, अथवा त्याचा इहलोकीं व परलोकीं परमार्थ काय आहे याविषयीं कोणाला कांहीं सप्रमाण निवेदन करण्याचा अधिकार मिळाला असेंही कोणी ह्मणत नाहीं.

सुखप्राप्तीकरितां सोमरस अर्पिणें व यज्ञ करणें हींच साधनें लावून दिलीं होतीं. परंतु अशा उपायांनीं सांप्रतकाळीं कोणत्याही विचारी पुरुषाचें समाधान होणार नाहीं.

**वेदांतील सत्यता.**—वरील विचारांवरून वेद हे ईश्वरप्रणित नव्हेत ---ं जरी सिद्ध होतें, तरी वेदांत असत्याच्याबरोबर कित्येक महत् ...हेत. तीं स्पष्ट किंवा छायारूपानें अस्पष्ट रीतीनें दर्शविलीं

१. प्रार्थना.—आर्य हे त्यांच्या रीतीप्रमाणें प्रार्थना करणारे लोक होते. आपण देवाच्या आधीन आहों असें ते रोज रोज कबूल करीत, व त्यांजपाशीं सर्व प्रकारच्या कल्याणकारक वस्तु मागत. ही गोष्ट किता घेण्याजोगी आहे.

२. स्तुति.—आर्य लोक आपल्या देवांचीं कर्मे वर्णून त्यांची स्तुति करीत. उपकारस्तुति करण्याची ही भावना अत्यंत प्रशंसनीय होय.

३. वेदांत ईश्वराची सर्वज्ञता मान्य केली आहे.—देवनिंदक लोकांनीं असें ह्मटलें आहे कीं, "देव कसा जाणतो आणि परात्पराच्या ठायीं ज्ञान आहे काय?" परंतु वेदांत असें सांगितलें आहे कीं, वरूणाला मनुष्याचे डोळे मिटणें व उघडणें देखील समजतें.

४. पापस्वीकार.—वेदांमध्यें ही गोष्ट वारंवार दृष्टीस पडत नाहीं. तथापि वरूणाच्या स्तोत्रांत अनेक वेळां वैदिक ऋषी आपलें पाप पदरीं घेतात.

५. मध्यस्थि.—ख्रिस्तीधर्माच्या सिद्धांतांपैकीं मध्यस्थीच्या सिद्धांताविरुद्ध हिंदु लोक जशी शंका आणितात तशी दुसऱ्या कोणत्या सिद्धांताविषयीं आणीत नाहींत. परंतु वेदामध्यें हा सिद्धांत स्पष्ट अढळतो. मोक्ष मूलर अग्नीला "देव व मनुष्य यांच्या मधील दूत व मध्यस्थ" ह्मणतात. असें ह्मटलें आहे कीं, "अग्नि ह्या दोन लोकांचे (स्वर्ग व पृथ्वी) देव आणि मनुष्य यांच्यामध्यें दोन वाडग्यांच्या मध्यें स्नेहाळू जासूदाप्रमाणें शहाणपणानें जातो." तो देवांस स्तोत्रें निवेदन करितो, आणि त्यांच्या उपासकांचीं हव्यें पावतीं करितो.

परंतु मध्यस्थि केवळ वेदांतच आहे असें नाहीं तर व्यवहारांत नित्य तिचा उपयोग होत असतो. एकाद्याच्या हातून कोणाचा अपराध झाला असतां त्याशीं समेट करण्याकरितां मित्रास मध्यस्थ घालण्याची रीत साधारण आहे. अशा प्रकारचे कामाला मोठी मेहरबानी समजतात, व तें उभयपक्षांचा जो मित्र असेल अशा मनुष्याकडून करून घेण्यास इच्छितात.

६. यज्ञ.—ख्रिस्ती धर्माचा असा एक मुख्य सिद्धांत आहे कीं, मनुष्याच्या उद्धारार्थ देवाचा पुत्र अवतार धारण करून पापासाठीं यज्ञरूपें

क्रूसावर (खांबावर) मरण पावला. रेव० दाक्तर कृष्ण मोहन बानरजी हे पुष्कळ वर्षें कलकत्ता युनिव्हर्सिटीचे संस्कृत परीक्षक होते. ते हा सिद्धांत वैदिक हिंदुधर्मामध्यें छायारूपानें कसा प्रगट केला आहे हें खालीं लिहिल्याप्रमाणें दर्शवितातः—

त्यांचें दोन पूर्वपक्ष (हे Aryan Witness to Christianity नामक त्यांच्या ग्रंथांत विस्तारानें सांगितले आहेत.) येणेंप्रमाणें आहेतः—

"१ ला पक्ष. जगाच्या तारणासंबंधी ख्रिस्तीधर्माचा जो सिद्धांत त्याच्या मुख्य तत्त्वांचें चमत्कारिक प्रतिरूप यज्ञाच्या गुणानें जो पापाचा नाश व पाप्याचा उद्धार यांसंबंधीं आद्य हिंदुधर्मांतील तत्त्वांत सांपडतें. यज्ञ हा सृष्टीचा प्रभु व त्राता जो प्रजापति, ज्यानें सृष्टीच्या तारणासाठीं स्वतांचें बलिदान केलें, त्याचें दर्शक होता.

"२ रा पक्ष. प्रजापति ह्याचे अर्थ निरनिराळे करितात, ह्मणजे प्रारंभीं जन्मविलेला **पुरुष**, किंवा सर्वांचा उत्पन्नकर्त्ता असा जो **विश्वकर्मा** तो. हे दोन्ही अर्थ ऐतिहासिक (इतिहासांत वर्णिलेला) जो तथ्य (खरा) पुरुष **येशू ख्रीस्त** त्याच्या नांवाच्या अर्थाशीं व त्याच्या अधिकारांशीं (कामाशीं) आश्चर्यकारक रीतीनें जमतात; आणि स्वार्पण करणाऱ्या प्रजापतीच्या गुणलक्षणांचा व पदवीचा बाणा बाळगिणारा, आणि मर्त्य व अमर असा नाजोरी येशू त्याखेरीज दुसरा कोणी जगांत उत्पन्न झाला नाहीं.

"ह्या पक्षाच्या स्थापनेचीं प्रमाणें:—

"हिंदुस्थानांतील प्राचीन आर्यलोकांच्या धर्मक्रियेंतील प्रथम, प्रमुख व अग्रवर्त्ती अशी क्रिया यज्ञ होता. संसारांतील सर्व दुःखें परिहार होण्यासाठीं ते यज्ञावर भरवसा ठेवीत असत, व संसारांत यश मिळण्याची किल्ली यज्ञच आहे असें ते समजत. त्यांच्यामध्यें मूर्त्तिपूजा, किंवा जातीचे आचार, अथवा आतांच्या काळांत जीं लोकांमध्यें व्रतें व उपोषणें चालतात तीं कांहीं नव्हतीं, केवळ यज्ञ व त्याचीं अनुषंगिक कर्में हींच कायतीं त्यांचीं व्रतें होतीं.

यज्ञ सृष्टीच्या प्रभूनें स्वतां स्थापिला असें ह्मटलें आहे. यज्ञाच्या सामर्थ्यानें जग उत्पन्न झालें, आणि त्याच्याच शक्तीनें तो अद्याप स्थित आहे. तो त्याचा "नाभि" (मध्य) आहे (ऋ० वे० "यज्ञो भुवनस्यनाभिः")

"सत्यमार्गाप्रमाणें (खऱ्या पद्धतीप्रमाणें) केलेला जो यज्ञ त्याला ऋक्, यजूस् व साम ह्यांत पापापासून रक्षण करणारी नौका ह्मटली आहे. तसेंच तो पापक्षमेचें व पाप खोडून टाकण्याचें अधिकारनियुक्त साधन होय असें स्पष्ट सांगितलें आहे.

"यज्ञकर्त्ता आपल्या बदला बली अर्पण करीत असे. तैत्तिरीय ब्राह्मणांत असें ह्मटलें आहे कीं, "यजमान पशु आहे, तो त्याला (यजमानाला) स्वर्गास घेऊन जातो. (यजमानः पशु:यजमानमेव सुवर्गं लोकं गमयति) यज्ञ हा पापापासून मुक्त होण्याचा मार्ग मानिला होता ऋग्वे० १०. ११३. १० यांत "यज्ञाच्याद्वारें आमचीं सर्व पापें हरण कर" अशी एक प्रार्थना आहे. सामवेदाचें तांड्य महाब्राह्मण यज्ञाविषयीं असें ह्मणतें कीं, "जें कांहीं पाप आह्मी दिवसा किंवा रात्रीं केलें आहे त्याचा लोप तूं आहेस. जें कांहीं आह्मी ज्ञात किंवा अज्ञात पाप केलें आहे त्याचा लोप तूं आहेस. तूं पापाचा लोप आहेस." (अस्मत्कृतस्यैनसो अवयजनमसि। यद्दिवा च नक्तञ्चैनश्चकृम तस्यावयजनमसि यत् स्वप्नतश्च जाग्रतश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि यद्विद्वांसश्चाविद्वांसश्चैनश्चकृम तस्यावयजनमस्येन स एनसो अवयजनमसि ॥)

"यज्ञ हा मृत्युनाशक मानिला होता. तैत्तिरीय आरण्यकांत असें ह्मटलें आहे कीं, "हे मृत्यू, मर्त्यांचा नाश करण्याचे जे तुझे सहस्र अयुतावधि पाश ते आह्मी यज्ञाच्या मायेनें (गूढ शक्तीनें) तोडून टाकितों." (येते सहस्रमयुतं पाशा मृत्यो मर्त्याय हन्तवे तान् यज्ञस्य मायया सर्व्वां मवयजामहे). यज्ञ स्वर्गाचें द्वार उघडितो. "ज्याला स्वर्गसुखाची इच्छा आहे त्यानें सत्यमार्गानें यज्ञ करावा."

"यज्ञाला इतकें मोठेंपण देण्याचें कारण, व हा सर्व विषय नीट समजून घेण्याची किल्ली हीच होती कीं, प्रजापतीचें आत्मबलिदान. ह्या प्रजापतीलाच 'सृष्टीच्या पूर्वीं जन्मलेला **पुरुष** व **विश्वकर्मा**' (सृष्टीचा कर्त्ता) ह्मटलें आहे. ही कल्पना तिन्ही महावेदांत—ऋक्, यजूस् व साम यांत अढळते. तशीच ती संहिता, ब्राह्मणें, व उपनिषदें यांतही अढळते. ज्या ईश्वरी पुरुषानें देवांकरितां (ह्मणजे **मुक्त झालेले** मानव) आत्मयज्ञ केला, त्यानें **यज्ञास योग्य** असें मर्त्य शरीर मिळविलें, आणि स्वत: **अर्ध मर्त्य** व **अर्ध अमर** असा झाला.

" यजुर्वेदामध्यें ह्या ईश्वरी आत्मबलीदान करणाराच्या मुखांत पुढील शब्द घातले आहेत:—' सर्व प्रजांमध्यें मला माझें बलिदान करूं दे; आणि सर्व प्रजांमजमध्यें.' शतपथ ब्राह्मणांत असें ह्मटलें आहे कीं, सर्व प्रजांच्या पतीनें आपणाला त्यांच्याकरितां दिलें, कारण तो त्यांचा बलि झाला. तैत्तिरीय आरण्यकांत असें ह्मटलें आहे कीं:—' त्यांनीं पुरुषबलीचा वध केला—पुरुष जो आरंभीं जन्मलेला तो.' त्याला ऋग्वेदांत 'आत्मदा, बलदातारा, ज्याची छाया, ज्याचें मरण अमरत्व आहे तो.' असें ह्मटलें आहे. (आत्मदा बलदाः. . . . . . यस्य छायामृतं यस्य मृत्युः। (ऋ. १०.१२१.२).*

" जग दोषी ठरवून यज्ञार्थ दिलें, ह्मणजे तें पापामुळें नाशाला दिलें. आणि मग ईश्वरी तारणारानें जगाच्या उद्धारार्थ आपणाला दिलें. ख्रिस्ती शास्त्र ह्मणतें कीं, "जर सर्वांकरितां एक मरण पावला, तर मग सर्व मेले." वेद याच्या उलट क्रमानें ह्मणतें कीं, **" सर्व नाशाला दिलें होतें ह्मणून एक सर्वांकरितां मेला."**

" प्रजापतीविषयीं आतां जें सर्व सांगितलें तें देव व मनुष्य आमचा इमानुएल (आमच्या संगतीं देव) मर्त्य आणि अमर असा जो ख्रीस्त त्याचेविषयीं बैबलांत जें वर्णन आहे त्याच्याशीं फार चमत्कारिक रीतीनें जुळतें. त्याविषयीं अणखी असें ह्मटलें आहे कीं, "त्यानें देवाला सुगंधाच्या वासाकरितां आपणाला आह्मासाठीं अर्पण व यज्ञ करून दिला." पूर्वींचे सर्व यज्ञ त्याची प्रतिमा व प्रतिबिंबें असे होते; त्यानें आपल्या यज्ञानें किंवा मरणानें ' मरणाला निरर्थक केलें आणि शुभवर्तमानाकडून जीवन व अमरपण हीं प्रकाशित केलीं आहेत.'

" प्रजापतीविषयींची वैदिक कल्पना प्रभु येशूचें जें वर्णन वर केलें आहे त्याच्याशीं फार चमत्कारिक रीतीनें जमते हें आतांच आह्मी दर्शविलें, व त्यावरून ख्रिस्ती धर्मामध्यें जीं तारक गूजें आहेत त्यांचें दृढीकरण होतें.

---

* [ वेदांमध्यें हें वचन हिरण्यगर्भाविषयीं आहे, परंतु हिरण्य हाच प्रजापति असा सायनाचार्य अर्थ करितात. ]

" आतां मी आपल्या द्वितीय पक्षाचें स्थापन करितों. प्रजापति ह्या शब्दाचा 'प्रजेचा प्रभु' इतकाच अर्थ होतो असें नाहीं, तर " आपल्या प्रजेचा संभाळणारा, पोषक आणि उद्धारक " असाही अर्थ होतो. हा विस्तीर्ण अर्थ वेदाचें भाष्य करणारे महान सायनाचार्य यांनीं केला आहे. प्रभु आणि स्वामी ह्याला आपले सेवक व प्रजा यांचें पोषण व सांभाळ करायाचा आहे. येशू या नांवाचा इब्री भाषेंत हाच अर्थ होतो. मूळ शब्द सहाय, मुक्ति, तारण ह्या अर्थाचा आहे. आणि तो आपल्या लोकांस त्यांच्या पापांपासून तारणार होता ह्मणून त्याला हें नांव ठेविलें होतें. मात्थीनें जें जुन्या करारांतील भविष्य उतरून घेतलें आहे त्यांत 'माझे लोक इस्राएल यांस **पाळील** असा अधिकारी' असा तो वर्णिला आहे. तर ज्याप्रमाणें मेंढपाळ आपल्या मेंढरांवर अधिकार चालवितो, व त्यांचा संभाळ व पोषण करितो, त्याप्रमाणें तो आपल्या लोकांविषयीं आहे. पतीचाही हाच अर्थ आहे; यास्तव **प्रजापति** हें नांव **येशू** ह्या नांवाशीं विशेषतः जुळतें. हिंदु-लोकांच्या देवगणांतून अथवा दुसऱ्या कोणत्याही लोकांच्या देवगणांतून मनुष्यजातीच्या कल्याणार्थ कोणत्याही देवानें आत्मबलिदान केलें असें कोणी ह्मणत नाहीं. तर सर्व सुशिक्षित मनुष्यें जाणतात कीं, इतिहासप्रसिद्ध नाजारेथकर येशू ह्याचेंच नांव व पदवी ह्मणजे—मर्त्य व अमर हीं ज्यानें मानवजातीकरितां आत्मबलीदान केलें—हीं वेदांत सांगितलेल्या कल्पनेशीं मिळतात. येशू हाच खरा प्रजापति, जगाचा खरा तारणारा—'जेणेंकरून आमचें तारण झालें पाहिजे असें दुसरें नांव आकाशाखालीं मनुष्यामध्यें दिलेलें नाहीं' तें नांव, असा तोच आहे, असा निर्णय अशेष शोधानें तुह्मी करूं शकाल.

" तर हा माझा द्वितीय पक्षही स्थापित झाला असें मला ह्मटलें पाहिजे. **ख्रीस्त** हाच खरा **प्रजापति** होय.—जो सर्व जगाच्या आरंभीं जन्मविलेला जो स्वतां देव व मनुष्य. तारकयज्ञाचे जे उपदेश, ज्यांला ऋग्वेदांत आदिधर्म ह्मटलें आहे ते, व बलि आणि होता (याजक) असा द्विगुणलक्षणयुक्त जो प्रजापति, ज्याला पुरुष व विश्वकर्मा ह्मटलें आहे तो—आणि जिच्या योगानें आमचें ह्या पापी

जगाच्या महापुरापासून रक्षण होतें अशी जी नौका, ती-हीं सत्यें वेदामध्यें पुष्कळ केरकचऱ्यांत व कचऱ्यापेक्षांही वाईट अशा वस्तूंत सांपडतात. तीं धूळ व चिखल यांजमध्यें हिरकण्याप्रमाणें झकाकतात, तीं ज्या अदृश्य इमारतीचे अंगभूत भाग होतीं, तिच्याविषयीं जसे अंधारमय क्षितिजावर विद्यमान नसलेल्या सूर्याविषयीं त्याच्याच प्रकाशाचें मंद परावर्त्तन करणारे ग्रह साक्ष देतात, त्याप्रमाणें हीं रत्नखंडें साक्ष देतात.

"ख्रिस्ती मनुष्यास सर्व जगाचा कळवळा आहे म्हणून जेव्हां तो सर्व राष्ट्रांस ख्रीस्तावर विश्वास ठेवण्यास आमंत्रण करितो, तेव्हां शुभवर्तमानांतील येशूचीं गुणलक्षणें वेदांतील आत्मबलि देणाऱ्या प्रजापतीच्या गुणलक्षणांशीं मिळतात हें जाणून आनंद पावतो ; आणि सुवार्त्तिकाचें मुख्य काम हेंच आहे कीं, आपल्या शेजाऱ्यांस व आपल्यासारिख्या इतर मनुष्यांस तारणाची खरी नौका,—जिच्या योगानें आमचें सर्व पापांपासून रक्षण होईल अशी जी "यज्ञरूप सत्य नौका" ती दाखवावी. तसेंच हिंदु लोकांनीं विश्वास ठेवावा म्हणून सत्य **पुरुष** कोण हेंही त्यानें सांगावें; "जो पुरुष जगाच्यापूर्वीं जन्मविलेला, जो मर्त्य व अमर, "ज्याची छाया, ज्याचें मरण आम्हास अमृतच आहे".

[ डाक्तर बानरजी ह्यांनीं शोधून काढलेलीं हीं तारक सत्यें वेदांत कोठून आलीं ! तर त्यांविषयीं त्यांनींच सांगितलें आहे कीं, ज्या काळीं सकल मानवकूळ एकत्र राहत होतें त्या काळीं ईश्वरानें जीं धर्मसत्यें त्यास प्रगट केलीं त्यांपैकीं हीं होत. ]

## वैदिक धर्माकडे परत जाणें अशक्य आहे.

तेहतीसकोटि देवांनीं भरलेल्या अर्वाचीन हिंदुधर्मापेक्षां प्राचीन वैदिक धर्म कित्येक गोष्टींनीं श्रेष्ठ आहे. वेदांत जातिभेद सांगितला नाहीं. वैदिक कालीं बालविवाह ठाऊक नव्हता. स्त्रियांस पडद्यांत ठेवीत नसत. इतकें असूनही कोणत्याही सुशिक्षित हिंदूस वेदांतील धर्ममतें व धर्मकृत्यें यांजकडे परत जातां येणार नाहीं. कोणी हिंदु आपण वैदिक धर्म आचरितों असा बाणा बाळगितात, परंतु ते वैदिक

स्तोत्रांचा त्यांच्या कर्त्यांस जो अर्थ ठाऊक होता तो बदलून असें करूं पाहतात.

१. तुमच्यानें वैदिक देवांची भक्ति करवणार नाहीं.—तुमच्यानें "अकरात्रिक" देवांवर विश्वास ठेववणार नाहीं. आकाश व पृथ्वी, सूर्य आणि चंद्र, मेघ व पहाट ह्यांजवर चेतनेचा आरोप करून तीं सुबुद्ध आहेत, व त्यांच्याठायीं दया किंवा क्रोध आहे असें मानण्यास तुमची बुद्धि राजी होणार नाहीं. तुह्मी कितीही तर्क चालविला तरी हे पदार्थ जे कांहीं आहेत त्यांहून विशेष तुह्मास भासणार नाहींत. ह्मणजे ते केवळ नानाजातींचे, व नाना आकाराचे सुंदर प्रकृतिमय पदार्थ आहेत, याच्या पलीकडे कांहीं नाहीं, इतकेंच तुह्मी मानाल. तुह्माला असें वाटेल कीं, जो महान सृष्टिकर्त्ता त्यास भजावें, त्यानें केलेल्या वस्तूंस भजूं नये.

२. तुमच्यानें वेदांतील **प्रार्थना** करवणार नाहींत.—गायी, घोडे, शरीरसंपत्ति व धनसंपत्ति, शत्रुनाश ह्यांपेक्षां तुम्हास कांहीं विशेष पाहिजे.

३. तुह्माला वेदांतील **अर्पणें** करितां येणार नाहींत.—तुमच्यानें तान्हेल्या हरिणाप्रमाणें इंद्राला सोमरस प्यायास बोलावितां येणार नाहीं, तुह्माला रेडे, बैल, गायी व मेंढरें यांचे बलि देतां येणार नाहींत. ह्या सर्व खऱ्या यज्ञाच्या छाया किंवा प्रतिमा होत्या.

तर तुमचा विद्वान देशबांधव डाक्तर के. एम. बानरजी यानें जो मार्ग धरण्याविषयीं आग्रहानें तुमची विनंती केली आहे तोच तुम्हांला धरिला पाहिजे. तो जणूं काय कबरेंतून तुम्हांशीं बोलतो:—

"जर ते वृद्ध ऋषि पुनः ह्या जगांत प्रगट होण्याचा संभव असता तर तेच तुह्माला बोध करिते व तुमची विनवणी करिते, व कदाचित् आग्रहही करिते कीं, एवढ्या मोठ्या तारणाचा अव्हेर करूं नका. अणखी ते असें ह्मणते कीं, जो खरा प्रजापति, जो खरा पुरुष, जो तुह्मी जगावें ह्मणून मरण पावला, ज्यानें मरणाकडून मरणास जिंकिलें, [ जो खरा मृत्युंजय ] आणि ज्यानें शुभवर्त्तमानाच्या योगेंकरून जीवन व अमरत्व हीं प्रकाशांत आणिलीं त्याला स्वीकारण्याचें जें तुमचें कर्तव्य त्यांत अंतर पडूं देऊं नका.

"ख्रीस्ताचा क्रियेनें किंवा निष्क्रियेनें अनंगीकार केल्यानें ज्यांत खरें कल्याण आहे त्या सर्वांचा तुम्ही त्याग करितां. ख्रीस्ताचा स्वीकार केल्यानें तुह्मांस त्याजमध्यें बल व समाधान—जीं तुमचे प्राचीन ऋषींनीं ह्या काळांत ते जीवंत असते तर महानिधि मानून ग्रहण केलीं असतीं—तीं तुम्हाला प्राप्त होतील. त्यांजमध्यें तुमची कुलपरंपरा, तुमचें प्राचीनत्व, तुमचे धर्मसंप्रदाय, तुमचें विद्याशिक्षण यांस योग्य असें सर्व तुह्मांस मिळेल; आणि तसेंच तुमच्या लेंकरांस व तुमच्या वंशजांसही तीं यथान्यायें प्राप्त होतील."

ख्रिस्ती धर्माच्या सिद्धांतांची विशेष माहिती होण्याकरितां ख्रिस्ती लोकांनीं जीं पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत तीं, व विशेषेंकरून नवा करार तुह्मी वाचा, आणि सत्याचा शोध लागावा ह्मणून वाचते वेळीं देवाची प्रार्थना करा.




EDUCATION SOCIETY'S STEAM PRESS, BYCULLA.